# आमचा तारणारा व प्रभु येशू ख्रीस्त

याविषयीं सुवर्त्तमान

पवित्र लेखांतून काढिलें

---

THE HISTORY OF

# Our Lord and Saviour Jesus Christ.

COMPILED FROM THE GOSPELS.



*AMERICAN TRACT SOCIETY,* 1,500 *COPIES.*

BOMBAY:
AMERICAN MISSION PRESS.
T. GRAHAM AND C. BURJORJEE, PRINTERS.

---

1836.

## सूचना

ह्या पुस्तकांत येशू ख्रीस्ताचें वर्त्तमान विस्ताराने लिहिलें आहे. सर्व मनुष्यांचे जे पूर्वज ते देवाच्या आज्ञा मोडल्याकडून भ्रष्ट झाले असतां त्याने त्यांवर कृपा करून वचन दिल्हें कीं, पुढें एक तारणारा जगामध्यें येईल आणि मनुष्यांस तारण प्राप्त होण्याचा उपाय करील. यानंतर आब्राहाम नामें एक भक्तिमान् माणसाला देवाने असें वचन दिल्हें कीं, जो तारणारा येणार तो तुझ्या वंशामध्यें जन्म घेईल आणि तुझ्याकडून सर्व पृथ्वींतील लोक आशीर्वाद पावतील. आणि कोणत्या ठिकाणीं व कोणत्या वेळेस तो तारणारा जन्म घेईल अशा भविष्य गोष्टी शास्त्रांत लिहिल्या होत्या, ह्मणून

सांगितलेला वेळ अवळ आला असतां त्या सर्व लोकांस त्या गोष्टी माहीत होत्या ते त्या तारणाऱ्याची वाट पाहूं लागले. अणखी तो तारणारा आल्यावर कसें कसें करील हेंहि शास्त्रामध्यें लिहिलें होतें. परंतु ह्या भविष्य गोष्टींचा अर्थ बहुतकरून लोक चुकले, ह्मणून त्यांनी त्याचा योग्य मान केला नाहीं. तो तारणारा परमेश्वराचा अवतार होता. शास्त्रांत त्याला देवाचा पुत्र असें ह्मटलें आहे, परंतु बहुत करून येशूख्रीस्त असें नाम त्याला दिल्हें आहे. आरबस्थानाच्या पलिकडे यहूदा ह्मणून एक देश आहे, तेथें सुमारें अठराशें पत्तीस वर्षें मागें येशूख्रीस्ताचा जन्म झाला, आणि त्या देशांतहि त्याचीं सर्व कृत्यें घडलीं. त्याचें सामर्थ्य व दया इत्यादिक ईश्वरीगुण हे त्याचा उपदेश व सदाचरण व चमत्कार यांकडून प्रसिद्ध झाले. त्याने मनुष्यांच्या पापांसाठीं प्रायश्चित्त करावें ह्मणून आपलें जीवार्पण केलें, आणि तिसऱ्या

दिवसीं सजीव होऊन चाळीस दिवसांनी आ
पल्या शिष्यांदेखत तो आकाशावर चढून गेला.
ह्या सर्व गोष्टी त्याचे शिष्य जे पाहणारे व
ऐकणारे होते त्यांनी लिहिल्या. जगांतील लो
कांच्या तारणासाठीं येशूख्रीस्ताने अवतार घेत
ला, आणि त्याच्या गोष्टी हिंदूलोकांनी सम
जाव्या ह्मणून मराठी भाषांत उतरल्या आहेत.

हे वाचणाऱ्यानीं हें पुस्तक घेऊन शेवटपर्यंत
वाचीत जा. जर कोणीएक ठिकाणीं त्याचा
अर्थ समजावयास कांहीं कठीण पडेल, तर
मागें पुढें पाहून चित्त लावून अर्थ काढा. आ
णि ह्या सर्व गोष्टींचें तात्पर्य आपण समजावें
आणि येणेंकरून देवाची कृपा पावून इहलोकीं
व परलोकीं कल्याण भोगावें ह्मणून विशेषें
करून ईश्वरापासीं ज्ञान व सुबुद्धि मागत जा.

# आमचा तारणारा व प्रभु येशू ख्रीस्त याविषयीं शुभवर्त्तमान

## अध्याय १

जे आपणच प्रारंभापासून शब्दाचे पाहणारे व सेवक होते त्यांनी जसें आम्हास सांगून ठेविलें तसें आम्हामध्यें निर्धारें घडलेल्या क्रियांविषयीं कथा संगत लावावयास बहुतांनी हातीं धरिलें आहे, यावरून हे माहाराज थ्यफिलषा मलाहि वाटलें कीं एकाग्रतेनें पहिल्यापासून सर्व त्यांचा माग अवळ काढलेला असतां त्या तुला यासाठीं अनुक्रमानें लिहावें कीं ज्या गोष्टी तूं शिकलास त्यांचा निश्चय त्वां आणावा.

प्रारंभीं तो शब्द होता, आणि तो शब्द देवाजवळ होता, आणि तो शब्द देव होता, तोच प्रारंभीं देवाजवळ होता, त्याकडून सगळीं झालीं, म्हणजे जें झालें तें कांहींच त्यावांचून झालें नाहीं. त्यामध्यें जीवन होतें आणि तें जीवन

माणसांचा उजेड होता, आणि तो उजेड अंधारांत प्रकाशितो, परंतु अंधाराने त्याला धरिलें नाहीं. देवाजवळून पाठविलेला माणूस होता, त्याचें नाव योहान; तोच आपणाकडून सर्वांनी विश्वास धरावा ह्मणून त्या उजेडाविषयीं साक्ष द्यावयास साक्षीसाठीं आला. तोच तो उजेड नव्हता परंतु त्या उजेडाविषयीं साक्ष द्यावयास आला; जो प्रत्येक माणूस जगांत येतो त्याला जो प्रकाशितो तोच खरा उजेड होता. तो जगांत होता आणि जग त्याकडून झालें, तथापि जगाने त्याला आणखें नाहीं; तो आपलों जीं त्यांजवळ आला आणि आपले जे त्यांनी त्याला अंगिकारिलें नाहीं. परंतु जितक्यांनी त्याला घेतलें, ह्मणजे त्याच्या नावावर विश्वास ठेविला, त्यांस त्याने देवाचीं लेंकरें होण्याचा अधिकार दिल्हा; तें रक्तापासून किंवा माणसाच्या इच्छेपासून नव्हेत परंतु देवापासून जन्मले. आणि तो शब्द अवतरला, तेव्हां त्याने आह्मामध्यें वस्ती केली आणि तो कृपेने व खरेपणाने पूर्ण असतां, त्याचें गौरव बापाजवळील एकुलत्याच्या गौरवासारिखें आह्मी पाहिलें. योहान त्याविषयीं साक्ष देत असतांना ओरडत बोलला, ज्याविषयीं मी बोललों, तो हाच आहे, कीं जो माझ्यामागें येतो तो माझ्या पुढें झाला, याजव कीं तो माझ्या अगोदर होता. आणि त्याच्या पूर्णपणापासून आह्मी सर्व कृपेमुळें कृपाच

पावलीं आहों, कां कीं नेमशास्त्र मोश्शाकडून दिल्हें गेलें; कृपा व खरेपण येशू ख्रीस्ताकडून झालीं. देवाला कोणी कधींहि पाहिलें नाहीं. एकुलता पुत्र जो बापाच्या उराशीं असतो त्यानेच तो निवेदिला आहे.

मग साहाव्या महिन्यांत गालीलांतील नगर ज्याचें नाव नाजारेथ, तेथे गाब्रिएल दूत कुंवारीच्याजवळ देवानें पाठविला होता; ती दावीदाच्या घराण्यांतील पुरुष ज्याचें नाव योसेफ याला वाङ्निश्चयें दिल्हेली होती, आणि त्या कुंवारीचें नाव मारया होतें. तेव्हां दूत तिच्याजवळ आंत येऊन बोलला, कृपा पावलेले सुखी ऐस, प्रभु तुजसहित आहे, स्त्रियांमध्यें तूं धन्य ह्मटलेली आहेस. तेव्हां ती त्याला पाहतां त्याच्या गोष्टीवरून फार घाबरली आणि तिनें विचार केला, कीं ही क्षेमगोष्ट कशाची असेल? तेव्हां दूतानें तिला ह्मटलें, हे मारये भिऊं नको, कां कीं देवाजवळ तुला कृपा मिळाली आहे, आणि पाहा तूं पोटीं गर्भ धरिसील; पुत्रालाहि प्रसवसील आणि त्याचें नाव येशू ठेवावें. तो महान् होईल आणि परात्पराचा पुत्र ह्मटला जाईल आणि प्रभु जो देव तो त्याला त्याचा पितर दावीद याचें सिंहासन देईल. मग तो याकोबाच्या घराण्यावर सर्वकाळ राज्य करील ह्मणजे त्याच्यां राज्याचा शेवट होणार नाहीं. तेव्हां मारयेनें दूताला ह्मटलें, मी

पुरुषाला जाणत नाहीं, असें असतां हें कसें घडेल? मग दूत उत्तर देतां तिला बोलला कीं, पवित्र आत्मा तुजवर येईल आणि परात्पराची शक्ति तुजवर सावली करील, याकरितांहि जें पवित्र तुजकडून जन्म पावेल तें देवाचा पुत्र म्हटलें जाईल. आणि पाहा तुझी नातलग एलीसाबेत तिनेंहि आपल्या म्हातारपणीं पुत्रगर्भ धरिला आहे, आणि जी वांझ म्हटलेली तिला हाच साहावा महिना आहे कां कीं कोणतीहि गोष्ट देवाला असाध्य नाहीं. तेव्हां मारया बोलली, पाहा मी प्रभूची दासी, तुझ्या गोष्टीप्रमाणें मला व्हावें; तेव्हां दूत तिजपासून गेला.

येशू ख्रीस्ताचा जन्म या प्रकारें झाला कीं त्याची आई मारया योसेफाशीं लग्नास योजलेली असतां, त्यांची संगती होण्यापूर्वीं ती पवित्र आत्म्यापासून गरोदर होऊन सांपडली. तेव्हां तिचा नवरा योसेफ नीतिमान् असतां आणि तिचा उघडा अपमान करावयास न इच्छितां, तिला गुप्तरूपें सोडायास योजिता झाला. परंतु तो त्यांविषयीं चिंतन करीत असतां, पाहा प्रभूचा दूत त्याला स्वप्नांत दिसून बोलला, हे योसेफा दावीदाच्या पुत्रा, तुझी बायको मारया इला अंगिकारावयास भिऊं नको, कां कीं जें तिजमध्यें जन्म पावलें तें पवित्र आत्म्यापासून आहे आणि ती पुत्राला प्रसवेल आणि त्वां त्याचें नाव येशू

ठेवावें, कारण कीं तो आपल्या लोकांस त्यांच्या पापांपा सून तारील. आणि हें अवघें यासाठीं झालें कीं प्रभूनें भविष्यभाष्याच्याद्वारें जें म्हटलें, तें पूर्ण व्हावें कीं, पाहा कुंवार गरोदर होईल आणि पुत्राला प्रसवेल आणि त्याचें नाव इम्मानुवेल ह्मणतील, अर्थ उतरल्यास आमच्या संगातें देव. तेव्हां योसेफानें झोपेंतून उठून त्याला प्रभूच्या दूतानें जसी आज्ञा दिल्ही तसें केलें, कीं आपल्या बाय कोला अंगिकारिलें; परंतु ती आपल्या प्रथम संभवलेल्या पुत्रालाप्रसवे तोंपर्यंत त्यानें तिला जाणिलें नाहीं; आणि त्याचें नाव येशू ठेविलें.

आणि त्या दिवसांत असें झालें कीं काइसार आउगूस्त याजवळून अवघ्या वस्तीवटीची ह्मडती लिहावयाची आज्ञा निघाली. कुरनयस अरामाचा अधिकारी असतां, हें पहिलें ह्मडतीलिहिणें झालें होतें, तेव्हां प्रत्येक आपा पल्या नगरांत ह्मडती लिहून द्यावयास सर्व गेले. तेव्हां योसेफहि तो दावीदाचें घराणे व गोत यांतील होता, यावरून गालीलांतून नाजारेथ नगरापासून यहूदांत दावी दाचें नगर जें बेथलेहेम ह्मटलें, तेथें यासाठीं चढला कीं आपण मागणीनें केलेली आपली स्त्री मारया हिजसुद्धां ह्मडती लिहून द्यावी. ती गरोदर असतां असें झालें, ती तेथें असतां तिच्या प्रसूत होण्याचे दिवस पूर्ण झाले.

तेव्हां ती आपल्या प्रथम झालेल्या पुत्राला प्रसवली आणि त्याला बाळंत्याने गुंडाळलें; तेव्हां त्यांस उतारशाळेंत जागा नव्हती यावरून तिने त्याला गव्हाणींत निजविलें.

## अध्याय २.

आणि त्याच प्रांतांत मेंढपाळ रात्रीं माळांत राहत आणि आपल्या कळपावर चौकी करीत होते; तेव्हां पाहा त्याच्या जवळ प्रभूचा दूत उभा ठाकला आणि प्रभूचें तेज त्याच्या भोंवतें प्रकाशलें ह्मणून फार भयाने भ्याले. तेव्हां दूत त्यांस बोलिला भिऊं नका, कारण कीं पाहा जो मोठा आनंद प्रत्येक प्रजेला होईल त्याचें शुभवर्तमान मी तुम्हास सांगतों कीं तारणारा जो ख्रीस्त प्रभु आहे तो दावीदाच्या नगरांत आज तुम्हासाठीं जन्मला आहे. आणि हेंच तुह्मास खूण, बाळक बाळंत्याने गुंडाळलें असतां गव्हाणींत निजलेलें तुह्मास सांपडेल. मग आकाशी सैन्याचा भरण दूतासहित अकस्मात् झाला; त्यानी देवाला स्तवितांना ह्मटलें, परम उंचामध्यें देवाला गौरव, पृथ्वीवरहि शांति, माणसांसीं संतुष्टता. आणि जेव्हां दूत त्यांपासून आकाशांत गेले, तेव्हां असें झालें कीं ते मेंढपाळ मनुष्य एकमेकांस बोलले, चला आपण बेथलेहेमापावेतों पलिकडे जाऊं, आणि ही झालेली गोष्ट जी प्रभूने आह्मास कळ

विसी तो पाहूं. ते उतावळी करून आले आणि त्यांनी मारया व योसेफ व गव्हाणींत निजलेलें बाळकहि यांचा शोध काढिला ; मग त्यांनी पाहिल्यावर त्या लेंकराविषयीं जो गोष्ट आपणांस सांगितली होती त्याविषयीं प्रगट कळ विलें. नंतर सर्व ऐकणारे आपणांस मेंढपाळांकडून जीं सांगितलीं त्यांविषयीं आश्चर्यवत झाले, आणि मारयेनें आपल्या चित्तांत ह्या सर्व गोष्टींचें मनन करून संरक्षण केलें. तेव्हां मेंढपाळ, आपणांस जसीं सांगितलीं होतीं तसीं जीं आपण ऐकिलीं व पाहिलीं, त्या अवघ्यांवरून देवाला गौरवितां व स्तवितां माघारें फिरले

मग जेव्हां लेंकराची सुंता करावयाचे आठ दिवस पूर्ण झाले, तेव्हां त्याचें नांव येशू ठेविलें ; हें नाव त्याचा गर्भ पोटांत धरल्यापूर्वीं दूताकडून दिल्हें होतें. आणि मोशाच्या धर्मनेमाप्रमाणें तिचे शुद्ध करण्याचे दिवस पूर्ण झाल्यानंतर त्यांनी त्याला वर्ते यरूशालेमास यासाठीं आणिलें कीं, जसें प्रभूच्या धर्मनेमांत हें लिहिलेलें, प्रत्येक नर जो गर्भस्थानास मोकळें करितो तो प्रभूसाठीं पवित्र म्हटला जाईल, तसें प्रभुजवळ सादर ठेवावें; आणि प्रभूच्या धर्मनेमांत सांगितल्याप्रमाणें पारव्यांचा जोडा किंवा खबुतरांचीं दोन पिलें असा यज्ञ अर्पावा. तेव्हां पाहा माणूस ज्याचें नाव शिमोन असा यरूशालेमांत होता आणि हा

माणूस नीतिवंत व धर्मशीळ, इस्राएलाच्या शांतवनाची वाट पाहात होता. त्याला पवित्र आत्माहि होता; आणि आपण प्रभूच्या ख्रीस्ताला पाहिल्यापूर्वीं मरण पाहणार नाहीं, असें पवित्र आत्म्याकडून त्याला प्रबोध झाला होता. तेव्हां आत्मायुक्त होऊन देवळांत आला आणि आईबा पानी आपण व लेंकरूं येशू याविषयीं धर्मनेमाच्या साम्न लेल्या रीतिप्रमाणे करावें ह्मणून जेव्हां त्याला आंत आणिलें तेव्हां ह्याने त्याला आपल्या हातांमध्यें घेतलें, मग देवाची स्तुति केली आणि ह्मटलें, आतां हे स्वामी, तुझ्या गोष्टीप्रमाणे तुझ्या सेवकाला शांतीने सोडितोस, याखव कीं माझ्या डोळ्यानी तुजकडील तारण पाहिलें, जें त्वां अवघ्या प्रजांच्या दृष्टीस सिद्ध केलें तें राष्ट्रांच्या प्रकाशासाठीं आणि तुझ्या इस्राएलप्रजेच्या गौरवासाठीं उजेड. तेव्हां ह्याविषयीं जीं सांगितलीं त्यांवरून योसेफ व ह्याची आई यानी आश्चर्य केलें. शिमोनाने त्यांस आशिर्वादहि दिल्हा आणि ह्याची आई मारया इला ह्मटलें, पाहा इस्राएलांत बहुतांचें पडणें व फिरून उठणें यांकरितां आणि अपवादलेल्या खुणेकरितां हाच घातला आहे. तुझ्याच स्वजिवांतून ही तरवार पार जाईल, ही अशासाव कीं बहुतांच्या हृदयांतील कल्पना प्रगट व्हाव्या. आणि आशेराच्या वंशांतील फानुवेलाची कन्या हान्ना भविष्यभाषीण

होती; ती फार दिवसाची वयातीत होती, आपल्या कुंवारपणापासून नवऱ्यासहित सात वर्षे राहिली आणि सुमारें चौऱ्याशी वर्षांची विधवा होती. ती रात्रंदिवस उपास व प्रार्थना यांकडून सेवा करीत असतां देवळापासून गेली नाही, तिनेंहि त्याच क्षणीं जवळ येऊन प्रभूचीं आभारमान पत्करिलें आणि यरुशालेमांत सर्व जे सुटकाखंडणीची वाट पाहत होते, त्यांस त्याविषयीं सांगितलें

आणि हेरोद राजा याच्या दिवसांमध्यें येहूदाचा देशांतील बेथलेहेमांत जन्मला असतां, पाहा पूर्वेकडून ज्ञानी यरुशालेमांत येऊन बोलले कीं, यहूद्यांचा जो जन्मलेला राजा तो कोठे आहे? कां कीं आम्ही पूर्वेंत असतां त्याचा तारा पाहिला आणि त्याला भजावयास आलों. तेव्हां हें ऐकून हेरोद राजा आणि त्याच्या समागमें सर्व यरुशालेम घाबरे झाले. नंतर सर्व मुख्य उपाध्ये आणि लोकांचे पंडित यांस मिळवून त्याने त्यांच्याजवळ पुसलें कीं, ख्रीस्त कोठे जन्मणार आहे? तेव्हां त्याला बोलले, यहूदांतील बेथलेहेमांत; कां कीं भविष्यवाद्याने असें लिहिलें आहे कीं, हे यहूदांच्या देशांतील बेथलेहेमा तूं यहूदांच्या सुभ्यांमध्यें लाहान असदीं नाहींस कारण कीं माझे लोक इस्राएल यांस पाळील असा तुजपासून अधिकारी उत्पन्न होईल. तेव्हां हेरोदाने त्या ज्ञान्यांस गुप्तरूपें बोलावून

त्यांपाशीं तारा दिसण्याची वेळ नीट विचारली, आणि त्यांस बेथलेहेमास पाठवितांना बोलला, तुम्ही जाऊन त्या बाळकाविषयीं एकाग्रतेने शोधा, आणि तुह्मास शोध लागल्यावर मला वर्तमान सांगा ह्मणजे मी येऊन त्याला भजेन. तेव्हां ते राजाचें ऐकून निघाले आणि पाहा, जो तारा त्यांनी पूर्वेंत पाहिला, तो त्यांच्यापुढें गेला आणि जेथें तो बाळक होता तेथच्या वर्ता येऊन राहिला; आणि ते तारा पाहून अति आनंद पावले. नंतर त्यांनी घरांत येऊन बाळकास त्याची आई मारया तिच्याजवळ पाहिलें आणि पायां पडून त्याला भजिलें, मग आपलीं भांडारें उघडून दानें; सोनें, व ऊद; व बोळ, त्याला अर्पलीं. तेव्हां ते हेरोदाकडे फिरून न आवयास स्वप्नांत प्रबोधित होऊन आपल्या देशास दुसऱ्या वाटेनें परत गेले.

तेव्हां ते निघाल्यावर पाहा प्रभूचा दूत योसेफास स्वप्नांत दिसून बोलला कीं, तूं बाळक आणि त्याची आई यांस घेऊन मिसर देशांत पळून जा, आणि मी तुला सांगेन तोंतर्यंत तेथें राहा, यास्तव कीं या बाळकाचा नाश करावयास हेरोद याला शोधील. मग तो उठून बाळक आणि त्याची आई यांस रातीं घेऊन मिसर देशांत गेला आणि हेरोदाच्या मरणापर्यंत तेथें होता; कां ज्या आपल्या

पुत्राला मिसरादेशांतून बोलाविलें आहे. असें जें भवि ष्यभाष्यांच्याद्वारें प्रभूनें सांगितलें तें पूर्ण व्हावें ह्मणून.

तेव्हां त्या ज्ञान्यानी मला फसविलें हें हेरोद जाणून फारच रागें भरला; आणि त्या ज्ञान्यांजवळ नीट विचा रिलो होती जी वेळ त्या वेळेप्रमाणे बेथलेहेमांत आणि त्याच्या भवताले सगळ्या प्रांतांत पाठवून जे बाळक दोन वर्षांचे होते आणि त्यांहून धाकटे जे होते त्या सर्वांचा घात केला. त्या वेळेस जे हूर्मया भविष्यभाष्यानें सांगितलें तें पूर्ण झालें; तें असें कीं शोक व रडणें व मोठा आकांत, अशा शब्द राम्यांत ऐकिला गेला; राहेल आपल्या लेंक रांकरितां रडती आणि तीं नाहींत ह्मणून समजूत पावेना. मग हेरोद मेल्यावर पाहा प्रभूचा दूत मिसरदेशांत योसे फास स्वप्नांत दिसून बोलला कीं, तूं उठून बाळक व त्याची आई यांस घेऊन इस्राएल देशांत जा, कां कीं ज्यानी बाळ काचा जीव घ्यावयास शोधिलें ते मेले आहेत. तेव्हां तो उठून बाळक व त्याची आई यांस घेऊन इस्राएल देशांत आला; परंतु आर्खेलास आपला बाप हेरोद याच्या ठिकाणीं यहूद्यांत राज्य करीत आहे, हें ऐकून तो तेथे जाण्यास भ्याला. तथापि स्वप्नांत प्रबोधित होऊन गालीलांतील प्रांतांत गेला, आणि त्यानें नाजारेथ ह्मटलेल्या नगरांत

येऊन वस्ती केली; असाव कीं भविष्यभाष्यानें जें म्हटलें तें पूर्ण व्हावें कीं, तो नाजोरी म्हटला जाईल,

## अध्याय २.

आणि तें लेंकरूं वाढलें व ज्ञानेंकरून पूर्ण असतां आत्म्यानें बळवान् झालें आणि देवाची कृपा त्यावर होती, तेव्हां त्याचीं आईबापें प्रतिवर्षी वल्हांडण सणाला यरूशालेमास जात होतीं, आणि जेव्हां तो बारा वर्षांचा झाला तेव्हां तीं सणाच्या रीतिप्रमाणे यरूशालेमास गेलीं. मग ते दिवस समाप्त करून तीं माघारें जात्या वेळेस तो मूल येशू यरूशालेमामध्यें मागें राहिला; हें योसेफाला व त्याच्या आईला कळलें नव्हतें, परंतु तो संगत्यांत आहे असें तीं लेखून दिवसभर वाट चालून गेलीं. नंतर नातलग व ओळखी यांमध्यें त्यांनी त्याचा शोध फार केला परंतु तो त्यांस न सांपडला, ह्मणून तीं त्याचा शोध करीत यरूशालेमास माघारें गेलीं; आणि तीन दिवसांनंतर असें झालें कीं तो उपदेशकांमध्यें बसलेला त्यांचें ऐकतां व त्यांस प्रश्नहि करितां ह्यांस सांपडला. तेव्हां ज्या सर्वांनी त्याचें ऐकलें ते त्याचीं बुद्धि आणि उत्तरें यांवरून थक्क झाले. तेव्हां हीं त्याला पाहून विस्मित झालीं आणि त्याची आई त्याला बोलली, हे मुला त्वां आह्मासीं असें कां केलें? पाहा तुझा बाप आणि मी खेदित होऊन तुझा शोध करीत

होतों. तेव्हां येशू त्यांस बोलला, तुह्मीं कशासाठीं माझा शोध केला? माझा बाप जो भगवान् त्याच्या हातांत मला सादर व्हावें लागतें. हें तुह्मास ठाऊक नाहीं कीं काय? परंतु त्यानें जी गोष्ट त्यांस सांगितली ही तीं समजलीं नाहींत. मग तो त्यासंगातें उतरून नाजारेथास आला आणि त्याच्या आज्ञेंत होता; परंतु त्याच्या आईनें ह्या सर्व गोष्टी आपल्या चित्तांत ठेविल्या, आणि येशू ज्ञानांत व वाढ्यांत आणि देव व माणसें यांच्या कृपेंत वाढता झाला.

मग तिबेरयस कादसार याच्या अधिकाराच्या पंध्राव्या वर्षीं पंतयस पिलातस यहूदाचा अधिकारी असतां आणि हेरोद गालीलाचा चौथाईदार असतां आणि त्याचा भाऊ फिलोप्पस इतूराई व त्राखोनितीस या देशांचा चौथाईदार असतां आणि लुसानयास आबिलेनेचा चौथाईदार असतां, हान्नान व कायाफा यांच्या मुख्य उपाध्यपणांत, देवाची गोष्ट जखार्याचा पुत्र जो योहान्न त्याजवळ रानामध्यें प्राप्त झाली. आणि तो पापांच्या सुटीसाठीं पश्चात्तापाचा बाप्तिस्मा गाजवितां यार्देनेच्या सर्व जवळच्या जाग्यांत असा आला. जसें भविष्यवाद्यांच्या ग्रंथांमध्यें लिहिलें आहे कीं, पाहा मी आपल्या दूताला तुह्मापुढें पाठवितों; तो तुह्मा मार्ग सिद्ध करील. रानांत कोणीएका हाक मारणाराची वाणी झाली कीं, तुह्मी प्रभूचा मार्ग सिद्ध करा आणि

त्याच्या वाटा नीट करा. प्रत्येक खोरा भरला जाईल आणि प्रत्येक डोंगर व टेंकडी नीच केलीं जातील; जीं वांकडीं तींहि सरळ होतील, आणि जे मार्ग खबरीत आहेत ते गुळगुळीत होतील, आणि सगळे लोक देवा कडलें तारण पाहतील.

आणि त्याच योहान्नाचें वस्त्र उंठाच्या लवेचें होतें, आणि त्याच्या कंबरेभोंवता कातड्याचा कंबरकसा होता, आणि त्याचें अन्न टोळ व रानीमध होतें. तेव्हां यरूशालेम आणि सर्व यहूदा आणि यार्देनेचे चहूंकडील अवघे लोक निघून त्याच्या जवळ गेले, आणि आपल्या पापांस पत्करून यार्देनेमध्यें त्यापासून बाप्तिस्मा झाले. परंतु फारिशी व सादूकी यांतील बहुतांस आपल्या बाप्तिस्म्यासाठीं येतां पाहून तो त्यांस बोलला, अहो सापाचें वंश, तुह्मास होणार क्रोधापासून पळावयास कोणी उपदेशिलें आहे? तर मन पालटणें यास योग्य फळें जीं तीं द्या. आणि आब्राहाम आमचा बाप आहे असें आपणांमध्यें बोलावयास योग्य मानूं नका, कां कीं मी तुह्मास असें ह्मणतों कीं आब्राहामासाठीं ह्या दगडांपासून लेंकरें उठवावयास देव शक्तिमान् आहे. आणि आतांच कुह्राड झाडांच्या मुळाशीं ठेविली आहे, यास्तव प्रत्येक झाड जें चांगलें फळ देत नाहीं तें तोडलेंच जातें आणि अग्नींत टाकलें जातें.

तेव्हां समुदाय त्याला पुसतां बोलला, तर आम्ही काय करावें? मग तो उत्तर देतां त्यांस म्हणतो, ज्याला दोन आंगरखे आहेत तो ज्याला नाहीं त्याला देवो. आणि ज्याला अन्नें आहेत तोहि तसेंच करो. करघेणारेहि बाप्तिस्मी होण्यास आले आणि त्याला बोलले, हे गुरु, आम्ही काय करावें? आणि तो त्यांस बोलला, तुह्मास जें नेमिलें त्याहून कांहीं अधिक उगवूं नका. तेव्हा सैनिकहि त्याला विचारितां बोलले, आह्मीहि काय करावें? मग तो त्यांस बोलले, कोणावर बळात्कार करूं नका, बालांटहि घेऊं नका, आणि आपल्यां वेतनानी तृप्त व्हा. तेव्हां लोक वाट पाहात असतां आणि योहा-न्नाविषयीं हाच ख्रीस्त असेल कीं काय? असें सर्व आपल्या हृदयांत विचार करीत असतां, योहान्न उत्तर देतां सव घ्यांस बोलला, मी पाण्यानें तुमचा बाप्तिस्मा करितों खरा, परंतु मजहून जो शक्तिमान् ज्याच्या जोड्यांचा बंद सोडाव यास मी योग्य नाहीं तो येत आहे, तोच पवित्र आत्म्या कडून आणि अग्नीकडून तुमचा बाप्तिस्मा करील, त्याचें सूप त्याच्या हातांत आहे आणि तो आपलें खळें पूर्ण निर्मळ करील आणि गहूं आपल्या कोठारांत एकवट करील, परंतु भूस न विझत्या अग्नींत जाळून टाकील.

तेव्हां येशू आपण सुमारें तीस वर्षांचा साल्यावर

यार्देनेस योहानाच्याजवळ त्यापासून बाप्तिस्मी होण्याकरितां आला. परंतु योहान त्याला मनाव करून बोलला कीं, मला तुजपासून बाप्तिस्मा घेण्याचें अगत्य आहे आणि तूं मजपाशीं येतोस काय? मग येशू उत्तर देतां त्याला बोलला, आतां होऊं दे, कां कीं सर्व नीति मत असें पूर्ण करणें आम्हास योग्य आहे. तेव्हां त्याने त्याचें होऊं दिलें आणि येशू बाप्तिस्मा घेतल्यावर पाण्या पासून तेव्हांच चढला, आणि पाहा त्याच्यासाठीं आकाशें उघडलीं आणि त्याने देवाच्या आत्म्याला खबुतरासारिखा उतरतां आणि आपणावर येतां पाहिलें, आणि पाहा आकाशांतून वाणी होऊन बोलली, हाच माझा प्रिय पुत्र आहे, त्यामुळें मी फार संतोषित झालों आहें.

तेव्हां येशू पवित्र आत्म्याने भरलेला असतां, यार्देनेपासून माघारें गेला; मग आत्म्याने रानांत नेला असतां द्यावलसाने चाळीस दिवस प्रचीति पाहिली होती, आणि त्या दिवसांत त्याने कांहीं खाल्लें नाहीं. मग ते दिवस समाप्त झाल्यानंतर त्याला भूक लागली; मग द्यावलस त्याला बोलला, जर तूं देवाचा पुत्र आहेस तर हा दगड भाकर व्हावा म्हणून त्याला सांग. तेव्हां येशू त्याला उत्तर देतां बोलला, असें लिहिलें आहे कीं, केवळ भाकरीने माणूस वांचेल असें नव्हे, परंतु देवाच्या प्रत्येक गोष्टीने. नंतर

त्याने त्याला यरूशालेमांत नेलें आणि देवळाच्या पांकळीवर त्याला ठेविलें; मग त्याला बोलला, जर तूं देवाचा पुत्र आहेस तर एथून खालीं उडी टाक, कां तर असें लिहिलें आहे कीं, तुझें संरक्षण करावें म्हणून तो आपल्या दूतांस तुजविषयीं आज्ञा देईल; आणि असें कीं तुझा पाय दगडावर कधीं आपटला न जावा म्हणून ते हातांवर तुला धरतील. तेव्हां येशू उत्तर देतां त्याला बोलला कीं, असें सांगितलें आहे, प्रभु जो तुझा देव त्याची प्रचीति पाहूं नको. मग द्याबलसाने त्याला उंच डोंगरावर नेऊन जगांतील सर्व राज्यें त्यास त्याच क्षणांत दाखविलीं. आणि द्याबलसाने त्याला ह्मटलें, हा अवघाहि अधिकार व त्यांचें गौरव तुला देईन, कां कीं हें माझ्या स्वाधीन ठेविलें आहे आणि ज्या कोणाला मी इच्छितों त्याला हें देतों, यास्तव जर तूं माझ्यासमोर भक्ति करिसील तर सगळीं तुझीं होतील. तेव्हां येशू त्याला उत्तर देतां बोलला हे साटाना, माझ्या मागें हो, कारण असें लिहिलें आहे कीं, प्रभु जो तुझा देव त्याला भज आणि त्याची मात्र सेवा कर. तेव्हां द्याबलस ही सर्व प्रचीति समाप्त करून कांहीं काळपर्यंत त्यापासून गेला, आणि पाहा दूतानी जवळ येऊन त्याची चाकरी केली.

## अध्याय ४.

आणि जेव्हां यहूद्यांनी यरूशालेमापासून उपाध्यांस व लेवींस यासाठीं पाठविलें कीं, तूं कोण आहेस? ह्मणून त्यांनी योहानाला विचारिलें. तेव्हां याची साक्ष हीच आहे कीं त्यानें पत्करिलें आणि नकारिलें नाहीं, मी तो ख्रीस्त नव्हें, असें पत्करिलें. मग त्यांनी त्याला विचारिलें, तर कोण? तूं एलीया आहेस कीं काय? तेव्हां तो ह्मणतो, नव्हे. तर तूं भविष्यभाषी आहेस कीं काय? मग त्यानें उत्तर दिल्हें कीं, नाहीं. तेव्हां ते त्याला बोलले, ज्यांनी आह्मास पाठविलें त्यांस आह्मी उत्तर द्यावें ह्मणून तूं कोण आहेस? आपणाविषयीं काय सांगतोस? तो बोलला, जसें यशाया भविष्यभाष्यानें सांगितलें कीं, प्रभूचा मार्ग नीट करा रानांत अशा गर्जणाऱ्याची वाणी मी आहें. तेव्हां जे पाठविले ते फारिश्यांतील होते, आणि त्यांनी त्याला विचारितांना त्याला ह्मटलें, जर तूं तो ख्रीस्त नाहींस आणि एलीया नाहींस, आणि तूं भविष्यभाषी नाहींस, तर बाप्तीस्मा कां करितोस? योहानानें त्यांस उत्तर दिल्हें कीं, मी पाण्यानें बाप्तिस्मा करितों परंतु जो तुम्हास कळला नाहीं तो तुम्हामध्यें उभा राहिला आहे. तोच हा आहे कीं जो माझ्या मागें येतो तो माझ्या पुढें झाला, त्याच्या जोड्याचे बंद सोडावयास मी

योग्य नाहीं. हीं यार्देनेपलिकडे जेथे योहान्न बाप्तिस्मा करीत होता तेथे बेथाबाऱ्यांत झालीं. दुसऱ्या दिवशीं योहान्न आपल्याजवळ येशूला येतां पाहून ह्मणतो, पाहा देवाचें कोंकरूं, तो जगाचें पाप हरण करितो. हाच तो आहे, ज्याविषयीं मी बोललों कीं माझ्यामागें अशा माणूस येतो कीं माझ्यापुढें झाला, कां तर माझ्या अगोदर होता. आणि म्या त्याला जाणलें नाहीं, परंतु त्याने इस्राएलास प्रगट व्हावें म्हणून जाणलें, यामुळें मी येऊन पाण्याने बाप्तिस्मा करितों. आणि योहान्न साक्ष देतां बोलला कीं, आत्मा आकाशांतून खबुतरासारिखा उतरतां म्या पाहिला आणि तो त्यावर राहिला, आणि म्या त्याला जाणलें नव्हतें, परंतु ज्याने मला पाण्याने बाप्तिस्मा करायास पाठविलें तोच मला बोलला कीं, ज्यावर आत्मा उतरतां त्यावर राहतांहि पाहशील तोच पवित्र आत्म्याने बाप्तिस्मा करणारा आहे; तेव्हां म्या पाहिलें आणि साक्ष दिल्ही कीं हाच देवाचा पुत्र आहे.

दुसऱ्या दिवशीं योहान्न आपल्या दोघा शिष्यांसुद्धां फिरून उभा राहत होता; तेव्हां येशूला चालतां पाहून ह्मणतो, पाहा देवाचें कोंकरूं. आणि त्या दोघा शिष्यांनी त्याचें बोलणें ऐकिलें, मग ते येशूच्यामागें चालले, तेव्हां येशू मुरडून त्यांस मागें येतां पाहून त्यांस ह्मणतो, तुह्मी

काय शोधितां? मंतर ते त्याला बोलले, राब्बी, ह्या अर्थ उतरल्याने ह्मणजे हे गुरु, कोठे राहतोस? तो त्यांस ह्मणतो, या आणि पाहा. ते आले आणि तो कोठे राहतो हें त्यांनी पाहिलें, मग त्या दिवशीं ते त्याच्या जवळ राहिले, तेव्हां सुमारें दाहावी होरा होती. जे दोघे योहान्नाचें ऐकल्यावर त्याच्यामागें चालले, त्यांत शिमोन पेत्रसाचा भाऊ आंद्रेयास एक होता; तो आपला भाऊ शिमोन याला पहिला पावतो आणि याला ह्मणतो, मशीहा, ह्मणजे अर्थ उतरल्याने तो ख्रीस्त, तो आह्मास सांपडला आहे. मग त्याने त्याला येशूजवळ आणिलें; तेव्हां येशू त्याला न्याहाळून बोलला, तूं शिमोन योनाचा पुत्र आहेस, तूं केफा ह्मटला जासील, तो अर्थ उतरतां पेत्रस आहे. दुसऱ्या दिवशीं येशूने गालीलांत जाण्यास इच्छिलें, मग फिलीप्पसाला पावल्यावर तो त्याला ह्मणतो, माझ्यामागें ये. तर हा फिलीप्पस आंद्रेयास व पेत्रस यांच्या नगराचा बेथसाईद्यांतील होता; फिलीप्पस नथाने- लाला पावल्यावर त्याला ह्मणतो, ज्याविषयीं नेमशास्त्रांत मोशाने आणि भविष्यभाष्यांनी लिहिलें तो नाजारेथांतील येशू योसेफाचा पुत्र आह्मास सांपडला आहे. तेव्हां नथानेलाने त्याला ह्मटलें, नाजारेथांतून कांहीं चांगलें होऊं शक्य आहे कीं काय? फिलीप्पस त्याला ह्मणतो,

हे आणि पाहा. येशू आपल्याजवळ नथानेलाला येतां पाहिल्यावर त्याविषयीं ह्मणतो, पाहा इस्त्राएली खरें, त्यांत कपट नाहीं. नथानेल त्याला ह्मणतो, मला कोठून जाणतोस? येशूने उत्तर देतांना त्याला म्हटलें, फिलिप्पसाने तुला बोलाविल्यापूर्वीं तूं अंजिराखालीं असतां म्या तुला पाहिलें. नथानेल उत्तर देतांना त्याला ह्मणतो, हे राब्बी, तूं देवाचा पुत्र आहेस, तूं इस्त्राएलाचा राजा आहेस. येशूने उत्तर देतांना त्याला म्हटलें, म्या तुला अंजिराखालीं पाहिलें हें तुला सांगितलें, यावरून विश्वास धरितोस कीं काय? यांहून मोठें पाहसील. आणि तो त्याला म्हणतो, मी तुह्मास खचीत खचीत सांगतों, यापुढें आकाश उघडलेलें आणि देवाचे दूत माणसाच्या पुत्राविषयीं चढतां व उतरतां पाहाल.

आणि तिसऱ्या दिवशीं गालीलांतील कान्यांत लग्न होतें, तेव्हां येशूची आई तेथे होती, आणि येशूहि व त्याचे शिष्य त्या लग्नास बोलाविले होते. मग द्राक्षारस खुटला असतां येशूची आई त्याला म्हणती, त्यांजवळ द्राक्षारस नाहीं. येशू तिला म्हणतो, हे स्त्री मला व तुला काय? आजून माझी घटका आली नाहीं. त्याची आई सेवकांस ह्मणती, जें कांहीं तो तुह्मास सांगेल तें करा. तेव्हां यहूद्यांच्या शुद्ध करण्याप्रमाणे ठेविलेल्या पाण्याच्या साहा दगडी कुंड्या

पृथक्पृथक् दोन किंवा तीन मण मावत्या तेथें होत्या. येशू त्यांस ह्मणतो, त्या कुंड्या पाण्यानें भरा, मग त्यांनी त्या वरपर्यंत भरल्या. तेव्हां तो त्यांस ह्मणतो, आतां त्यांतून काढून जेवणकारभाऱ्याजवळ न्या, आणि त्यांनी नेलें. मग द्राक्षारस झालेलें पाणी तें जेवणकारभाऱ्यानें जेव्हां चाखलें आणि कोठून हें जाणलें नाहीं, परंतु ज्या सेवकांनी पाणी काढिलें त्यांस ठाउक होतें. तेव्हां जेवण कारभाऱ्यानें नवऱ्याला बोलाविलें आणि त्याला ह्मणतो, प्रत्येक माणूस चांगला द्राक्षारस प्रथम वाढितो, मग बहुत प्याल्यानंतर जो कनिष्ठ तो, परंतु त्वां उत्तम द्राक्षारस आतांपर्यंत ठेविला आहे. येशूनें चमत्कारांचा हा प्रारंभ गालीलांतील कान्यामध्यें केला, आणि आपलें गौरव प्रगट केलें, तेव्हां त्याचे शिष्य त्यावर विश्वासले. यानंतर तो व त्याचे भाऊ व त्याचे शिष्य कापेर्णाह्मास खालीं गेले, परंतु बहुत दिवस तेथें राहिले नव्हते.

## अध्याय ५.

आणि यहूद्यांचा वल्हांडण सण जवळ होता. तेव्हां येशू यरूशालेमास चढला. मग देवळांत गुरें व मेंढ्रें व पारवे यांचे विकणारे व नाणावटी बसलेले त्याला आढळले. तेव्हां त्यानें लाहान दोऱ्यांचा कोरडा करून त्या सर्वांस आणि मेंढ्रें व गुरें यांस देवळांतून घालविलें,

गाणाऱ्यांचा पैकाहि उधळिला आणि चौरंग उलथिले, पारव्यांच्या विकणाऱ्यांसहि ह्मटलें, हीं एथून काढा, माझ्या बापाचें घर व्यापाराचें घर करूं नका. तेव्हां त्याच्या शिष्यां नी आठवण केली कीं असें लिहिलें आहे, तुझ्या घराच्या आवेशानें मला खाऊन टाकिलें आहे. तेव्हां यहूदी उत्त र देतांना त्याला बोलले कीं, तूं हीं करितोस याविषयीं आ ह्मास काय साक्षात्कार दाखवितोस? येशू उत्तर देतांना त्यांस बोलला, ह्या देवळाला मोडा, मग तीन दिवसांत याला उभारीन. यास्तव यहूदी बोलले, या देवळाला बांधावयास सेचाळीस वर्षें लागलीं, तर तूं तीन दिवसांत याला उभारि सील कीं काय? परंतु तो आपल्या शरिराच्या देवळाविषयीं बो लला. यास्तव तो मेलेल्यांमधून उठल्यावर त्याच्या शिष्यांनी आठवण केली कीं त्यानें त्यांस असें ह्मटलें होतें; मग त्यांनी लेखावर आणि येशूनें जी गोष्ट म्हटली तिजवर विश्वास ठे विला. तेव्हां तो वल्हांडणाच्या सणास यरूशालेमांत असतां बहुतांनी त्याचे केलेले जे चमत्कार ते पाहून त्याच्या नावावर विश्वास ठेविला. परंतु येशू स्वतां आपणाविषयीं त्यांस विश्वासला नाहीं, यास्तव कीं त्यानें सर्वांस जाणलें आण खो कोणी माणसाविषयीं साक्ष द्यावी असें त्याला अ गत्य नव्हतें, कारण कीं माणसांत काय आहे, हें तो सम जला.

तेव्हां फारिशांतील माणूस ज्याचें नाव निकदेमस यहूद्यां
चा अधिकारी असा होता; तो रात्रीं येशूजवळ आला, मग
त्याला बोलला, हे रब्बी, तूं उपदेशक देवापासून आलास
हें आम्हास कळतें, कारण जे चमत्कार तूं करितोस हे कोणी
आपल्यासहित देव असल्यावांचून करूं शकत नाहीं. येशू
उत्तर देतांना त्याला बोलला, मी तुला खचीत खचीत सांग
तों, जर कोणी पर्ढून न जन्मला तर तो देवाचें राज्य पाहूं
शकत नाहीं. निकदेमस त्याला बोलतो, माणूस म्हातारा
असतां जन्म घेऊं कसें शकतो? तो आपल्या आईच्या पोटांत
दुसऱ्याने शिरून जन्म घ्यावयास शक्तिमान् आहे कीं काय? ये
शूने उत्तर दिल्हें कीं, मी तुला खचीत खचीत सांगतों, जर
कोणी पाण्यापासून आणि आत्म्यापासून न जन्मला तर तो दे
वाच्या राज्यांत जाऊं शकत नाहीं. जें मांसापासून जन्मलें तें
मांस आहे, आणि जें आत्म्यापासून जन्मलें तें आत्मा आहे.
तुम्हास पर्ढून जन्मलें पाहिजे हें म्या तुला सांगितलें ह्मणून नव
ल मानूं नको, वारा जिकडे इच्छितो तिकडे वाहातो आणि
तूं त्याचा शब्द ऐकतोस, परंतु कोठून येतो आणि कोठें जातो
हें तुला कळतें नाहीं; प्रत्येक जो आत्म्यापासून जन्मला तो त
सा आहे. निकदेमस उत्तर देण्याने त्याला बोलला, हीं
कशीं घडूं शकतात? येशू उत्तर देण्याने त्याला बोलला तूं
इस्राएलांतील उपदेशक आहेस आणि हीं न जाणतोस

कीं काय? मी तुह्मां खचीत खचीत सांगतों कीं, जें आह्मास कळतें तें आह्मी बोलतों, आणि जें आह्मी पाहिलें त्याविषयीं साक्ष देतों, परंतु तुह्मी आमची साक्ष न घेतां. जर या पृथ्वीवरल्या जीं तीं तुह्मास सांगितलीं आहेत आणि तुह्मी विश्वास न धरितां, तर मी आकाशा वरलीं तीं तुह्मास सांगितल्यास तुह्मी विश्वास कसा धराल? आणि आकाशांतून उतरलेला माणसाचा पुत्र जो आका शांत असतो ह्यावांचून कोणी आकाशांत चढला नाहीं.

आणि जसें मोश्याने रानांत साप उंच केला, तसें माण साच्या पुत्राला यासाठीं उंच केलें पाहिजे कीं त्याजवर जो कोणी विश्वास ठेवितो त्याने नाशास न जावें, परंतु त्याला सर्वकाळचें जीवन व्हावें. यास्तव देवाने जगावर एवढी प्रीति केली कीं त्याने आपला एकुलता पुत्र यासाठीं दिल्हा कीं, त्याजवर जो कोणी विश्वास ठेवितो त्याने नाशास न जावें, परंतु त्याला सर्वकाळचें जीवन व्हावें; कां तर देवाने आपल्या पुत्राला जगांत पाठविलें, हें जगाचा दंड ठरवावा ह्मणून नव्हे, परंतु त्याजकडून जग तारलें जावें, ह्मणून. त्याजवर जो विश्वास ठेवितो त्याचा दंड ठरविला जात नाहीं, परंतु जो विश्वास ठेवीत नाहीं त्याचा आतांच दंड ठरलेला आहे; कां तर त्याने देवाच्या एकुलत्या पुत्राच्या नावावर विश्वास ठेविला नाहीं. आणि तें दंड

ठरविणें हेंच आहे कीं जगांत उजेड आला असतांना माण साणी उजेडापेक्षां अंधाराची आवड धरिली, कारण कीं त्यांचीं करणीं दुष्ट. कां तर जो कोणी वाईट करितो तो उजेडाचा द्वेष करितो, आणि आपलीं करणीं निषेधलीं न जावीं म्हणून उजेडाजवळ येत नाहीं. परंतु जो खरे पण करितो तो उजेडाजवळ असा येतो कीं त्याचीं करणीं देवाकडून घडलीं आहेत, हें उघडें व्हावें.

यानंतर येशू आपल्या शिष्यांसुद्धां यहूददेशांत आला, आणि तेथे त्याने त्यांच्यासंगतीं राहतांना बाप्तिस्मा केला. आणि शालिमाजवळच्या एनोनांत बहुत पाणीं होतीं, यास्तव योहान्नहि तेथे बाप्तिस्मा करीत होता. तेव्हां त्यानी येऊन बाप्तिस्मा घेतला, कां तर योहान्न तोंपर्यंत बंदि शाळेंत टाकिला नव्हता. यास्तव शुद्ध करण्याविषयीं यहू दांशीं योहान्नाच्या शिष्यांतल्यांचा विवाद झाला. तेव्हां ते योहान्नाजवळ येऊन त्याला बोलले, हे राब्बी, जो यार्देनेपलिकडे तुझ्यासंगतीं होता, ज्याची त्वां साक्ष दि ल्ही, पाहा तो बाप्तिस्मा करितो आणि सर्व त्याजवळ ये तात. योहान्न उत्तर देण्याने बोलला, जर माणसाला आ काशांतून दिलें नसेल, तर तो कांहीं घेऊं शकत नाहीं. तुम्ही स्वतां माझी साक्ष देतां कीं म्या म्हटलें, मी तो ख्रीस्त नव्हे परंतु त्याच्यापुढें पाठविलेला आहें. ज्याला नवरी आहे

तो नवरा आहे, आणि नवऱ्याचा मित्र जो उभा राहतांना त्याचें ऐकतो तो नवऱ्याच्या शब्दाकरून फार आनंदतो याकरून माझा आनंद पूर्ण झाला आहे. त्याला थोर होत जाणें परंतु मला लाहान होत जाणें लागतें; जो वरून येतो तो सर्वांवर आहे, जो जगापासून होतो तो जगाचा आहे आणि जगाविषयीं बोलतो. जो आकाशांतून येतो तो सर्वांवर आहे आणि त्याने जें पाहिलें व ऐकिलें ती साक्ष देतो, परंतु त्याची साक्ष कोणी धरीत नाहीं. त्याची साक्ष जो धरितो त्याने देव खरा आहे म्हणून शिक्का केला आहे, कारण कीं ज्याला देवाने पाठविलें तो देवाच्या गोष्टी बोलतो, कां तर देव त्याला आत्मा परिमिताने देत नाहीं. बाप पुत्रावर प्रीति करितो आणि त्याने अव घीं त्याच्या हातीं दिल्हीं आहेत. जो पुत्रावर विश्वास ठेवितो त्याला सर्वकाळचें जीवन आहे. आणि जो पुत्राला मानीत नाहीं तो जीवन पाहणार नाहीं परंतु देवाचा राग त्यावर राहील. त्याने तरीं बहुतप दुसरेंहि संबोध करितां लोकांस शुभवर्त्तमान सांगितलें.

## अध्याय ६.

मग योहान्न पराधीन ठेवल्यानंतर येशू देवाच्या राज्याचें शुभवर्त्तमान गाजवितां गालीलांत आला, आणि त्याला शोमरोनावरून जावें लागलें. तेव्हां जें शेत याकोबाने

आपल्या योसेफ पुत्राला दिलें त्याच्याजवळ शोमरोनाचें सुखार म्हटलेलें नगर तेथें तो येतो, आणि तेथें याकोबाची विहीर होती, यास्तव येशू चालण्यानें भागला असतां त्या विहिरीजवळ तसाच बसला. सुमारें दुपार होती; शोमरोनांतील स्त्री पाणी काढावयास येती. येशू तिला ह्मणतो, मला प्यावयास दे; त्याचे शिष्य तर अन्न विकत घ्यावयास नगरांत गेले होते. यास्तव ती शोमरोनी स्त्री त्याला बोलली, मी शोमरोनी स्त्री असतां तूं यहूदी असून माझ्याजवळ प्यावयास कसें मागतोस? यहूदी तर शोमरोन्यांसीं वहिवाट करीत नाहींत. येशू उत्तर देण्यानें तिला बोलला, देवाचें दान, हें आणि मला प्यावयास दे असें जो तुजसीं बोलतो तो कोण आहे, हें जर तुला कळलें असतें, तर त्वां त्यापासीं मागितलें असतें आणि त्यानें तुला जिववान् पाणी दिलें असतें. ती स्त्री त्याला बोलती, हे प्रभू तुला पोहरा नाहीं आणि विहीर खोल आहे, यास्तव तुझ्याजवळ जीवनाचें पाणी कोठून आहे. आमचा पितर याकोब यापेक्षां तूं मोठा आहेस कीं काय? त्यानें आह्मास ही विहीर दिल्ही आणि हिचें तो स्वतां आणि त्याचे पुत्र आणि त्याचीं ढोरें प्यालीं. येशू उत्तर देण्यानें तिला बोलला, जो कोणी ह्या पाण्यांतून पिता त्याला फिरून तान्हा लागेल, परंतु जें पाणी मी देईन

त्यांतून जो पितो त्याला तान्हान कधींहि लागणार नाहीं. अणखी जें पाणी मी त्याला देईन तें त्यामध्यें अनं-कालिक जीवनासाठीं उपळत्या पाण्याची विहीर होईल. स्त्री त्याला ह्मणती, हे प्रभू, मला तान्हान न लागावी आणि काढावयास ह्या एथे न यावें, ह्मणून तें पाणी मला दे. येशू तिला म्हणतो, जा तुझ्या नवऱ्याला बोला-वून इकडे ये. ती स्त्री उत्तर देण्याने बोलली, मला नवरा नाहीं. येशू तिला ह्मणतो, बरें बोललीस कीं मला नवरा नाहीं, कारण कीं तुला पांच नवरे झाले आणि जो तुला आतां आहे तो तुझा नवरा नाहीं, हें त्वां खरें म्हटलें. स्त्री त्याला ह्मणती, हे प्रभू तूं भविष्यभाषी आहेस हें मला दिसतें; आमच्या पितरांनी ह्या डोंगरावर भजन केलें, परंतु ज्या जाग्यांत भक्ति केली पाहिजे ती यरूशालेमांत आहे असें तुह्मी ह्मणतां. येशू तिला ह्मणतो, हे स्त्री, तुह्मी जेव्हां, बापाची भक्ति या डोंगरांत आणि यरूशालेमांतहि न कराल, अशी वेळ येत आहे ह्मणून मजवर विश्वास ठेव. तुम्ही कशास भजतां तें तुह्मास कळलें नाहीं; आम्ही कशास भजतों तें आह्मास कळलें, कां कीं तारण यहूद्यांतून आहे. परंतु अशी वेळ येती आणि आतां आहे कीं तींत खरे भजणारे आत्म्याने व सत्यतेने बापाला भजतील, यास्तव कीं बापस आपल्याला असें

भजन करणाऱ्यांस शोधितो; जो देव तो आत्मा आहे, आणि जे त्याला भजतात त्यांनी आत्मा व खरेपण यांकडून भजलें पाहिजे. बायको त्याला ह्मणती, मशीहा जो ख्रीस्त ह्मटला तो येत आहे हें मला कळलें; तो आल्यावर आह्मास अवघीं विस्तारानें सांगेल. येशू तिला म्हणतो, तोच तुजशीं बोलतो मी आहें.

आणि त्यावर त्याचे शिष्य आले आणि तो स्त्रीशीं बोलत होता यास्तव त्यांनी आश्चर्य केलें; तथापि तूं काय शोधितोस? किंवा तिजशीं कां बोलतोस? असें कोणी म्हटलें नाहीं. तेव्हां स्त्री आपली घागर ठेवून नगरांत गेली, मग लोकांस ह्मणती, या, जितकीं म्या केलीं तीं अवघीं ज्यानें मला सांगितलीं, त्या माणसाला पाहा, तोच ख्रीस्त आहे कीं नाहीं? यास्तव ते नगरांतून निघून त्याजवळ आले आणि त्या अंतरांत शिष्यांनी त्याला विनंती केली कीं, हे राब्बी जेव. परंतु तो त्यांस बोलला, जें अन्न तुम्हास कळलें नाहीं तें मला खावयाला आहे; यास्तव शिष्यांनी आपल्यांमध्यें म्हटलें, काय कोणी त्यासाठीं खावयाला आणिलें? येशू त्यांस ह्मणतो, ज्यानें मला पाठविलें त्याच्या इच्छेप्रमाणे म्या करावें आणि त्याचें काम सिद्धीस न्यावें, हें माझें अन्न आहे. अद्याप चार महिन्यांचा अवकाश आहे, मग कापणी येती असें तुह्मी म्हणतां क

नाहीं? पाहा, मी तुम्हास म्हणतों तुमचे डोळे वर करून शेतांस न्याहाळा, यास्तव कीं आतांच तीं कापणीसाठीं पांढरीं आहेत. आणि कापणारा वेतन पावतो आणि सर्वकाळच्या जीवनासाठीं फळ एकवट करितो, असें कीं पेरणाऱ्यानें आणि कापणाऱ्यानेंहि एकवट आनंद करावा, कां तर यांत ही म्हण खरी आहे कीं, एक पेरितो आणि दुसरा कापितो. ज्यांवर तुम्ही श्रम केले नाहींत तीं कापा वयाला म्या तुम्हास पाठविलें; दुसऱ्यांनी श्रम केले आणि त्यांच्या श्रमांत तुम्ही शिरलां आहां. तर त्या स्त्रीनें साक्ष दिल्ही कीं, जितकीं म्या केलीं तीं अवघीं त्यानें मला सांगितलीं, असें असतां त्या नगरांतील बहुत शोमरोन्यांनी तिच्या गोष्टीवरून त्यावर विश्वास ठेविला. यास्तव शोमरोन्यांनी त्याजवळ आल्यावर आपल्यासंगतीं त्यानें राहावें म्हणून त्याला विनंती केली, आणि तो तेथे दोन दिवस राहिला. तेव्हां त्याच्या गोष्टीवरून बहुत अधिक विश्वासले आणि त्या स्त्रीला बोलले कीं आतांपासून तुझ्या बोलण्यावरूनच आम्ही विश्वास न धरितों, कां तर आम्ही स्वतां ऐकिलें, आणि ख्रीस्त जो जगाचा तारणारा तो हाच आहे खरें, हें आम्हास कळलें

मग दोन दिवसांनंतर तो तेथून निघाला आणि एकिकडे गालीलांत गेला, आणि देवाच्या राज्याचें शुभवर्त्तमान

घोषण करीत बोलला कीं, समय पूर्ण झाला आहे आणि देवाचें राज्य जवळ आलें आहे, तुह्मी पश्चात्ताप करा आणि ह्या शुभवर्त्तमानावर विश्वास ठेवा. तेव्हां त्याच्याविषयीं आवई संपूर्ण चहुकडल्या ठिकाणीं बाहेर गेली, कां तर येशूने स्वतां साक्ष दिल्ही कीं, भविष्यभाष्याला आपल्या कुळस्थानांत सन्मान नाहीं. तर तो गालीलांत आला; नंतर गालीलांनी त्याला यावरून अंगिकारिलें कीं त्याने यरुशालेमांमध्यें सणांत जीं अवघीं केलीं तीं ह्यांनी पाहिलीं होतीं, कां तर हेहि सणास आले होते. तर येशू फिरून गाली लांतील काना, जेथे त्याने पाणी द्राक्षरस केला तेथे गेला. तेव्हां कोणी राजमान्य होता, त्याचा पुत्र कापेर्णाहूमांत दुख णेकरी होता, त्याने ऐकिलें कीं येशू यहूदाहून गालीलांत आला यास्तव हा त्याजवळ गेला आणि त्याने खालीं येऊन त्याच्या पुत्राला निरोगी करावें, ह्मणून त्याला विनंती केली, कां तर तो मरणार होता. यावर येशू त्याला बोलला, तुह्मी चमत्कार व उत्पात पाहिल्यावांचून विश्वास नच धर णार. राजमान्य त्याला ह्मणतो, हे प्रभू, माझा मूल मेल्या अगोदर खालीं ये. येशू त्याला ह्मणतो, जा तुझा पुत्र वांचतो; तेव्हां येशूने जी गोष्ट त्याला ह्मटली तिजवर तो माणूस विश्वास धरून गेला. मग तो खालीं जात असतां रस्त्यांत त्याचे चाकर त्याला भेटले आणि त्यांनी सांगतां

म्हटलें कीं, तुझा मूल वांचतो. यास्तव कोणत्या घटकेंत त्याला कांहीं उतार पडला, हें त्याने त्यांजवळ पुसलें; आणि त्यांनी त्याला म्हटलें कीं, काल सातव्या होरेंत तापाने त्याला सोडिलें. यास्तव ज्या घटकेंत येशूने त्याला सांगितलें कीं, तुझा पुत्र वांचतो, त्यांत हें झालें म्हणून बापाने आणलें, आणि त्याने व त्याच्या सर्व घराण्याने विश्वास धरिला. फिरून येशूने यहूदांतून गालीलांत येऊन हा दुसरा चमत्कार केला, आणि तो त्यांच्या सभां मध्यें उपदेशीत असतां सर्वांकडून गौरविला गेला.

## अध्याय ७.

मग येशू ख्रीस्त जेथे त्याचा प्रतिपाळ झाला होता तेथे नाझारेथांत आला, आणि आपल्या चालीप्रमाणे शब्बाथ दिवशीं सभेंत गेला, नंतर वाचावयास उभा राहिला. तेव्हां भविष्यभाषी यशाया याचें पुस्तक त्याला दिलें गेलें, आणि त्याने पुस्तक उघडून असें ठिकाण काढिलें कीं तेथें हें लिहिलें होतें, दरिद्र्यांस शुभवर्तमान सांगावयास प्रभूने मला अभिषेक केला आहे, यास्तव त्याचा आत्मा मजवर आहे, हृदय फुटलेल्यांस बरें करावयास, पाडाव माणसांस सुटणें आणि आंधळ्यांस दृष्टि पावणें, हीं गाजवायास; चेंचलेल्यांस मोकळिकेने लावावयास, प्रभूचें मान्य वर्ष गाजवायास त्याने मला पाठविलें आहे. तेव्हां तो

पुस्तक गुंडाळून सेवकाजवळ देऊन बसला. आणि सभेमध्यें सर्वांचे डोळे त्याजकडे लागले होते. मग तो त्यांस बोलता झाला कीं, आज हा लेख तुमच्या कानांत पूर्ण झाला आहे. तेव्हां सर्वांनी त्याजविषयीं साक्ष दिल्ही, आणि ज्या कृपेच्या गोष्टी त्याच्या मुखांतून निघाल्या त्यावरून आश्चर्य पाहून झटलें, हा योसेफाचा पुत्र नाहीं कीं काय? नंतर तो त्यांस बोलला, सर्वथा तुह्मी हा दाखला मला ह्मणाल, हे वैद्या, तूं आपणाला निरोगी कर, कापेर्णाहूमांत झालेली जितकीं आह्मी ऐकिलीं, तितकीं एथे आपल्या देशांत कर. तेव्हां तो बोलला, मी तुह्मास खचीत सांगतों कीं कोणी भविष्यभाषी आपल्या देशांत मान्य नाहीं. आणि मी तुह्मास खरेपणानें ह्मणतों एलीयाच्या दिवसांत जेव्हां तीन वर्षें आणि साहा महिन्यांपर्यंत आकाश असें बंद झालें कीं सर्व देशामध्यें मोठा दुकाळ झाला; तेव्हां इस्राएलांत बहुत विधवा होत्या, परंतु त्यांतील कोणतीच्या जवळ एलीया पाठविला नव्हता, केवळ सीदोनाकडील सारफाथ, यांत विधवा बायको हिच्या जवळ पाठविला होता. आणि भविष्यभाषी अलीशा याच्या वेळेस इस्राएलांत बहुत कोढी होते; परंतु त्यांतील कोणी शुद्ध केला नव्हता, केवळ नामान जो अरामी तो माच शुद्ध केला. तेव्हां सभेमध्यें सर्व हीं ऐकून रागें भरले,

आणि उठून त्याला नगराच्या बाहेर घालविलें; मग ज्या डोंगरावर आपलें नगर रचिलें होतें, त्याच्या कड्यावरून लोटून द्यावयासाठीं त्याला नेलें, परंतु तो त्यांच्या मधून निघून गेला.

आणि नाजारेथ सोडून जबुलून आणि नाफ्ताली यांच्या शिंवारांत समुद्राच्या जवळील कापेर्णाहूमांत येऊन राहिला; कारण कीं यशाया भविष्यभाष्यानें जें ह्मटलें तें पूर्ण व्हावें; कीं जबुलून प्रांत आणि नाफ्ताली प्रांत यार्देनेवरील समुद्राच्या वाटेंत परप्रजांच्या गालीलांत जे लोक अंधारांत बसलें, त्यानी मोठा उजेड पाहिला; आणि जे मरणाचा देश व सावली यांत बसले त्यांस उजेड उगवला आहे.

आणि समुदाय देवाची गोष्ट ऐकावयास त्याजवर लोटला, तेव्हां असें झालें कीं तो गेन्नेसारेत सरोवराजवळ उभा होता, आणि त्यानें कडेस दोन तारवें पाहिलीं, तेव्हां धीवर त्यांवरून उतरले असतां जाळीं धूत होते. आणि त्या तारवांमधील एक जें शिमोनाचें होतें, त्यावर त्यानें चढून कांठापासून थोडें पलिकडे लोटावें ह्मणून त्याजवळ मागितलें; मग त्यानें बसून समुदायांस तारवांतून उपदेश दिल्हा. नंतर त्यानें बोलणें समाप्त केल्यावर शिमोनाला ह्मटलें, पुढें खोलवटींत लोट आणि धरण्यासाठीं आपलीं जाळीं खालीं सोडा. तेव्हां शिमोन त्याला उत्तर

देतां बोलला, हे स्वामी, आम्ही सारी रात्र श्रम करून कांहीं मिळालें नाहीं, परंतु तुझ्या शब्दावरून जाळें खालीं सोडितों. मग त्यांनी हें केल्यावर मास्यांचा मोठा घोळका वेढिला आणि त्यांचें जाळें फाटूं लागलें. तेव्हां दुसऱ्या तारवांमध्यें जे भागीदार त्यांनी येऊन ह्यांचें साह्य करावें, ह्मणून ह्यांनी त्यांस खुणाविलें; मग ते आले आणि त्यांनी दोन्ही तारवें एवढीं भरलीं कीं तीं बुडूं लागलीं. तेव्हां शिमोनपेत्रस पाहून येशूच्या गुडघ्यांजवळ पडून बोलला, हे प्रभू मी पापी माणूस आहें, यास्तव माझ्यापासून जा; कां कीं मास्यांची धरणी जी त्यांस मिळाली होती ती पाहून त्याला. व त्याजवळच्या सर्वांस विस्मयानें व्यापिलें. आणि जेबेदीचे पुत्र याकोब व योहान्न जे शिमोनाचे भागीदार होते त्यांसहि तसेंच झालें. आणि येशू त्यांस बोलला तुह्मी माझ्या मागें या ह्मणजे तुम्ही माणसांचे धीवर व्हाल असें मी तुम्हास करीन. नंतर ते तेव्हांच आपलीं जाळीं सोडून त्याच्यामागें गेले. मग त्यानें कांहीं पुढें जाऊन जेबेदीचा पुत्र याकोब आणि त्याचा भाऊ योहान्न तारवावर जाळीं नीट करीत होते त्यांस पाहिलें आणि तेव्हांच त्यांस बोलाविलें, मग ते आपला बाप जो जेबेदी त्याला मोलकऱ्यांसुद्धां तारवांत सोडून त्याच्या मागें गेले. तेव्हां ते कापेर्नाह्मांत गेले; आणि लागलाच त्यानें शाब्बाथ दिवशीं मंड

सभास्थानांत जाऊन उपदेश केला. आणि ते त्याच्या उपदेशावरून विस्मित झाले कारण कीं ज्याला अधिकार आहे त्यासारखा त्याने त्यांस उपदेश केला शास्त्र्यांसारखा केला नाहीं. तेव्हां अशुद्ध आत्म्याने संयुक्त असा एक मनुष्य त्यांच्या मंडळामध्यें होता; तो ओरडून बोलला, हे येशू नाजारेथकरा आम्हांस असूं दे आम्हांशीं आणि तुजशीं काय संबंध? आमचा नाश करावयासाठीं तूं आलास कीं काय? तूं कोण आहेस तें मला कळलें देवाचा पवित्र पुरुष आहेस, तेव्हां येशू त्याला निषेध करून बोलला, तूं उगा राहा आणि त्यांतून निघ. तेव्हां अशुद्ध आत्मा त्याचें आंग पिळवटून मोठ्या स्वराने ओरडून त्यांतून निघाला. मग ते सर्व असे थक्क झाले कीं ते एकमेकांस पुसूं लागले काय आहे हें? काय आहे हा नवीन उपदेश? कारण कीं तो अशुद्ध आत्म्यांसहि अधिकारपूर्वक आज्ञा देतो आणि ते त्याला मानितात. नंतर त्याची आवई तत्काळ बाहेर सर्व गालीलदेशांत पसरली.

मग येशूने पेत्राच्या घरांत येऊन त्याची सासू ज्वराने व्याकूळ होऊन पडलेली अशी पाहिली; तेव्हां त्याने जवळ येऊन तिचा हात धरून तिला उठविलें, आणि तेव्हांच तापाने तिला सोडिलें आणि तिने त्यांची सेवा केली. मग सूर्य मावळल्यानंतर त्यांनी जे सर्व दुखणाईत होते त्यांस

आणि जे भूतग्रस्त होते त्यांस त्याच्याजवळ आणिलें; आणि सर्व नगर दाराशीं मिळालें. तेव्हां नाना प्रकारच्या रोगानी पीडलेले असा बहुत मनुष्यांस त्याने निरोगी केलें; आणि त्याने त्या आत्म्यांस शब्दाने घालीवलें आणि जे सर्व दुखणेकरी होते त्यांस बरें केलें, कीं त्यानेच आमचे विकार घेतले आणि आमचे रोग अंगिकारिले, असें जें यशाया भविष्यभाष्याच्याद्वारें सांगितलें होतें तें पूर्ण व्हावें म्हणून. आणि तो सकाळीं मोठ्या पाहांटेस उठून बाहेर गेला आणि रानांत एकीकडे जाऊन तेथें त्याने प्रार्थना केली. नंतर शिमोन आणि त्याबरोबर जे होते ते त्याच्या मागें गेले. आणि तो त्यांस सांपडल्यावर ते त्याला ह्मणतात कीं सर्व लोक तुझा शोध करितात. तेव्हां तो त्यांस ह्मणतो मी जवळच्या मोठाल्या गांवांतहि सुभवर्त्तमान घोषण करावें म्हणून आपण तेथें जाऊं कारण कीं मी त्यासाठीं निघालों आहें.

## अध्याय. ८

तेव्हां येशू संपूर्ण गालीलांतून त्यांच्या सभांत शिकवीत आणि राज्याचें सुभवर्त्तमान गाजवीत आणि लोकांमध्यें प्रत्येक रोग व प्रत्येक दुखणें यांस बरें करीत फिरला. तेव्हां त्याची कीर्त्ति संपूर्ण सूरांत गेली. आणि त्यानी ज्या सर्वांस विकृति त्यांस, आणि नाना रोगानी व पिडानी धरलेले जे त्यांस, आणि भूतग्रस्त व फेंप्रेकरी व वातरोगी

त्यांस त्याजवळ आणिलें, आणि त्याने त्यांस बरें केलें. आणि गालील व देकापोलीस व यरूशालेम व यहूदा व यार्देनेच्या पलिकडून म्हणजे बहुत समुदाय त्याच्यामागें गेले. आणि तो एक्या नगरांत होता; तेव्हां असें झालें कीं पाहा कोढानें भरलेला माणूस होता आणि तो येशूला पाहून पायांपडतां त्याला प्रार्थीत बोलला, हे प्रभू जर तुझी इच्छा असेल, तर तूं मला शुद्ध करावयास शक्तिमान् आहेस. तेव्हां येशूला करुणा येऊन हात लांब करून त्याला स्पर्श केला आणि त्याला म्हणाला कीं माझी इच्छा आहे तूं शुद्ध हो. तेव्हां तो असें बोलल्यांच कोढ त्यापासून गेलें आणि तो शुद्ध झाला. नंतर त्यानें त्याला तेव्हांच बाहेर लावून दृढ आज्ञा देऊन सांगितलें कीं, तूं जप कोणास कांहीं सांगूं नको तर याजकानें तुला पाहावें म्हणून तूं त्याजवळ जा आणि लोकांजवळ साक्ष पटावी म्हणून मोशानें जे पदार्थ नेमिले आहेत ते तुझ्या शुद्ध होण्याविषयीं अर्पण कर. परंतु तो निघाल्यावर ती गोष्ट असी बहुत गाजवूं आणि पसंरवूं लागला कीं त्याच्यानें प्रगटरूपें नगरांमध्यें पुन: जाववेंलें नाहीं तर बाहेर रानांतल्या जाग्यांत राहिला आणि ते चहूंकडून त्याच्याजवळ आले.

मग कित्येक दिवसांनंतर तो फिरून कापेर्णाहूमांत

बहुत काळ झाला हें जाणून त्याला म्हणतो, तूं निरोगी होण्यास इच्छितोस कीं काय? रोग्याने त्याला असें उत्तर दिल्हें, हे प्रभू, जेव्हां पाणी हालविलें तेव्हां मला तळ्यांत घालावयास कोणी माणूस मला नाहीं, परंतु मी येत आहें तेव्हां दुसरा मझ्या पुढें उतरतो. येशू त्याला ह्मणतो उठ, तूं आपलें आंथरूण उचलून चाल, आणि तेव्हांच माणूस निरोगी झाला आणि आपलें आंथरूण उचलून चालला. तेव्हां त्या दिवशीं शाब्बाथ होता, यास्तव जो निरोगी केला त्याला यहूदी बोलले, शाब्बाथ आहे, तुला आंथरूण न्यावयास योग्य नाहीं. त्याने त्यांस असें उत्तर दिल्हें, ज्याने मला निरोगी केलें त्याने मला सांगि तलें कीं, तुझें आंथरूण उचलून चाल. यावर त्यांनी त्याला पुसलें कीं, तुझें आंथरूण उचलून, असें ज्याने तुला ह्मटलें, तो माणूस कोण आहे? परंतु तो कोण आहे हें निरोगी झाले ह्याला कळलें नाहीं, कारण कीं त्या ठिकाणीं समुदाय असतां येशू निसटला. यानंतर तो देवळांत येशूला मिळाला; तेव्हां त्याने त्याला ह्मटलें, पाहा तूं निरोगी झालास, कांहीं अधिक वाईट तुला न व्हावयास आतां पासून पाप करूं नको. तो माणूस गेला आणि ज्याने त्याला निरोगी केलें तो येशू आहे, हें त्याने यहूद्यांस सांगितलें. मग यामुळें यहूदी येशूच्या पाठीस लागले

आणि त्याला जिवें मारावयास ह्मटले, कां कीं त्याने शाब्बा
थांत हीं केलीं होतीं. परंतु येशूने त्यांस असें उत्तर दिलें
आतां पावेतों माझा बाप काम करितो आणि मी काम
करितों. याशाठीं तर यहूदी त्याला जिवें मारावयास
अधिक ह्मटले, कां कीं त्याने शाब्बाथ मोडला हें केवळ
नव्हे, परंतु देव तो आपला बाप ह्मणून देखील सांगून
त्याने आपणाला देवासमान केलें. यास्तव येशूने उत्तर
देतांना त्यांस ह्मटलें, मी तुह्मास खचीत सांगतों, पुत्र
बापाला कांहीं करितां पाहतो त्यावांचून आपल्या आपण
कांहीं करूं शकत नाहीं; कारण कीं, तो जीं करितो तीं
पुत्रहि आणि त्याप्रमाणें करितो, यास्तव कीं बाप पुत्रावर
प्रीति करितो, आपण जीं अवघीं करितो, तीं त्याला
दाखवितो. आणि तुह्मी आश्चर्य करावें ह्मणून त्याहून
मोठीं कामें त्याला दाखवील, कां तर जसा बाप मेलेल्यांस
उठवितो आणि जिवंत करितो, तसें पुत्रहि ज्यांस इच्छितो
त्यांस जिवंत करितो. अणखी बाप कोणाचा न्याय ठर
वीत नाहीं, परंतु सर्व न्याय पुत्राला याशाठीं दिल्हा कीं
जसा बापाचा सन्मान करितात तसा पुत्राचा सन्मान सर्वांनी
करावा, जो पुत्राचा सन्मान करीत नाहीं, तो त्याच्या
पाठविणाऱ्या बापाचा सन्मान करीत नाहीं. मी तुह्मास
खचीत खचीत सांगतों कीं जो माझी गोष्ट ऐकतो आणि

माझा पाठविणाऱ्यावर विश्वास ठेवितो, त्याला सर्वकाळचें जीवन आहे आणि तो दंडांत येणार नाहीं, परंतु तो मरणापासून जीवनाकडे पार गेला आहे. मी तुह्मास खचीत खचीत सांगतों कीं, अशी वेळ येती आणि आतां आहे कीं तींत मेलेले जे ते देवाच्या पुत्राची वाणी ऐकतील आणि ऐकणारे जिवंत होतील. कारण कीं जसें बापाला आपल्यामध्यें जीवन आहे, तसें त्याणें पुत्रालाहि आपल्या मध्यें जीवन होणें दिल्हें आहे; आणि तो माणसाचा पुत्र आहे यास्तव न्याय ठरविण्याचा अधिकारहि त्याला दिल्हा आहे. यावरून तुह्मी आश्चर्य करूं नका, कां तर वेळ येती कीं तींत सर्व जे मसणांमध्यें ते त्याची वाणी ऐकतील आणि ज्यांनी चांगलीं केलीं ते जीवनाच्या पुनरुठण्यास, आणि ज्यांनी वाईट आचरलीं ते दंडाच्या पुनरुठण्यास बाहेर येतील. मी आपल्या आपण कांहीं करावयास शक्तिमान् नाहीं, जसें ऐकतों तसा न्याय ठरवितों आणि मी आपली इच्छा शोधीत नाहीं, परंतु बाप ज्याने मला पाठविलें त्याची इच्छा, यास्तव माझें ठरविणें न्यायी आहे. जर मी आपणाविषयीं साक्ष देतों तर माझी साक्ष खरी नाहीं; जो मजविषयीं साक्ष देतो असा दुसरा आहे, आणि जी साक्ष तो मजविषयीं देतो ती खरी आहे हें मला कळतें. तुह्मी योहानाजवळ पाठविलें आणि त्याने खरें

पणाची साक्ष दिल्ही, तथापि मी माणसापासून साक्ष घेत नाहीं, परंतु तुह्मी तारले जावें ह्मणून हीं सांगतों. तो पाजळीत व प्रकाशमान् दिवा होता, आणि त्याच्या उजेडांत तुह्मी हर्षावयास घटकाभर मान्य होतां. परंतु योहानाच्यापेक्षां मला मोठी साक्ष आहे, कारण कीं जीं कामें पूर्ण करावयास बापानें मला दिल्हीं तीं जीं कामें मी करितों तीं मजविषयीं साक्ष देतात, कीं बापानें मला पाठविलें आहे. आणि बाप ज्यानें मला पाठविलें त्यानें स्वतां मजविषयीं साक्ष दिल्ही; तुह्मी त्याची वाणी कधींहि ऐकिली नाहीं आणि त्याचें स्वरूप पाहिलें नाहीं, आणि त्याची गोष्ट तुह्मामध्यें राहतां हें तुह्मास नाहीं, कां कीं त्यानें ज्याला पाठविलें त्याजवर तुह्मी विश्वास न ठेवितां. तुह्मी धर्मलेखांची झडती करा, कां तर त्यांकडून सर्वकाळचें जीवन तुह्मास आहे असें तुह्मास वाटतें, आणि जे मजविषयीं साक्ष देतात तेच आहेत; परंतु तुह्मास जीवन व्हावयासाठीं तुह्मी मजकडे येण्यास न इच्छितां. मी माणसापासून गौरव घेत नाहीं, परंतु म्या तुह्मास जाणलें कीं देवावरची प्रीति तुह्मामध्यें नाहीं; मी आपल्या बापाच्या नावानें आलों तथापि तुह्मी मला न घेतां, जर दुसरा आपल्या नावानें येतो तर त्याला तुह्मी घ्याल. तुह्मी एकमेकांपासून गौरव घेत असतां आणि जें गौरव केवळ देवा

जवळ तें न शोधितां, विश्वास धरूं कसें शकतां? मी बापा जवळ तुम्हावर दोष ठेवीन असें कल्पूं नका, तुम्हावर दोष ठेवणारा असा आहे तो मोशे, ज्यावर तुह्मी आशा ठेविली तो. कारण कीं जर तुह्मी मोशावर विश्वास ठेविला असता तर मजवर विश्वास ठेविला असता, कां तर मोशाने मज विषयीं लिहिलें; आणि जर तुह्मी त्याच्या लेखांवर विश्वास न ठेवितां तर माझ्या गोष्टींवर विश्वास कसा ठेवाल?

## अध्याय. १०

मग सणाच्या दुसऱ्या दिवसानंतर प्रथम शाब्बाथांत असें झालें-कीं येशू शिवरांजवळून चालला; तेव्हां त्याच्या शिष्यांनी कणसें तोडलीं आणि हातांवर चोळून खालीं. तेव्हां फारिश्यांमधून कोणी त्यांस बोलिले, शाब्बाथामध्यें जें करावयास योग्य नाहीं तें तुह्मी कां करितां? परंतु येशू त्यांस उत्तर देतां बोलला, दावीदाला आणि जे त्याच्या बराबर होते, त्यांस जेव्हां भूक लागली, तेव्हां त्याने जें केलें हें तुह्मी न वाचलें काय? कीं तो एब्याथार मुख्य उपाध्या याच्या वेळेस देवाच्या घरांत गेला आणि पुढें ठेवायाच्या ज्या भाकरी त्या त्याने व त्याच्या बराबरच्यांनी खाऊं नयेत, केवळ-उपाध्यांनी मात्र खाव्या, त्या त्याने कशा खाल्ला? किंवा नियमशास्त्रांत हें तुह्मी वाचलें नाहीं कीं उपाध्ये देवळांत शाब्बाथ विटाळतां निर्दोषी आहेत?

पण तुह्मास सांगतों कीं देवळापेक्षां एथें एक मोठा आहे, अणखी यज्ञापेक्षां मला दया अवडती असें जर तुह्मी जाणलें असतें तर तुह्मी निर्दोष्यांस अन्यायी ठरविलें नसतें, शाब्बाथ मनुष्यासाठीं ह्मला परंतु मनुष्य शाब्बाथासाठीं नाहीं; यास्तव मनुष्याचा पुत्र शाब्बाथाचाहि प्रभू आहे.

तेव्हां तो तेथून निघून त्यांच्या सभेंत आला आणि तेथें असा माणूस होता कीं त्याचा उजवा हात वाळला होता. आणि पंडित व फारिशी आपणास त्यावर आरोप सांपडावा ह्मणून त्याला जपले, कीं शाब्बाथांत निरोगी करील किंवा नाहीं. परंतु त्याने त्यांचे विचार जाणले आणि ज्या माणसाचा हात वाळला होता त्याला बोलला, उठ आणि मध्यें उभा राहा, मग तो उठून उभा राहिला. आणि ते त्यावर दोष ठेवायाकरितां त्याला विचारून बोलतात कीं, शाब्बाथीं निरोगी करणें हें उचित आहे कीं नाहीं? तेव्हां येशू त्यांस बोलला मी तुह्मास कांहीं पुसतों, शाब्बाथामध्यें बरें करणें किंवा वाईट करणें, प्राण वांचविणें किंवा नाश करणें, कोणतें योग्य? तुह्मामध्यें असा कोण माणूस आहे कीं ज्याला एक मेंढरूं आहे आणि तें शाब्बाथीं खांचेंत पडलें असतां, तो त्याला धरणार व काढणार नाहीं? तर मेंढराहून माणूस केवढा श्रेष्ठ आहे. तेव्हां ते उगे राहिले आणि तो त्यांच्या हृदयांच्या कठीण

पणाकडून भिन्न होऊन त्यांकडे वळून रागानें पाहून त्या माणसाला ह्मणतो तूं आपला हात लांब कर तेव्हां त्यानें तो लांब केला आणि त्याचा हात दुसऱ्या [हाता] सारखा बरा झाला. आणि फारिशांनी बाहेर आऊन हेरोदी लोकांसहवर्त्तमान त्याचा नाश कसा करावा याविषयीं तत्काळ एकत्र मिळून विचार केला.

परंतु येशू आपल्या शिष्यांसहवर्त्तमान समुद्राजवळ निघून गेला आणि गालीलाहून आणि यहूदाहून आणि यरूशालेमाहून आणि एदोमाहून आणि यार्देनेच्या जवळून मोठा मेळा त्याच्या मागें गेला आणि सोर आणि सीदोन या [गावां] जवळचा लोकांचा मोठा समुदाय त्याचीं सर्व कृत्यें ऐकून त्याच्या जवळ आला. तेव्हां लोकांची दाटी होऊन आपण न चेंगरावें म्हणून त्यानें आपल्या शिष्यांस सांगितलें कीं एक मचवा सिद्ध करून ठेवावा. कारण कीं त्यानें बहुत लोकांस निरोगी केलें त्यामुळें ज्यांस ज्यांस पटक्यांचे उपद्रव झाले होते ते ते त्याला स्पर्श करावा म्हणून त्याच्या अंगावर पडले. आणि अशुद्ध आत्म्यांनी जेव्हां त्याला पाहिलें तेव्हां ते त्याच्या पायां पडले आणि आक्रोश करून बोलले कीं तूं देवाचा पुत्र जो तो तूं आहेस, आणि त्यानी आप ल्याला लोकांमध्यें प्रगट करूं नये असी त्याने त्यांस दृढ आज्ञा केली.

त्या दिवसीं असें झालें तो प्रार्थना करावयास डोंगरावर बाहेर गेला, आणि सगळी रात्र देवाची प्रार्थना करीत राहिला. मग दिवस उगवल्यावर तो डोंगरावर चढला; तेव्हां ज्यांस त्यानें इच्छिलें त्यांस जवळ बोलाविलें, आणि ते त्याच्याजवळ गेले. मग त्यानें बाराजणांस यासाठीं नेमलें कीं त्यांनी आपणासहित असावें आणि आपण त्यांस गाजवायास पाठवावें ह्मणून; आणि त्यांस प्रेषित नाव ठेविलें. शिमोन ज्याला त्यानें पेत्रसहि नाव ठेविलें, तो व त्याचा भाऊ आंद्रियास, याकोब जो जेबेदी याचा पुत्र, व योहान जो याकोबाचा भाऊ फिलीप्पस व बार्थलमी, मात्थी व थोमा आल्फीचा याकोब व जो जेलोतस ह्मटला तो शिमोन याकोबाचा भाऊ, यहूदा इस्कारयोते हा परस्वाधीन करणारहि होता. नंतर तो त्यांच्या बराबर खालीं आऊन सपाट ठिकाणीं उभा राहिला. तेव्हां सगळा यहूद व यरूशालेम आणि तोर व सीदोन यांचा समुद्रकांठ यांपासून लोकांच्या मोठ्या भरण्यासुद्धां आपल्या शिष्यांचा समुदाय होता, हे त्याचें ऐकावयास आणि आपल्या रोगांपासून निरोगी होण्यास आले. आणि जे अशुद्ध आत्म्यां कडून चाविले ते आले, आणि बरे केले गेले; सगळा समुदायहि त्याला शिवावयास ह्मटला, कां तर त्यांतील सामर्थ्यानें अवघ्यांस निरोगी केलें.

अध्याय ११.

तेव्हां त्या समुदायास पाहून तो डोंगरावर चढला, आणि तो बसल्यावर त्याचे शिष्य त्याच्याजवळ आले, आणि तो आपलें तोंड उघडून त्यांस शिकवितां बोलला; जे आत्म्याने गरीब ते धन्य, कां कीं आकाशाचें राज्य त्यांचें आहे. जे शोक करितात ते धन्य, कां कीं ते शांति पावतील; जे नम्र ते धन्य, कां कीं ते पृथ्वीचें वतन पावतील; ज्यांस नीतिमत्ताच्या भूक व तान्ह आहेत ते धन्य, कां कीं ते तृप्त होतील. जे दयाळू ते धन्य, कां कीं त्यांवर दया होईल; जे अंतःकरणामध्यें शुद्ध ते धन्य, कां कीं ते देवास पाहतील; जे शांतिकर्ते ते धन्य, कां कीं ते देवाचे पुत्र म्हटले जातील. ज्यांचा पाठलाग नीतिमत्तासाठीं केला जातो ते धन्य, कां कीं आकाशाचें राज्य त्यांचें आहे; जेव्हां तुम्हास निंदतील आणि पाठलाग करितील आणि माझ्यासाठीं तुह्माविरुद्ध सर्व वाईट गोष्टी लबाडीने बोलतील, तेव्हां तुह्मी धन्य आहां. त्या दिवशीं आनंद करा, उडीहि मारा, कां तर पाहा आकाशांमध्यें तुमचें फळ मोठें. परंतु तुह्मा धनवानांस हायहाय, यास्तव कीं तुह्मी आपलें शांतवन भरून पावलां आहां; अहो तृप्त तुम्हास हायहाय, यास्तव कीं तुह्मास भूक लागेल. अहो आतां हांसणारे, तुम्हास हायहाय, यास्तव कीं

तुह्मी खिन्न व्हाल आणि रडाल. जेव्हां सर्व माणसें तुह्मास बरें ह्मणतील तेव्हां तुह्मास हायहाय, यास्तव कीं त्याप्रमाणे त्यांच्या पितरांनी खोट्या भविष्यवाद्यांशीं केलें होतें.

तुम्ही पृथ्वीचें मीठ आहां, परंतु जर मीठ निःसत्व झालें तर त्याला कशाने मीठपणा येईल? बाहेर टाकलें जाणें आणि माणसांनी तुडविलें जाणें यावांचून अणखी कशास योग्य नाहीं. तुह्मी जगाचा उजेड आहां, डोंगरावर वसलेल्या नगराच्याने लपविलें जावत नाहीं; आणि जे दिवा लावितात ते त्याला मापाखालीं ठेवीत नाहींत, तर समईवर ठेवितात, मग तो घरांतील सर्वांस उजेड देतो. माणसांसमोर तुमचा उजेड असा प्रकाशो कीं त्यांनी तुमचीं चांगलीं कामें पाहावीं आणि तुमच्या आकाशांतील बापाचें गौरव करावें.

नियमाचा अथवा भविष्यवाक्यांचा नाश करावयास मी आलों, असें समजूं नका; मी नाश करावयास आलों नाहीं, परंतु पूर्ण करावयास आलों, कां कीं मी तुह्मास खचीत सांगतों कीं आकाश व पृथ्वी जाई तोंवर अवघीं पूर्ण होत तोंपर्यंत नियमांतून एक लाहान अक्षर किंवा एक कांटाहि जाणारच नाहीं. यास्तव जर कोणी ह्या फारच लाहान आज्ञांतील एकीला मोडील आणि माणसांस तसें शिकवील, तर आकाशाच्या राज्यांत फारच

लाहान म्हटला जाईल. परंतु जर कोणी आचरील व शिकवील तर तोच आकाशांच्या राज्यांत थोर म्हटला जाईल, कारण कीं मी तुम्हास सांगतों कीं पंडित व फारिशी यांच्या नीतिमत्तापेक्षां जर तुमचें अधिक मोठें होत नाहीं, तर तुम्ही आकाशांच्या राज्यांत जाणारच नाहीं.

तूं हत्या करूं नको; आणि जो जो हत्या करील तो न्यायकाळीं दोषी होईल, हें प्राचीन लोकांस सांगितलें होतें म्हणून तुम्ही ऐकिलें आहे. परंतु मी तुम्हास सांगतों कीं जो कोणी आपल्या भावावर रुद्रवीं रागें भरतो, तो न्यायकाळीं दोषी होईल. आणि जो जो आपल्या भावाला वेडगळ म्हणेल तो न्यायसभेंत दोषी होईल; आणि जो मुर्खा म्हणेल तो अग्नीच्या नरकापर्यंत दोषी होईल. यास्तव जर तूं आपलें अर्पण वेदीजवळ आणितोस, आणि भावाचें तुजा विरुद्ध कांहीं आहे असें तेथें स्मरतोस, तर तेथें वेदी पुढें आपलें अर्पण ठेव आणि निघून जा; प्रथम आपल्या भावाशीं तोड पाड आणि मग येऊन आपलें अर्पण वाहा. जोंपर्यंत तूं आपल्या वाद्याच्या संगातें वाटेंत आहेस तोंपर्यंत लवकर त्याशीं तोड पाड, नाहीं तर कधीं वादी तुजा न्यायाधीशाच्या स्वाधीन करील आणि न्यायाधीश तुजा हलकाच्या स्वाधीन करील आणि तूं बंदिशाळेंत घातला

आलीस; मी तुला खचीत सांगतों, तूं शेवटची दमडी फेडतोस तोंपर्यंत तेथून बाहेर येणारच नाहींस.

तूं व्यभिचार करूं नको, असें प्राचीन लोकांस सांगितलें होतें म्हणून तुम्ही ऐकिलें आहे; परंतु मी तुम्हास सांगतों कीं जो कोणी स्त्रियेची आस धरण्यासाठीं तिला पाहतो, त्यानें इतक्यांत आपल्या मनांत तिजशीं व्यभिचार केला आहे. आणि जर तुझा उजवा डोळा तुला अडखळवितो तर त्याला उपट आणि तुजपासून टाक, कारण कीं तुझ्या अंगांमधून एकाचा नाश व्हावा आणि तुझें संपूर्ण शरीर नरकांत टाकलें न जावें, हें तुला उपयोगी आहे. आणि जर तुझा उजवा हात तुला अडखळवितो तर त्याला तोड आणि आपल्यापासून टाक, कारण कीं तुझ्या अंगांतून एकाचा नाश व्हावा आणि तुझें संपूर्ण शरीर नरकांत टाकलें न जावें, हें तुला उपयोगी आहे.

जो कोणी आपल्या बायकोला सोडील तो तिला सूटपत्र देवो असेंहि सांगितलें होतें; परंतु मी तुम्हास सांगतों कीं जो जो आपल्या बायकोला व्यभिचार कारणावांचून सोडितो तो तिजकडून व्यभिचार करवितो, आणि जर कोणी सोडलेलीशीं लग्न करील तो व्यभिचार करितो.

आणखी तुम्ही ऐकिलें आहे कीं प्राचीन लोकांस म्हटलें होतें, तूं खोटी शपथ वाहूं नको परंतु प्रभूपाशीं आपल्या

शपथा फेड; तथापि मी तुह्मास सांगतों, तुह्मी शपथ अगदी वाहूं नका, आकाशाची नका, कां कीं तें देवाचें राजासन आहे; आणि पृथ्वीचीहि नका; कां कीं ती त्याच्या पायांचें आसन आहे; आणि यरुशालेमाची नका, कां कीं तें मोठ्या राज्याचें नगर आहे. आणि तूं आपल्या मस्तकाची शपथ वाहूं नको, कां कीं तुह्मानें एक केंस पांढरा अथवा काळा करवत नाहीं; परंतु तुमचें बोलणें होयचें होय, नाहींचें नाहीं इतकेंच असावें, पण याहून जें अधिक तें वाईटापासून आहे. डोळ्याकरितां डोळा आणि दांताकरितां दांत, हें सांगितलें होतें ह्मणून तुह्मी ऐकिलें आहे; तथापि मी तुह्मास सांगतो, वाईटाला अडवूं नका, परंतु जो कोणी तुझ्या उजव्या गालावर तुला चपडाक हाणील, त्याकडे दुसराहि फिरीव. आणि जो तुजवर वादी होऊन तुझा अंगरखा घ्यावयास इच्छितो, त्याला तुझें अंगवस्त्र घेऊं दे, आणि जो कोणी तुला बळात्काराने अर्धकोस चालवील, त्याबरोबर दुप्पट जा. जो तुझ्याजवळ मागतो त्याला दे, आणि जो तुजपासून उसनें घ्यावयास इच्छितो त्याला पाठमोरा होऊं नको. तूं आपल्या शेजाऱ्याची प्रीति कर आणि आपल्या वैऱ्याचा द्वेष कर, हें सांगितलें होतें असें तुह्मी ऐकिलें आहे; तथापि मी तुह्मास सांगतों कीं आपल्या वैऱ्यांवर प्रीति करा, जे

तुम्हास शाप देतात त्यांस तुम्ही आशीर्वाद द्या, जे तुमचा द्वेष करितात त्यांचें तुम्ही बरें करा, आणि जे तुम्हास गांजितात आणि तुमचा पाठलाग करितात त्यांच्यासाठीं प्रार्थना करा, यासाठीं कीं तुम्ही आपल्या आकाशांतील बापाचे पुत्र व्हावें; कां कीं जे वाईट व जे चांगले त्यांवर तो आपल्या सूर्याला उगववितो आणि जे नीतिमान् व जे अनीतिमान् त्यांवर पाऊस पाडितो.

## अध्याय १२.

आणि जे तुम्हावर प्रीति करितात त्यांवर जर तुम्ही प्रीति करितां तर तुमचा कसचा आभार आहे? कां तर पापी आपल्या प्रीति करणाऱ्यांवर प्रीति करितात; आणि जे तुमचें बरें करितात त्यांचें जर तुम्ही बरें करितां तर तुमचा कसचा आभार आहे? कां तर पापीहि तेंच करितात. आणि ज्यांपासून परत घेण्याची आशा तुम्हास आहे त्यांस जर तुम्ही उसनें देतां तर तुमचा कसचा आभार आहे? कां कीं फिरून तितकीं घ्यावयाकरितां पापीहि पाप्यांस उसनीं देतात. परंतु तुम्ही आपल्या वैऱ्यांवर प्रीति करा व बरें करा, आणि कांहीं फेडावयाची आशा न धरितां उसनें द्या; मग तुम्हास मोठें फळ होईल आणि परात्पराचे पुत्र व्हाल, कां तर कृतघ्न व दुष्ट यांवर तो उपकारक

आहे; यास्तव जसा तुमचा बाप कनवाळू आहे तसेच तुम्हीहि कनवाळू व्हा.

माणसानी पाहावें यास्तव त्यांच्यासमोर तुम्ही आपला धर्म न करावा याविषयीं जपा, नाहीं तर तुमच्या आंकाशांतील बापाजवळ तुह्मास वेतन नाहीं. असें असतां जेव्हां तूं धर्म करितोस, तेव्हां असें ढोंगी माणसानी गौरविलें जावें ह्मणून सभांमध्यें व मार्गांत करणा वाजवितात, तसें तूं अपल्यापुढें करूं नको; मी खचीत तुम्हास सांगतों ते आपलें वेतन पावतात. परंतु तूं धर्म करीत असतां तुझा उजवा हात काय करितो, हें तुझ्या डाव्या हाताला न कळो, अशासाठीं कीं आपला धर्म गुप्तांत व्हावा; मग गुप्तांत पाहतो तुझा जो बाप तो तुला लौकिकांत वेतन देईल.

आणि जेव्हां तूं प्रार्थना करितोस तेव्हां तूं ढोंग्यासारिखा होऊं नको, कां कीं त्यानी माणसांस दिसावें ह्मणून सभांमध्यें व मार्गांच्या कोनांमध्यें उभें राहून प्रार्थना करणें त्यांस आवडतें; मी तुम्हास खचीत सांगतों ते आपलें वेतन पावतात. परंतु जेव्हां तूं प्रार्थना करितोस तेव्हां आपल्या खोलींत जा आणि आपलें दार लावून आपला गुप्तांतील जो बाप त्याची प्रार्थना कर; मग तुझा बाप जो गुप्तांत पाहतो तो तुला लौकिकांत वेतन देईल. आणि तुह्मी

प्रार्थना करितां परप्रजांसारिखे व्यर्थ बोलूं नका, कारण कीं त्यांच्या फार बोलण्याने त्यांचें ऐकिलें जाईल असें त्यांस वाटतें; यास्तव त्यांच्यासारिखें तुह्मी होऊं नका, कारण कीं तुह्मी आपल्या बापापाशीं मागितल्याच्या अगोदर जीं तुह्मास पाहिजेत तीं त्याला कळतीं. यास्तव तुह्मी या प्रकारें प्रार्थना करा, हे आमच्या आकाशांतील बापा, तुझें नाव पवित्र मानिलें होवो; तुझें राज्य येवो, जशी आकाशांत तशी पृथ्वींतहि तुझी इच्छा चालो; आमची नित्याची भाकर आज आह्मास दे, आणि जसें आह्मी आपल्या ऋण्यांस सोडितों तसें तूं आमचीं ऋणें आह्मास सोड. आणि आह्मास परीक्षेंत न न्यावें, परंतु आह्मास वाईटापासून मोकळे कर, कां कीं राज्य व पराक्रम व गौरव हीं सर्व काळ तुझीं आहेत, आमेन. कारण कीं जर तुह्मी माणसांस त्यांचे अपराध सोडितां तर तुमचा आकाशांतील बाप तुह्मास सोडील. परंतु जर तुह्मी माणसांस त्यांचे अपराध सोडीत नाहीं तर तुमचा बाप तुमचेहि अपराध सोडणार नाहीं.

आणि जेव्हां तुह्मी उपास करितां तेव्हां ढोंग्यांसारिखे म्लानमुख होऊं नका, कां कीं हे उपास करीत आहेत असें लोकांस दिसावें ह्मणून ते आपले तोंडवळे निस्तेज करितात. मी तुह्मास खचीत सांगतों कीं ते आपलें वेतन पाव

तात ; परंतु तूं उपास करितांना आपल्या डोक्यास अभ्यंग कर आणि आपलें तोंड धू, यासाठीं कीं तूं उपासी आहेस हें माणसाला दिसायासाठीं नव्हे, परंतु तुझा बाप जो गुप्तांत पाहतो तो तुला लौकिकांत देईल.

पृथ्वीवर जेथें कसर व कळंक नाश करितात, आणि जेथें चोर फोडून चोरी करितात, तेथें आपणांसाठीं संपत्ति सांठवूं नका; परंतु आकाशांमध्यें जेथें कसर व कळंक हीं नाश करीत नाहींत आणि जेथें चोर फोडून चोरी करीत नाहींत, तेथें तुह्मी आपल्यांसाठीं संपत्ति सांठवा; यास्तव कीं जेथें तुमची संपत्ति आहे तेथें तुमचें चित्तहि होईल. शरीराचा दिवा डोळा आहे, यास्तव तुझा डोळा जर निर्दोष असेल तर तुझें संपूर्ण शरीर प्रकाशमय होईल; परंतु तुझा डोळा वाईट असेल, तर तुझें संपूर्ण शरीर अंधारमय होईल; असें असतां तुह्यामध्यें जो प्रकाश तो जर अंधार असेल तर केवढा मोठा अंधार होईल.

कोणाच्यानें दोन धन्यांची चाकरी करवत नाहीं, कां कीं तो एकाचा द्वेष करील आणि दुसऱ्याची प्रीति करील, अथवा तो एकाचा पक्ष करील आणि दुसऱ्याची उपेक्षा करील; तुमच्यानें देवाची आणि लक्ष्मीची सेवा करवत नाहीं. यासाठीं मी तुह्मास सांगतों कीं आपल्या जिवाविषयीं आपण काय खावें आणि काय प्यावें, किंवा शरीराविषयीं काय

पांघरावें, असी फार चिंता करूं नका. अन्नापेक्षां जीव आणि वस्त्रापेक्षां शरीर अधिक नव्हे कीं काय? आकाशां तील पांखरांस पाहा, तीं पेरीत नाहींत, कापीतहि नाहींत आणि कोठारांमध्यें सांठवीत नाहींत; तथापि तुमचा आकाशांतील बाप त्यांस पोषितो, तुह्मी त्यांपेक्षां फार श्रेष्ठ आहां कीं नाहीं? आणि चिंता करून आपलें आयुष्य हात भर वाढवायास तुह्मामध्यें कोण समर्थ आहे? आणि वस्त्रासाठीं कां चिंता करितां? शेतांतील फुलझाडें ध्यानांत धरा, तीं कशीं वाढतात, श्रम करीत नाहींत, आणि कांतीत नाहींत; तथापि मी तुह्मास सांगतों कीं शलमोनहि आपल्या संपूर्ण गौरवांत त्यांतील एका सारिखा पांघरला नव्हता. यास्तव अहो! अल्पविश्वासी शेतांतील हिरवळ जी आज आहे आणि उद्यां चुलीमध्यें टाकली जाती, तिला जर देव या रीतिनें पांघरवितो तर तुह्मास विशेषेंकरून पांघरविणार नाहीं कीं काय? यास्तव आह्मी काय खाऊं, अथवा काय पिऊं, अथवा काय पांघरूं? असें बोलून फार चिंता करूं नका; कां कीं ह्या अवघ्यांस परप्रजा शोधितात, अणखी हीं सर्व तुम्हास पाहिजेत हें तुमच्या आकाशांतील बापाला कळलें आहे. परंतु तुम्ही पहिल्याने देवाच्या राज्याला आणि त्याच्या नीतिमत्ताला शोधा; मग तीं सर्व तुह्मास दिल्हीं जातील. यास्तव उद्यांसाठीं चिंता करूं नका, कां कीं

मेंढ्रांच्या वेषानें तुह्माकडे येतात, परंतु अंतरीं क्रूर लांडगे आहेत, यांविषयीं जपा; तुह्मी त्यांच्या फळांवरून त्यांस जाणाल. कांट्यांच्या झाडापासून द्राक्षें, अथवा रिंग णीच्या झाडापासून अंजीर काढितात कीं काय? तर सर्व चांगलें झाड चांगलीं फळें देतें आणि वाईट झाड वाईट फळें देतें. चांगला माणूस आपल्या हृदयांतील चांगल्या संग्रहांतून चांगलें काढितो आणि वाईट माणूस आपल्या हृद यांतील वाईट संग्रहांतून वाईट काढितो कां तर हृदयांतील अतिशयांतून त्याचें तोंड बोलतें.

जो कोणी मला प्रभू प्रभू असें ह्मणतो, तो आका शांच्या राज्यांत जाणार नाहीं, परंतु जो माझ्या आका शांतील बापाच्या इच्छेप्रमाणे करितो तो जाईल. त्या दिवशीं मला बहुत बोलतील, हे प्रभू प्रभू, आह्मी तुझ्या नामानें भविष्य सांगितलें आणि तुझ्या नामानें भुतें घाल विलीं आणि तुझ्या नामानें बहुत चमत्कार केले नाहींत कीं काय? मग त्या वेळेस मी त्यांजवळ असें सांगेन कीं, म्या तुह्मास कधींहि जाणलें नाहीं, अहो अनियम कर णारे, मजपासून दूर जा. यास्तव जो कोणी माझ्या ह्या गोष्टी ऐकतो आणि त्यांप्रमाणे करितो, मी त्याला शाहाण्या माणसाची उपमा देईन, ज्यानें आपलें घर खडकावर बांधिलें; मग पाऊस पडला आणि पूर आले,

वारेंहि सुटले, आणि त्या घरास आपटले, परंतु त्याचा पाया खडकावर घातला यासाठीं तें पडलें नाहीं. आणि जो कोणी माझ्या ह्या गोष्टी ऐकतो आणि त्यांप्रमाणें करीत नाहीं, त्याविषयीं मूर्ख माणसाची उपमा दिल्ही जाईल; ज्यानें आपलें घर वाळूवर बांधिलें, मग पाऊस पडला आणि पूर आले, वारेंहि सुटले आणि त्या घरास लागले; तेव्हां तें पडलें आणि त्याचा मोठा नाश झाला. आणि येशूनें ह्या गोष्टी समाप्त केल्यावर असें झालें कीं, समुदाय याच्या उपदेशामुळें आश्चर्यवंत झाले, कां कीं पंडितांसारिखा तो त्यांस उपदेशीत नव्हता, परंतु ज्याला अधिकार आहे त्यासारिखा.

मग तो डोंगरावरून उतरल्यावर समुदाय त्याच्या मागें गेले, आणि त्यानें लोकांच्या ऐकण्यांत आपल्या सर्व गोष्टी समाप्त केल्यावर तो कापेर्णाऊमांत गेला. तेव्हां कोणी शतपतीचा चाकर जो त्याला प्रिय होता तो दुखणाईत असतां मरणार होता; नंतर त्यानें येशूविषयीं ऐकून त्याची विनंती करितां यहूद्यांच्या पुरातनांस त्याजवळ पाठविलें, यासाठीं कीं त्यानें येऊन त्याच्या चाकराला निरोगी करावें. आणि ते येशूच्याजवळ येऊन त्याला आग्रहानें विनंती करीत बोलले कीं, ज्यासाठीं हें करा वयाचें तो योग्य आहे, कारण कीं तो आमच्या राष्ट्रा

वर प्रीति करितो आणि त्याने आम्हासाठीं सभा बांधिली. मग येशू त्यांबरोबर गेला, आणि तो तेव्हां घरापासून लांब नसतां त्या शतपतीने त्याजवळ मित्रांस पाठवून त्याला ह्मटलें, हे प्रभू श्रम करूं नको, कारण कीं त्वां माझ्या छपराखालीं यावें असा मी योग्य नाहीं; यास्तव मीहि स्वा आपणाला तुजकडे येण्यास योग्य मोजिलें नाहीं, परंतु तूं शब्द बोल ह्मणजे माझा चाकर निरोगी होईल. कां कीं मीहि अधिकाराखालीं ठेविलेला माणूस आहें, माझ्याखालीं सैनिक असतांना ह्याला मी सांगतों, तूं जा, तेव्हां तो जातो; आणि दुसऱ्याला ये, तेव्हां तो येतो; आणि माझ्या चाकराला हें कर, तेव्हां तो करितो. मग येशूने हीं ऐकून त्याविषयीं आश्चर्य केलें. आणि मुरडून समुदाय जो त्याच्यामागें चालत होता त्याला ह्मटलें, मी तुह्मास सांगतों इस्राएलांतहि एवढा विश्वास मला सांपडला नाहीं. पूर्वेपासून आणि पश्चिमेपासून बहुत येतील, आणि आब्राहाम व इस्हाक व याकोब यांच्यासमागमें आकाशांच्या राज्यांत बसतील, परंतु राज्यांतले पुत्र बाहेरील अंधारांत टाकले जातील; तेथे रडणें व दांतकडकडिवणें होईल. नंतर जे पाठविले होते ते माघारें घरास गेल्यावर जो चाकर रोगी होता तो त्यांस निरोगी सांपडला.

## अध्याय १४.

मग पुढील दिवशीं हें झालें तो नाईन म्हटलेल्या नगरास गेला आणि त्याचे बहुत शिष्य व मोठा समुदाय त्यासंगातें गेले. नंतर तो नगराच्या वेसीजवळ आला असतां पाहा, एक मेलेला बाहेर नेला होता; तो आपल्या आईचा एकुलता पुत्र, तीहि विधवा होती आणि नगराचा मोठा समुदाय तिच्या बराबर होता. तेव्हां प्रभु तिला पाहून तिजवर कळवळला आणि तिला बोलला, रडूं नको, मग तो जवळ येऊन ताटीस शिवला आणि खांदेले उभे राहिले असतां तो बोलला, तरुणा, तुला मी सांगतों ऊठ, तेव्हां तो बसला आणि बोलूं लागला; मग त्याने तो त्याच्या आईला दिल्हा. नंतर अवघ्यांस भय लागलें आणि ते देवाला गौरवीत बोलले कीं आम्हामध्यें मोठा भविष्यभाषी उठला आहे अणखी देवाने आपल्या लोकांची भेट घेतली आहे; मग त्याविषयीं ही गोष्ट बाहेर सगळ्या यहूदांत आणि सगळ्या चहूंकडल्या देशांत गेली. तेव्हां हीं अवघीं योहानाच्या शिष्यानी त्याला निवेदन केलीं, आणि योहानाने आपल्या शिष्यांतील कोणा दोघांस जवळ बोलावून येशूला सांगावयास पाठविलें कीं, काय जो याव याचा तो तूं आहेस, किंवा आम्ही दुसऱ्याची वाट पाहावी? आणि ते मनुष्य त्याजवळ येऊन बोलले, योहान

जो बाप्तिस्मा देणारा त्याने आम्हास तुझ्याजवळ सांगावयास पाठविलें कीं, काय जो यावयाचा तो तूं आहेस किंवा आह्मी दुसऱ्याची वाट पाहावी? तेव्हां त्याच घटकेस त्याने बहुतांस दुखणीं व पटक्या व दुष्ट आत्मे यांपासून बरें केलें, आणि बहुत आंधळ्यांवर दृष्टि पावण्याचा उपकार केला. मग येशू उत्तर देतां त्यास बोलला, तुह्मी जीं पाहिलीं आणि ऐकिलीं तीं योहानाला जाऊन सांगा कीं, आंधळे पाहतात, लंगडे चालतात, कोढी शुद्ध होतात, बहिरे ऐकतात, मेलेले उठतात, दरिद्र्यांसहि शुभवर्त्तमान सांगितलें आहे; आणि जर कोणी मजविषयीं अडखळत नाहीं तर तो धन्य आहे.

मग योहानाचे दूत रयून गेल्यानंतर, तो योहाना विषयीं समुदायांस बोलूं लागला, तुह्मी रानांत काय पाहाव यास बाहेर गेलां? वाऱ्याने हालविलेला बोरु कीं काय? तर तुह्मी काय पाहावयास बाहेर गेलां? मऊ वस्त्रें पांघर लेला माणूस कीं काय? पाहा तेजस्वी वस्त्रें व मिष्टान्न यांक डून असतात ते राजांमध्यें आहेत. तर काय पाहावयास तुह्मी बाहेर गेलां? भविष्यभाष्यास कीं काय? होय मी तुह्मास सांगतों आणि भविष्यभाष्याहून फार अधिक; पाहा मी आपल्या दूतास तुझ्या तोंडापुढें पाठवितों, तो तुजपुढें तुझी वाट सिद्ध करील, ऐं ज्याविषयीं लिहिलें आहे तो

हाच आहे. मी तुह्मास खचीत सांगतों स्त्रियांपासून जे जन्मले त्यांतून योहान बाप्तिस्मा करणाऱ्याहून कोणी मोठा उपजला नाहीं, तरीं आकाशांच्या राज्यांत जो फार लाहान तो त्याहून मोठा आहे. योहान बाप्तिस्माकरणाऱ्याच्या दिवसांपासून आतांपर्यंत आकाशांचें राज्य बळात्काराने साध्य आहे. आणि जे बळात्कारी आहेत ते बळाने तें घेतात, कां कीं योहानापर्यंत सर्व भविष्यभाषी आणि नियम ह्यांनीहि भविष्यें सांगितलीं, आणि जर स्वीकारावयास इच्छितां तर एलिया जो येणार होता तो हाच आहे; ज्याला ऐकावयास कान आहेत त्याने ऐकावें. आणि सर्व लोक करघेणारेहि, यांनी ऐकून योहानाचा बाप्तिस्मा घेत असतां देवाला यथार्थिक मानिलें, परंतु फारिशी आणि शास्त्री यांनी त्याकडून बाप्तिस्मा न घेतां आपणांविरुद्ध देवाचा बेत अव्हेरिला. तेव्हां प्रभूने ह्मटलें, तर या पिढीच्या माणसांस मी कोणती उपमा देऊं? आणि ते कोणासारिखे आहेत? हाटांत जीं मुलें बसतात आणि एकमेकांस हाक देतांना बोलतात, आह्मी तुह्मा जवळ पांवा वाजविला परंतु तुह्मी न नाचलां, आह्मी तुम च्याजवळ विलाप केला परंतु तुह्मी न रडलां; यांसारिखे ते आहेत, कारण कीं योहान जो बाप्तिस्मा देणारा तो भाकर खात नसतां आणि द्राक्षरसहि पीत नसतां आला,

आणि तुह्मी ह्मणतां त्याला भूत लागलें. मनुष्याचा पुत्र खातां व पितां आला आणि तुम्ही बोलतां, पाहा खादाड माणूस व मद्यपी, करघेणाऱ्यांचा व पाप्यांचा सखा; परंतु ज्ञान आपल्या सर्व लेंकरांनी यथार्थिक मानिलें जातें.

तेव्हां ज्या नगरांमध्यें त्याचे बहुत चमत्कार घडले होते, त्यांनी पश्चात्ताप बाळगिला नाहीं ह्मणून त्यांस तो याप्रमाणे निषेधूं लागला, हे खोराजीना तुला हायहाय, हे बेथसाईदा तुला हायहाय, कां कीं तुह्मामध्यें जे चमत्कार घडले ते सोर व सीदोन ह्यांत घडले असते, तर त्यांनी पूर्वीच तरट व राख ह्यांकडून पश्चात्ताप बाळगिला असतां; अणखी तुह्मास सांगतों कीं न्याय ठरण्याच्या दिवशीं सोर व सीदोन तुह्मापेक्षां सहज पडेल. आणि हे कापेर्णाऊमा, जें आकाशांपर्यंत उंचावलेलें तें तूं पातळापर्यंत खालीं टाकलें जासील, कां कीं तुजमध्यें जे चमत्कार घडले ते जर सदोमांत घडले असते, तर तें आजपर्यंत राहतें; अणखी तुह्मास सांगतों कीं न्याय ठरण्याच्या दिवशीं तुम्हापेक्षां त्या देशास सहज पडेल. त्या समयीं येशू गोष्ट बोलता झाला कीं, हे बापा आकाशाच्या व पृथ्वीच्या प्रभू, मी तुला स्तवितों, कां कीं ज्ञानी व तर्कवान् ह्यांपासून गोष्टी लपवून लेंकरांस प्रगट केल्या आहेत; होय बापा, कां कीं असेंच तुझ्या दृष्टीनें योग्य वाटलें. माझ्या बापानें

मला अवघीं दिल्हीं आहेत आणि बापावांचून कोणाला पुत्र कळत नाहीं पुत्रावांचून बाप कोणाला कळत नाहीं. अहो कष्टकरी आणि ओझ्यानी लादलेले, तुह्मी सर्व माझ्याजवळ या ह्मणजे मी तुह्माला विसांवा देईन. तुह्मी आपणांवर माझें जूं घ्या आणि मजपासीं शिका, कां कीं मी अंतःकरणांत नम्र व लीन आहें आणि तुह्मी आपल्या जिवास विसांवा पावाल. कां कीं माझें जूं सोईचें आणि माझें ओझें हलकें आहे.

## अध्याय १५.

मग फारिश्यांतील कोणी त्याला विनंती केली कीं आप ह्याबराबर जेवावें, नंतर तो त्या फारिश्याच्या घरांत जाऊन जेवावयास बसला. तेव्हां पाहा त्या नगरांत जी स्त्री पापीण होती तिने तो फारिश्याच्या घरांत जेवितो, हें जाणलें असतां सुगंध तेलाची आलाबास्तकुपी मिळविली. मग ती त्याच्या पायांजवळ मागें रडत उभी राहत असतां आंसवांकडून त्याचे पाय भिजवूं लागली; नंतर तिने आपल्या डोक्याच्या केंसानी पुसलें आणि त्याच्या पायांचें चुंबन घेतलें, आणि सुगंध तेलाने त्यांस चर्चन केलें. तेव्हां ज्या फारिश्याने त्याला बोलाविलें तो पाहून आपल्यांत बोलला कीं, हा जर भविष्यभाषी असतां तर जी त्याला शिवती ती कोण आणि कसी स्त्री हें त्याला कळलें असतें,

कां कीं मी पापीण आहे. तेव्हां येशू उत्तर देतां त्याला बोलला, हे शिमोना तुजशीं मला कांहीं बोलायाचें आहे; तेव्हां तो ह्मणतो, हे गुरू बोल, एका सावका राचे दोन ऋणी होते, एकाला पांचशें पावल्या आणि दुसऱ्याला पन्नास देणें होतें; परंतु फेडावयाला त्यांजवळ कांहीं नसतां त्याने कृपाकरून दोघांस सूट दिल्ही. तर त्यांतून कोणता त्यावर अधिक प्रीति करील हें सांग. तेव्हां शिमोन उत्तर देतां बोलला, ज्याला अधिक सोडिलें तो, असें मला वाटतें; मग हा त्याला बोलला, त्वां उचित ठरविलें. तेव्हां तो स्त्रीकडे मुरडून शिमोनाला बोलला, ह्या स्त्रीला तूं पाहतोस कीं काय? मी तुझ्या घरांत आलों, त्वां माझ्या पायासाठीं पाणी दिल्हें नाहीं, परंतु तिने आंसवांनी माझे पाय भिजविले आणि आपल्या डोक्याच्या केंसांनी पुसले. त्वां माझें चुंबन घेतलें नाहीं, परंतु मी आंत आल्यापासून तो माझ्या पायांचें चुंबन घेतां राहिली नाहीं; त्वां तेलाने माझें डोकें चर्चिलें नाहीं, परंतु तिने सुगंध तेलाने माझ्या पायांस चर्चन केलें आहे; याकारणास्तव मी तुला सांगतों, तिचीं जीं बहुत पापें तीं सोडलीं आहेत, कां कीं तिने फार प्रीति केली. परंतु ज्याचीं थोडकीं सोडलीं तो थोडकी प्रीति करितो; तेव्हां तो तिला बोलला, तुझीं पापें सोडलीं आहेत. मग

भेवायास संगातें बसले होते ते आपणांमध्यें विचार करूं लागले, जो पापेंहि सोडितो हा कोण आहे? आणि तो तिला बोलला तुझ्या विश्वासाने तुला तारिलें आहे, सुखानें जा.

आणि येथून सर्व नगरें व गांवें यांमधून त्यांच्या सभांमध्यें शिकवीत आणि राज्याचें शुभवर्त्तमान गाजवीत आणि लोकांत सर्व रोग व विकृति यांचें निवारण करीत फिरला, आणि ते बारा शिष्यहि त्याबराबर गेले. आणि कित्येक स्त्रिया, ज्या दुष्ट आत्मे व दुखणीं यांपासून बऱ्या केल्या होत्या ह्मणजे मारया जी माग्दालीण ह्मटलेली जिच्या मधून सात भुतें निघालीं आणि हेरोदाचा कारभारी खूजा याची स्त्री योहाना व शूसान्ना आणि बहुत दुसऱ्या, ज्यांनी आपल्या द्रव्यांकडून त्याची सेवा केली, त्या होत्या.

नंतर ते घरीं आले; तेव्हां फिरून समुदाय एवढा मिळाला कीं खाणें खावयासहि त्यांस अवकाश होईना. आणि त्याचे आप्त तें ऐकून त्याला धरावयास बाहेर निघाले कारण कीं तो वेडा आहे असें त्यांस वाटलं.

तेव्हां आंधळा व मुका भूतग्रस्त त्याच्याजवळ आणिला, आणि त्याने त्याला असें निरोगी केलें कीं त्याला बोलतां व पाहतां आले आणि सर्व समुदाय विस्मित झाले आणि बोलले, हा दावीदाचा पुत्र नव्हे कीं काय? परंतु फारिसी

ऐकून बोलले ; कीं बाल्जबूल जो भुतांचा अधिपति याज वांचून तो भुतांस घालवीत नाहीं. तेव्हां येशू त्यांच्या कल्पना जाणून त्यांस बोलला , जें जें राज्य आंतल्या आंत विभागलें आहे तें ओसाड होतें , आणि जें जें नगर अथवा घर आंतल्या आंत विभागलें आहे तें स्थिर राहणार नाहीं . आणि जर सटान सटानाला घालवितो तर तो आपल्या विरुद्ध विभागला जातो , मग त्याचें राज्य स्थिर कसें राहील ? आणि जर मी बाल्जबूलाकडून भुतांस घाल वितों तर तुमचे पुत्र कोणाकडून त्यांस घालवितात ? याज करितां ते तुमचे न्यायाधीश होतील ; परंतु जर मी देवा च्या आत्म्याकडून भुतांस घालवितों तर देवाचें राज्य तुमच्या मध्यें पोहंचलें आहे. अणखी बळकट माणसाच्या घरांत जाऊन त्याला बांधिल्यावांचून त्याचे जिन्नस लुटायाला कोणी कसा समर्थ आहे ? तो प्रथम त्याला बांधील तेव्हां त्याचें घर लुटील. जो माझ्या संगतीं नाहीं तो मजवि रुद्ध आहे ; आणि जो माझ्या संगतीं जमा करीत नाहीं तो विखरितो ; याजकरितां मी तुह्मास सांगतों , सर्व पापें व दुर्भाषणें माणसांस सोडविलीं जातील , परंतु पवित्र आत्म्याविषयीं जें दुर्भाषण तें माणसांस सोडविलें जाणार नाहीं. आणि जर कोणी मनुष्याच्या पुत्राविरुद्ध बोलेल तें त्याला सोडविलें जाईल , परंतु जो कोणी पवित्र आत्म्या

विरुद्ध बोलेल तें त्याला ह्या लोकीं सोडविलें जाणार नाहीं, आणि जो परलोक यांतहि नाहीं. झाड चांगलें व त्याचें फळ चांगलें तें समजा, अथवा झाड वाईट व त्याचें फळ वाईट तें समजा; कां कीं फळावरून झाड कळतें. अहो सर्पांचा उपज, तुह्मी दुष्ट असतां तुमच्याने चांगलीं कशाने बोलवतील? कां कीं अंतःकरणाच्या ऊताप्रमाणे तोंड बोलतें. चांगला माणूस चांगल्या भांडारांतून चांगलीं काढितो. आणि दुष्ट माणूस दुष्ट भांडारांतून दुष्ट अर्थी काढितो. परंतु तुम्हास सांगतों कीं जो जो रिकामा शब्द माणसें बोलतील त्याविषयीं न्याय ठरविण्याच्या दिवसीं हिशेब घेतला जाईल, कांकीं तुझ्या भाषणावरून तूं नीतिमान् ठरविला जासील, आणि तुझ्या भाषणावरून तूं दोषी ठरविला जासील.

## अध्याय १६.

तेव्हां पंडित व फारिशी यांतून कोणी उत्तर देऊन बोलतात, हे उपदेशका आह्मी तुझें कांहीं चिन्ह पाहावयास इच्छितों; मग त्यांस तो उत्तर देतां बोलला कीं, दुष्ट व व्यभिचारी पिढी चिन्ह मागती, परंतु योना भविष्यभाषी ह्याच्या चिन्हावांचून तिला चिन्ह द्यायाचें नाहीं; कां कीं जसा योना तीन दिवस व तीन रात्रीं मोठ्या माशाच्या पोटांत होता, तसा मनुष्याचा पुत्र तीन दिवस व

तीन रात्री पृथ्वीच्या पोटांत राहील. नीनवेकर माणसें ह्या पिढीच्यासंगतीं न्यायकाळीं उठून उभीं राहतील आणि हिला अन्यायी ठरवितील, कां कीं योनाच्या गाजविण्या वरून त्यांनी पश्चात्ताप धरिला परंतु योनापेक्षां एथें कांहीं अधिक आहे. दक्षणेची राणी ह्या पिढीच्यासंगतीं न्याय काळीं उठून उभी राहील आणि हिला अन्यायी ठरवील, कां कीं शलमोनाचें ज्ञान ऐकावयास ती पृथ्वीच्या शेवटापासून आली; परंतु पाहा शलमोनापेक्षां एथें कांहीं अधिक आहे. आणि कोणी दिवा लावून गुप्तांत किंवा मापाखालीं नाहीं परंतु यासाठीं समईवर ठेवितो, कीं आंत येणाऱ्यांनी प्रकाश पाहावा. शरीराचा उजेड डोळा आहे, यास्तव जेव्हां तुझा डोळा निर्विकार आहे तेव्हां तुझें संपूर्ण शरीर उजे डयुक्त आहे, परंतु जेव्हां वाईट आहे तेव्हां तुझें शरी रहि काळोखी आहे. यास्तव तुझ्यामध्यें जो उजेड तो अंधार न व्हावा म्हणून जप; तर तुझें सगळें शरीर जर प्रकाशित असेल त्यांत कांहीं भाग काळोखी नसता, तर जेव्हां दिव्याचें झळकणें तुला उजेड देतें तसें संपूर्ण उजेड युक्त होईल. अशुद्ध आत्मा जेव्हां माणसांतून निघाला आहे तेव्हां कोरड्या जागांमधून विसांवा शोधीत फिरतो, परंतु पावत नाहीं; मग ह्मणतो ज्या माझ्या घरांतून निघालों तेथे परत जाईन, आणि आल्यावर तें रिकामें व

झाडलेलें असें पावतो. नंतर दुसरे सात आपल्याहून दुष्ट आत्मे आपल्यासंगतीं घेतो आणि आंत जाऊन तेथे राहतो. मग त्या माणसाचीं जीं शेवटलीं तीं पहिल्यापेक्षां वाईट होतात; तसेंच त्या दुष्ट पिढीविषयीं होईल.

आणि तो हीं बोलत असतां हें झालें समुदायांतील कोणी स्त्री उंच शब्द करून त्याला बोलली, ज्या पोटानें तुला वागविलें आणि ज्या स्तनांस त्वां चोखिलें तीं धन्य. मग तो बोलला तर जे देवाची गोष्ट ऐकतात आणि तिला पाळितात ते निश्चयें धन्य. आणि तो समुदायांस बोलत असतां इतक्यांत त्याची आई व त्याचे भाऊ त्याशीं बोलाव यास बाहेर उभीं राहिलीं; परंतु समुदायास्तव तीं त्याच्या जवळ येऊं न शकलीं. तेव्हां कोणी त्याला सांगितलें, पाहा तुझी आई आणि तुझे भाऊ बाहेर उभीं राहून बोलावयास पाहतात. मग तो सांगणाऱ्याला उत्तर देतां बोलला कीं, माझी आई कोण आहे? आणि माझे भाऊ कोण आहेत? नंतर तो आपल्या शिष्यांवर हात लांब करून बोलला, पाहा माझी आई आणि माझे भाऊ, कां कीं जो कोणी माझ्या आकाशांतील बापाच्या इच्छेप्रमाणें आचरण करील तोच माझा भाऊ व बहीण व आई आहे.

आणि तो बोलतांना कोणी फारिश्याने त्याला विनंती

केली कीं आपल्याजवळ जेवावें; तेव्हां तो आंत जाऊन जेवायास बसला. परंतु त्याने जेवणापूर्वीं आंघोळ केली नाहीं, हें पाहून फारिस्याने आश्चर्य केलें. तेव्हां प्रभु त्याला बोलला, आतां अहो फारिशी, तुह्मी पेला व ताट यांचे बाहेरचें आंग शुद्ध करितां, परंतु तुमचें आंतलें आंग अपहाराने व वाईटपणाने भरलें आहे. अहो निर्बुद्धि, ज्याने बाहेरचें केलें त्याने आंतलेंहि केलें नाहीं कीं काय? अणखी तुह्मास जीं आहेत तीं दान द्या; मग पाहा अवघीं तुम्हास शुद्ध आहेत. परंतु तुम्हा फारिस्यांस हायहाय, कां तर पुदिना व सताप व प्रत्येक रोंप यांचा दाहावा भाग देतां, पण न्याय व देवाची प्रीति चुकतां; हीं केलीं पाहिजेत आणि दुसरीं न सोडिलीं पाहिजेत. तुह्मा फारिस्यांस हायहाय, कारण कीं सभांमध्यें उत्तम आसन आणि अळ्यांत क्षेम गोष्टी तुह्मास आवडतात. अहो पंडित आणि फारिशी ढोंगी तुह्मास हायहाय, कारण कीं तुम्ही जशीं प्रेतपेवें जीं अप्रसिद्ध आणि ज्यांवर मनुष्य चालत असतां न जाणतात, तसे आहां. तेव्हां शास्त्र्यांतील कोणी उत्तर देतां त्याला बोलले, हे गुरू हीं बोलत असतां तूं आह्मा सहि गांजितोस. तेव्हां तो बोलला, तुह्मा शास्त्र्यांसहि हाय हाय, कारण कीं तुह्मी वाहावयास दुर्घट ओझीं माणसांवर घालतां, आणि आपण आपल्या एका बोटाने त्या ओझ्यांस

न शिवतां, तुह्मास हायहाय कारण कीं तुह्मी भविष्यभा
ष्यांचीं थडगीं बांधितां आणि तुमच्या पितरांनी त्यांस जिवें
मारिलें. यास्तव तुह्मी आपल्या पितरांच्या कामांविषयीं
साक्ष देतां आणि संगतीं संतोषित आहां, कां कीं त्यांनी
त्यांस जिवें मारिलें खरें, आणि तुम्ही त्यांचीं थडगीं बांधितां.
ह्यासाठींहि देवाचें ज्ञान बोललें, मी त्यांजवळ भविष्यभाषी
व प्रेषित यांस पाठवीन, आणि यांतून कित्येकांस ते जिवें
मारितील आणि पाठीस फार लागतील; ह्मणून सर्व
भविष्यभाष्यांचें रक्त जें जगाचा पाया घालण्यापासून पाडलें,
त्याचा झाडा या पिढीपासून घेतला जाईल; ह्मणजे हाबे
लाच्या रक्तापासून जखर्या जो वेदीच्या आणि घराच्या मध्यें
घात पावला याच्या रक्तापर्यंत, होय मी तुम्हास सांगतों ह्या
पिढीपासून त्याचा झाडा घेतला जाईल. तुह्मा शास्त्र्यांस
हायहाय कारण कीं तुह्मी ज्ञानाची किल्ली हिरावली
आहे; तुह्मी आपण आंत न गेलां आणि जे आंत जात
आहेत त्यांस प्रतिबंध करितां. आणि त्यांस तो हीं
बोलतां, पंडित व फारिशी त्याशीं भारी भिडूं आणि
बहुतांविषयीं त्याला बोलता करूं लागले; त्याच्या अप
णीस राहिले आणि त्याच्या मुखांतून कांहीं सांपडावयास
झटले, यासाठीं कीं ह्यांनी त्यावर दोष ठेवावा.

अध्याय १२.

समुदायाचे दाहा हजारों असे मिळाले होते कीं त्यांनी एकमेकांस तुडवावें; तेव्हां त्यांमध्यें येशू आपल्या शिष्यांस बोलूं लागला, प्रथम तुह्मी आपणांस फारिस्यांच्या फुगवणा पासून राखा, तेंच ढोंग आहे. तथापि जें प्रगट केलें जाणार नाहीं असें कांहीं झांकिलें नाहीं, आणि जें कळविलें जाणार नाहीं असें गुप्त नाहीं. त्यांविरुद्ध जितकीं तुह्मी काळोखांत बोलला तीं उजेडांत ऐकिलीं जातील, आणि तुम्ही एकांतामध्यें कानांत जें बोलला तें आमा घ्यांवर गाजविलें जाईल; आणि तुह्मा माझ्या सख्यांस मी सांगतों, जे शरीराला जिवें मारितात आणि यानंतर त्यांच्यानी अणखी कांहीं करणें होत नाहीं, त्यांकडून भेवडाविलें जाऊं नका, परंतु तुह्मी कोणाला भ्यावें तो तुम्हास दाखवीन, जिवें मारिल्यावर नरकांत घालावयाचा अधिकार ज्याला आहे त्याला भ्या, होय मी तुह्मास सांगतों त्याला भ्या. पांच चिमण्या दोन पैशांला विकल्या नाहींत कीं काय? तथापि त्यांतून एक देवाच्या पाहण्यांत विसरली जात नाहीं. तुमच्या डोक्याचे केंसहि सर्व मोजले आहेत, यास्तव तुह्मी भिऊं नका तुह्मी बहुत चिमण्यांहून मोलवान् आहां. आणि मी तुह्मास सांगतों, जो कोणी माणसांसमोर माझा कैवार पत्करील त्याचा कैवार माणसाचा पुत्रहि देवाच्या

दूतांसमोर पत्करील आणि जो माणसांसमोर मला नका रील तो देवाच्या दूतांसमोर नकारिला जाईल. आणि जेव्हां ते तुह्मास सभा व सरकार व अधिकार यांजवळ नेतात, तेव्हां तुह्मी कसी किंवा काय तोंड करास, अथवा काय बोलावें याची चिंता करूं नका; कां तर काय ह्मटलीं पाहिजेत तीं पवित्र आत्मा त्याच घटकेस तुह्मास शिकवील.

तेव्हां समुदायामधून कोणी त्याला बोलला, हे गुरू माझ्या भावाला मजशीं वतन वांटावयास सांग; मग तो त्याला बोलला, माणसा, मला तुह्मावर न्यायाधीश अथवा वांटणारा कोणी स्थापिलें? तेव्हां तो त्यांस बोलला, तुह्मी न्याहाळा आणि लोभापासून चौकसीने दूर व्हा; कां तर कोणाला पुष्कळ असतांना त्याचा जीव आपल्या द्रव्यांपासून नाहीं. आणि त्याने त्यांस दाखला सांगितला कीं, कोणा धनवान् माणसाच्या शेतिकाने फार पीक दिलें आणि तो आपल्यांत विचार करितां बोलला, मी काय करूं यास्तव कीं माझीं पिकें सांठवावयास मला जागा नाहीं. मग त्याने ह्मटलें, मी हें करीन कीं आपलीं कोठारें मोडीन आणि त्यांहून मोठीं बांधीन; मग तेथे माझे अवघे उपज आणि माल्मीं कीं उत्तम तीं सांठवीन. नंतर आपल्या जिवाला ह्मणेन, हे जिवा, फार वर्षांसाठीं तुझीं बहुत उत्तम ठेविलीं आहेत, विसांवा घे, खा, पी,

आनंद कर. परंतु देवाने त्याला म्हटलें हे निर्बुद्धि याच रात्रीं तुझा प्राण सोडायाची आज्ञा तुला होईल; तेव्हां त्वां जीं सिद्ध केलीं तीं कोणाचीं होतील? जो आपल्यासाठीं सांचवितो परंतु देवाविषयीं धनवान् नव्हे तो तसाच आहे.

तुमचीं जीं आहेत तीं विका, आणि दान द्या; ज्या पिसव्या जुन्या होत नाहींत, त्या न सरता संग्रह, आकाशां मध्यें तो, जेथें चोर जवळ येत नाहीं आणि कसर नाश करीत नाहीं, तेथे तुम्ही आपल्यासाठीं मिळवा; कां कीं जेथे तुमचा संग्रह आहे तेथे तुमचें चित्तहि होईल. तुमच्या कंबरा कसलेल्या आणि दिवे पाजळलेले होवोत, आणि माणसें आपला प्रभु लग्नकार्यापासून केव्हां माघारें येईल, त्याची अशी वाट पाहतीं कीं तो येऊन आणि ठोकून त्यासाठीं त्यानी तेव्हांच उघडावें, त्यांसारिखे तुह्मी व्हा. प्रभु येऊन जे चाकर पाहाराकरितां त्याला सांपडतील, तेच धन्य; मी तुह्मास खचीत सांगतों कीं तो कंबर बांधील, मग त्यांस जेवायाला बसवील आणि जवळ येऊन त्यांची सेवा करील. आणि तो जर दुसऱ्या प्रहरांत येईल किंवा तिसऱ्या प्रहरांत येईल आणि त्याला असे सांपडतील, तर ते चाकर धन्य आहेत. आणि हें तुह्मी जाणा कीं कोणत्या घटकेस चोर येतो, हें जर घरच्या धन्याला कळलें असतें तर त्याने पाहारा केला असता आणि आपलें

घर फोडलें जाऊं दिलें नसतें, यास्तव तुह्मीहि सिद्ध व्हा, कां तर जी घटका तुम्हास वाटत नाहीं तींत माणसाचा पुत्र येतो.

तेव्हां पेत्रस त्याला बोलला, हे प्रभू, काय, तूं हा दाखला आह्मास किंवा सर्वांसहि सांगतोस? तेव्हां प्रभु बोलला, तर जो विश्वासू व बुद्धिमंत कारभारी ज्याला धनी आपल्या परिवारांवर वेळेस नेहमी शिधा द्यावयास ठेवील तो कोण आहे? जो चाकर आपल्या धन्याला असें करितां सांपडेल तोच धन्य; मी तुह्मास खरें सांगतों कीं त्याला तो आपल्या अवघ्या द्रव्यावर स्थापील. परंतु जर तो चाकर आपल्या मनांत ह्मणतो, माझा धनी येण्यास खोळंबतो आणि दासांस व दासींस मारूं आणि खेवूं व पिऊं व झिंगूं लागेल, तर ज्या दिवशीं तो वाट पाहत नाहीं त्यांत आणि जी घटका कळत नाहीं तींत त्या चाकराचा धनी येईल, आणि त्याचीं खांडें करील आणि अविश्वास्यांसंगतीं त्याचा वांटा ठेवील. आणि ज्या चाकराने आपल्या धन्याची इच्छा जाणली, तथापि आपण सिद्ध न झाला आणि त्याच्या इच्छेप्रमाणे न केलें, तो बहुत फटक्यांनी झोडला जाईल. परंतु ज्याने जाणलें नाहीं आणि फटक्यांस योग्य तीं केलीं, तो थोडक्यांनी झोडला जाईल, आणि ज्या प्रत्येकाला बहुत दिलें आहे त्याजवळ बहुत

शोधिलें जाईल, आणि ज्याच्याजवळ बहुत ठेविलें त्यापाशीं अधिक मागतील. मी पृथ्वीवर विस्तव घालावयास आलों आहें आणि तो इतक्यांत पेटलेला असावा ह्मणून मी किती इच्छितों; परंतु बाप्तिस्मा मला घातला जावयाचा आहे आणि तो समाप्त केला तोंपर्यंत मी कसें पेंचलों आहें. मी पृथ्वीवर शांति द्यावयास आलों असें तुह्मास वाटतें कीं काय? मी तुह्मास ह्मणतों, नव्हे, परंतु त्यापेक्षां भेद, कां कीं आतांपासून एका घरांत पांच भेदलेले, दोघां वर तिघे आणि तिघांवर दोघे असे होतील; पुत्रावर बाप आणि बापावर पुत्र, कन्येवर आई आणि आईवर कन्या, सासू आपल्या सुनेवर आणि सून आपल्या सासू वर भेदली जाईल. अणखी तो समुदायांस बोलला, जेव्हां तुह्मी ढगाला पश्चिमेपासून उगवतां पाहतां तेव्हांच तुम्ही ह्मणतां, पाहाळी येती आणि तसें होतें; आणि जेव्हां दक्षण वाऱ्याला सुटतां पाहातां तेव्हां तुह्मी ह्मणतां कीं, उष्ण होईल आणि होतें. अहो ढोंगी, तुह्मी पृथ्वीच्या आणि आकाशांच्या स्वरूपाला पारखावयास जाण तां; तर या समयाला तुम्ही कसें न पारखितां? अणखी काय यथार्थ हें तुह्मी आपणांकडूनच कां न ठरवितां? कारण कीं जेव्हां तूं आपल्या वाद्यासंगातें अधिकाऱ्या जवळ जातोस तेव्हां त्यापासून समेटानें सुटावयास श्रम कर,

नाहींतर कदाचित् तो तुला न्यायाधीशाजवळ ओढील आणि न्यायाधीश तुला हलकाच्या स्वाधीन करील, आणि हलक तुला बंदिशाळेंत घालील; मी तुला सांगतों तूं शेवटील दमडीहि फेडितोस तोंपर्यंत तेथून बाहेर येणार नाहींस.

## अध्याय १८.

आणि ज्या गालोल्यांचें रक्त पिलातसाने त्यांच्या मारल्या अर्पणांच्यासंगतीं भेळविलें, त्यांविषयीं त्याला सांगते असे कित्येक तेथे होते. तेव्हां येशू उत्तर देतां त्यांस बोलला, ह्या गालोल्यानी एवढीं सोसिलीं यास्तव सर्व गालील्यांपेक्षां ते पापी होते असें तुम्हास दिसतें कीं काय? मी तुह्मास सांगतों, नव्हते; परंतु जर तुह्मी पश्चात्ताप न करितां, तर तुह्मी सर्व त्याप्रमाणे नाश पावाल. किंवा ज्या अठरांवर शिलोहांतील बुरुजाने पडून त्यांस जिवें मारिलें, ते यरुशालेमांतील सर्व राहणाच्या माणसांहून ओशाळे होते असें तुह्मास दिसतें कीं काय? मी तुह्मास सांगतों, नव्हते; परंतु जर तुम्ही पश्चात्ताप न करितां तर तुह्मी सर्व त्यां सारिखा नाश पावाल. तेव्हां त्याने हा दाखला सांगितला, कोणाला याच्या द्राक्षमळ्यांत लाविलेलें अंजीर झाड होतें आणि त्यावेळीं फळ शोधितां तो आला, परंतु त्याला सांपडलें नाहीं. तेव्हां तो माळ्याला बोलला, पाहा तीन वर्षें या अंजिरावर फळ शोधीत येतों, परंतु

मला योग्य वाटत नाहीं; तर त्याला कापून टाक, तो भूमीस भारच कां होतो? तेव्हां तो उत्तर देतां त्याला बोलला, हे धन्या, त्याला यंदांहि असूं दे, एथपर्यंत कीं मी त्या च्या भोंवतें खणीन आणि खत घालीन; मग कदाचित् फळ देईल खरें, आणि जर नाहींच, तर त्या उपरांत त्याला कापून टाकशील.

आणि त्याच दिवशीं येशू घरांतून निघून समुद्राजवळ बसला, आणि तो फिरून उपदेश करूं लागला. तेव्हां असा मोठा समुदाय त्यापाशीं मिळाला कीं त्याच्या दाटी मुळें तो समुद्रांत तारवावर चढून बसला आणि सर्व समुदाय तीरीं राहिला. तेव्हां त्याने दाखले देऊन त्यांस बहुत गोष्टींचा उपदेश केला. आणि करते वेळेस त्यांस सांगितलें; तुम्ही ऐका, पाहा कोणीएक पेरणारा पेरावयास निघाला, आणि पेरते वेळेस असें झालें कांहीं वाटेस पडलें आणि तें पांखरांनी येऊन खालें. आणि कांहीं खडकाळ भुमी वर जेथें त्याला फार माती नव्हती तेथें पडलें, आणि जमिनीच्या उथळपणामुळें लवकर उगवलें, आणि सूर्य उगवल्यावर तें करपलें आणि त्याला मूळ नाहीं यास्तव वाळून गेलें. आणि कांहीं कांट्यांच्या झाडांमध्यें पडलें मग कांट्यांच्या झाडांनी वाढून त्याला दडपिलें त्यामुळें त्या पासून कांहीं उत्पन्न झालें नाहीं. परंतु कांहीं चांगल्या

भूमींत पडलें आणि तें उगवून आणि मोठें होऊन त्या पासून कोठें तीसपट आणि कोठें साठपट आणि कोठें शंभरपट असें उत्पन्न झालें. हीं बोलून त्याने हाक दिल्ही कीं ज्याला ऐकावयास कान आहेत तो ऐको.

आणि तो एकला झाला तेव्हां त्याभोंवतें जे ते त्या बारांसहित त्याला विचारितां बोलले, हा दाखला काय असेल? आणि कशास्तव दाखल्यांनी त्यांशीं बोलतोस? आणि त्याने त्यांस म्हटलें, देवाच्या राज्याचें गूढपण जाणणें तुह्मास दिल्हें आहे, परंतु बाहेरचे जे त्यांस अवघीं हाय त्यांकडून घडतात. कां कीं ज्या कोणाला आहे त्याला दिल्हें जाईल आणि त्याला जत होईल, परंतु ज्या कोणाला नाहीं त्याजपाशीं जें आहे तेंहि त्याजपासून घेतलें जाईल. यास्तव मी त्यांशीं दाखल्यांनी बोलतों, कीं त्यांनी पाहत असतां पाहावें, परंतु न जाणावें, आणि ऐकत असतां ऐकावें, परंतु न समजावें; नाहीं तर त्यांनी कध फिरावें आणि पापें त्यांस सोडलीं जावीं. आणि यशा याचें भविष्य त्यांविषयीं पूर्ण झालें ज्याप्रमाणे असें सांगितलें आहे कीं, तुम्ही ऐकण्याने ऐकाल परंतु समजणार नाहीं, आणि पाहतां पाहाल परंतु तुम्हास दिसणार नाहीं. तर ह्या लोकांचें अंतःकरण जड झालें आहे, कानांनी मंद ऐकतात, आपले डोळेहि त्यांनी मिटले आहेत; नाहीं तर

कधीं तरी आपल्या डोळ्यांनी पाहतील, कानांनी ऐकतील, अंतःकरणाने समजतील, आपण फिरवलेले, जातील आणि मी त्यांस निरोगी करीन. परंतु तुमचे डोळे धन्य कां कीं ते पाहतात, आणि तुमचे कान धन्य कां कीं ते ऐकतात, कारण तुम्हास खचीत सांगतों कीं जीं तुम्ही पाहतां तीं बहुत भविष्यभाष्यांनी व नीतिमंतांनी पाहावयास इच्छिलीं होतीं परंतु पाहिलीं नव्हतीं, आणि जीं तुम्ही ऐकतां तीं ऐका वयास इच्छिलीं, परंतु ऐकिलीं नव्हतीं. असें असतां तुम्ही पेरणाऱ्याचा दाखला ऐका; कोणीएक राज्याची गोष्ट ऐकतो पण समजत नाहीं, तेव्हां जो दुष्ट तो येतो आणि त्याच्या अंतःकरणांत जें पेरलेलें तें हरण करितो; मार्गा जवळ जो बीज मिळविणार तो हाच आहे. आणि जो खडकाळीवर बीज मिळविणारा तो हाच आहे, कीं गोष्ट ऐकतो आणि अकस्मात् तिला आनंदाने घेतो, तथापि त्याला अंतरीं मूळ नाहीं पण तो क्षणिक आहे, आणि गोष्टीकरितां हाल अथवा पाठलाग प्राप्त झाल्यावर तो अकस्मात् अडखळतो. आणि जो कांट्यांच्या झाडांमध्यें बीज मिळविणारा तो हाच आहे, कीं गोष्ट ऐकतो परंतु या जगाच्या चिंता व धनाचें ठकपण व इतरांच्या हांवा शिरून गोष्टीस दबवितात आणि ती निष्फळ होत असती. आणि जो चांगल्या भूमींत बीज मिळविणारा तो हाच

आहे, की गोष्ट ऐकतो व समजतो, तोच फळ देतो, म्हणजे कोणी शंभरपटहि आणि कोणी साठपट आणि कोणी तीस पट देतो.

आणि कोणी दिवा लावून भांड्याने त्याला झांकीत किंवा बाजेखाली ठेवीत नाहीं, परंतु आंत येणारे जे त्यांनी उजेड पाहावा म्हणून समईवर ठेवितो. कां तर उघडें होणार नाहीं असें कांहीं गुप्त नाहीं, आणि कळविलें जातांना उघड्यांत येणार नाहीं असें कांहीं लपविलें नाहीं. यास्तव तुम्ही कसें ऐकतां याविषयीं न्याहाळा, कां कीं ज्याला असेल त्याला दिल्हें जाईल; परंतु ज्याला नसेल त्याचें जें दिसतें तें देखील त्यापासून घेतलें जाईल.

## अध्याय १९.

तो त्यांस दुसरा दाखला देत बोलला, आकाशांच्या राज्याला ही उपमा द्यावयाची आहे, कीं माणसानें आपल्या शेतांत चांगलें बीज पेरिलें; परंतु माणसें निजलीं होतीं तेव्हां त्याचा वैरी आला आणि गव्हांमध्यें निदण पेरून गेला. मग जेव्हां पाला फुटला आणि त्यानें फळ दिल्हें, तेव्हां निदणहि दिसलें; तेव्हां गृहपतीच्या चाकरांनी जवळ येऊन त्याला म्हटलें, हे प्रभू त्वां आपल्या शेतामध्यें चांगलें बीज पेरिलें कीं नाहीं? त्यांत तर निदण कोठून आलें? तेव्हां तो त्यांस बोलला कोणी वैऱ्यानें हें केलें आहे.

मग चाकरांनी त्याला ह्मटलें, तर आह्मी जाऊन तें जमा करावें असें इच्छितोस कीं काय? तेव्हां तो बोलला, नका, तुह्मी निंदण जमा करास त्याच्याबरोबर कदाचित् गहूं उपटाल, कापणीपर्यंत दोन्ही बरोबर वाढूं द्या; मग कापणीच्या समयीं मी कापणाऱ्यांस सांगेन कीं, तुह्मी पहिल्याने निंदण जमा करा आणि त्यास जाळण्यासाठीं त्याच्या पेंढ्या बांधा, मग गहूं माझ्या कोठारांत सांठवा.

आणि त्याने ह्मटलें, देवाचें राज्य असें आहे कीं माणसाने बीज भूमीवर टाकावें, मग त्याने रात्रीस निजावें आणि दिवसास उठावें आणि तें बीज कसें उगवतें आणि वाढतें हें त्याच्या लक्षांत न येतां त्या बीजाने उगवावें आणि वाढावें. कारण कीं भूमि आपल्या आपण पीक देती, ह्मणजे पहिल्याने अंकुर उत्पन्न व्हावा मग कणीस निसवावें मग कणसांस दाणा भरावा असें भूमि करिती. नंतर जेव्हां पीक चांगलें पिकविती तेव्हांच तो विळा चालवितो कारण कीं शेत कापणीस आलें आहे.

तो त्यांस दुसरा दाखला देतां बोलला कीं, आकाशाचें राज्य मोहरीच्या बीजासारिखें आहे; तें बीज माणसाने घेऊन आपल्या शेतांत पेरिलें. तें सर्व बीजांपेक्षां बारीक आहे, परंतु जेव्हां वाढलें आहे तेव्हां रोपांत मोठें आहे आणि असें झाड होतें कीं आकाशांतील पां

घरें येऊन त्याच्या फांद्यांवर वस्तीस राहतात. त्याने त्यांस दुसरा दाखला सांगितला कीं, खमीर बायकोने घेऊन तीन मापें पिठामध्यें सगळें फुगे तोंपर्यंत गुप्त ठेविलें, त्या सारिखें आकाशांचें राज्य आहे.

येशूने दाखल्यांवरून हीं अवघीं समुदायांस म्हटलीं आणि दाखल्यावांचून तो त्यांस बोलला नाहीं; अशासाठीं कीं भविष्य भाष्याच्याद्वारें जें म्हटलें तें पूर्ण व्हावें कीं, मी आपलें तोंड दाखल्यांनी उघडीन; जगाच्या मांडण्यापासून जीं लपविलीं तीं गाजवीन; नंतर येशू समुदायांस जाऊं देऊन घरांत गेला. मग त्याचे शिष्य त्याच्याजवळ येऊन बोलले, शेतांतल्या निंदणाचा दाखला आह्मास फोडून सांग. तेव्हां उत्तर देतां त्याने त्यांस म्हटलें, जो चांगलें बीज पेरणारा तो मनुष्याचा पुत्र आहे, आणि जें शेत तें जग आहे, आणि जें चांगलें बीज तें राज्याचे पुत्र आहेत, आणि जें निंदण तें त्या दुष्टाचे पुत्र आहेत, आणि ज्या वैऱ्याने तें पेरलें तो सैतान आहे. आणि कापणी ती जगाची समाप्ति आहे, आणि जे कापणारे ते दूत आहेत. तर जसें निंदण जमा केलें जातें आणि अग्नींत जाळलें जातें, तसें ह्या जगाच्या समाप्तीस होईल. मनुष्याचा पुत्र आपल्या दूतांस पाठवील आणि ते सर्व अडखळणाऱ्यांस व सर्व अनियम करणाऱ्यांस त्याच्या राज्यांतून

जमा करितील, आणि त्यांस अग्नीच्या भट्टींत टाकतील. तेथे रडणें व दांत कडकडविणें होईल. तेव्हां जे नीतिमान् ते आपल्या बापाच्या राज्यांत सूर्यासारिखे प्रकाशतील; ज्याला ऐकावयास कान आहेत त्याने ऐकावें.

अणखी आकाशांचें राज्य शेतांत लपविलेल्या भांडारासारिखें आहे, हें माणसाला सांपडून तो तें गुप्त ठेवितो; मग त्याला आनंद होऊन तो जातो आणि आपलीं जितकीं आहेत तीं अवघीं विकतो, नंतर तें शेत विकत घेतो. अणखी व्यापारी मनुष्य चांगल्या मोत्यांस शोधितो, ह्यासारिखें आकाशांचें राज्य आहे. त्याला फार मोलाचें एक मोतीं ह्याचा शोध लागल्यावर आपलीं जितकीं होतीं तीं अवघीं त्याने जाऊन विकलीं, मग तें विकत घेतलें. अणखी समुद्रांत टाकलेल्या जाळ्यामध्यें सर्व प्रकारचे जीव जमा केले होते, त्यासारिखें आकाशांचें राज्य आहे; तें भरल्यावर लोकानी तीरास ओढून आणि बसून जे चांगले त्यांस भांड्यांमध्यें भरितात, आणि जे वाईट त्यांस बाहेर टाकितात. तसें जगाच्या समाप्तीस होईल, दूत येतील आणि नीतिमानांमधून दुष्टांस वेगवेगळे करितील, आणि त्यांस अग्नीच्या भट्टींत टाकतील; तेथे रडणें व दांत कडकडविणें होईल. येशू त्यांस म्हणतो कीं, तुम्ही हीं अवघीं समजलां कीं काय? ते त्याला म्हणतात होय प्रभू.

तेव्हां त्याने त्यांस म्हटलें, त्यासाठीं जो गुरु आकाशांच्या राज्याविषयीं शिकलेला आहे तो गृहस्थ मनुष्यासारिखा आहे, जो आपल्या भांडारांतून नवीं व जुनीं काढितो त्यासारिखा आहे. आणि असें झालें कीं येशू हे दाखले संपवून तेथून गेला.

तेव्हां येशूने आपल्या भोंवतें बहुत समुदायांस पाहून पलिकडे जावयास आज्ञा दिल्ही. मग एक पंडित जवळ येऊन त्यास बोलला, हे उपदेशका जेथे जेथे तूं जासील, तेथे तेथे मी तुझ्या मागें येईन. तेव्हां येशू त्यास म्हणतो, कीं ख्यांस बिळें आणि आकाशाच्या पांखरांस कोठीं आहेत, परंतु माणसाच्या पुत्रास कोठे डोकें टेंकावें असें नाहीं. मग त्याच्या शिष्यांतील दुसरा त्याला बोलला, हे प्रभु, अगोदर माझ्या बापाला पुरावयास मला जाऊं दे. परंतु येशू त्याला बोलला, तूं माझ्यामागें ये आणि जे मेले त्यांस आपल्या मेलेल्यांस पुरूं दे, परंतु तूं जाऊन देवाच्या राज्याचें वर्त्तमान प्रगट सांग. तेव्हां दुसराहि बोलला, हे प्रभू मी तुला अनुसरेन परंतु पहिलें माझ्या घरीं जे आहेत त्यांची निरवणी मला करूं दे; तेव्हां येशू त्याला बोलला, कोणी आपला हात नांगरास लावितो आणि माघारें पाहतो तो देवाच्या राज्याजोगा नाहीं.

मग तो तारवावर जाऊन त्याचे शिष्य त्याच्यामागें गेले,

तेव्हां ते हाकारून जात असतां, आणि पाहा समुद्रांत एवढें मोठें वादळ झालें कीं तारूं लाटांनी झांकलें, परंतु तो तारवाच्या मुकाणीं उशीवर निजला होता. तेव्हां ते त्याला उठवितात आणि त्याला ह्मणतात, हे गुरू, आम्ही नाश पावतों याची तुला चिंता नाहीं कीं काय? तेव्हां त्यानें उठून वाऱ्याला धमकाविलें आणि समुद्राला ह्मटलें, उगा हो, मुका राहा, मग वारा राहिला आणि फार शांतपण झालें. नंतर त्यानें त्यांस म्हटलें, तुह्मी एवढे भिकूड कां आहां? तुह्मी विश्वास कसें न बाळगितां? तेव्हां ते मोठ्या भयानें भ्याले, आणि एकमेकांसीं बोलले, तरीं हा कोण आहे? कीं वारा आणि समुद्र देखील त्याचें ऐकतात?

## अध्याय २०.

मग ते समुद्राच्या पलिकडे गादरेकरांचा देश जो गालिलाच्या समोर आहे तेथे आले, आणि तो तारवांतून उतरतांक्षणींच अशुद्ध आत्म्यानें युक्त असा एक मनुष्य प्रेतस्थानांतून येऊन त्याला भेटला, तो प्रेतस्थानांमध्यें राहत असे आणि कोणाच्यानें त्याला सांखळांनींहि बांधवत नव्हतें. कारण तो बहुत वेळा बेड्यांनी आणि सांखळांनी बांधला होता परंतु तो सांखळा तोडीत असे आणि बेड्या मोडून टाकीत असे; ह्या प्रकारें त्याला स्वाधीन करण्याविषयीं

कोणाची शक्ति चालली नाहीं, आणि तो निरंतर रात्रं दिवस डोंगरांमध्यें आणि प्रेतस्थानांमध्यें ओरडत असे आणि आपण आपल्याला धोंड्यांनी मारून घेत असे. तेव्हां तो येशूला दुरून पाहून धांवला आणि त्याच्या पायां पडला; आणि मोठ्या शब्दाने ओरडून बोलला, हे येशू परात्पर देवाच्या पुत्रा मशीं आणि तुशीं संबंध काय? त्वां मला पीडूं नये म्हणून मी तुला देवाची शपथ घालितों. कारण त्याने त्याला म्हटलें होतें, अरे अशुद्ध आत्म्या तूं या मनुष्यांतून निघ, आणि त्याला पुसलें तुझें नाव काय? तेव्हां त्याने उत्तर केलें कीं, माझें नाव सेनासमुदाय आहे, कारण कीं आम्ही पुष्कळ आहों. आणि त्याने त्याला बहुत प्रकारें विनंती केली कीं, आम्हास देशांतून न घालवावें. आणि तेथे डोंगरांवर डुकरांचा मोठा कळप चरत होता. तेव्हां त्या सर्व भुतांनी त्याला विनंती केली कीं, त्या डुकरांमध्यें प्रवेश करावयाकरितां आम्हाला जावयाची आज्ञा दे. मग येशूने तेव्हांच त्यांस जाऊं दिलें आणि अशुद्ध आत्म्यांनी त्यापासून निघून त्या डुकरांमध्यें प्रवेश केला? तीं सुमारें दोन हजार होतीं; मग तो कळप कड्यावरून धांवून समुद्रांत पडून दम कोंडून मेला. मग जे डुकरांस चारीत होते ते पळाले आणि त्यांनी नगरामध्यें आणि वाड्यामध्यें वर्त्तमान सांगितलें. आणि

जें हें काय झालें आहे असें म्हणून पाहावयास ते बाहेर गेले आणि येशूजवळ आले; तेव्हां ज्या माणसांतून भुतें निघालीं, तो नेसला आणि शुद्धीवर आला असतां येशूच्या पायांजवळ बसलेला त्यांस सांपडला, आणि ते भ्याले. मग ज्यांनी पाहिलें त्यांनी त्यांस भूतग्रस्ताला कसें झालें आणि डुकरांविषयीं सविस्तर सांगितलें. तेव्हां त्या गादारेकरांच्या चहूंकडल्या सर्व भरणा यांनी त्याजवळ मागितलें कीं, आपणापासून जावें; कां तर मोठें भय त्यांस लागलें. मग तो तारवांत चढून माघारें गेला, आणि ज्या माणसांतून भुतें निघालीं त्याने त्याच्याजवळ असावयास प्रार्थना केली. तथापि येशूनें त्याला येऊं दिलें नाहीं परंतु तो त्याला म्हणाला तूं आपल्या घरीं आपल्या माणसांकडे जा आणि प्रभूनें तुजवर दया करून तुझ्यासाठीं जीं जीं मोठीं कार्यें केलीं तीं तीं त्यांस सांग. तेव्हां तो निघाला आणि येशूनें त्यासाठीं जीं मोठीं कृत्यें केलीं होतीं तीं तो देकापलीसांत घोषण करूं लागला, आणि सर्वांनी तें ऐकून आश्चर्य केलें.

तेव्हां तो तारवावर चढून पलिकडे गेला आणि आपल्या नगरास आला, आणि मोठा समुदाय त्याजवळ मिळाला, कां तर सर्व त्याची वाट पाहत होते. आणि लेवीनें आपल्या घरीं त्याच्यासाठीं मोठी जेवणावळ केली, आणि

तो घरांत जेवायास बसला असतां असें झालें कीं, पाहा बहुत जकातदार व पापी येशूजवळ आणि त्याच्या शिष्यांजवळ बसले. तेव्हां फारिशी पाहून त्याच्या शिष्यांस बोलले, जकातदार व पापी यांबराबर तुमचा उपदेशक कां खातो ? मग येशूनें ऐकून त्यांस म्हटलें कीं, जे बळवान् त्यांस वैद्याचें अगत्य नाहीं, परंतु जे दुखणेकरी त्यांस. परंतु यज्ञापेक्षां मी दया इच्छितों हें काय आहे तें शिका, यास्तव कीं नीतिमंतांस बोलावावयास आलों नाहीं परंतु पाप्यांस बोलवावयास आलों. तेव्हां योहानाचे शिष्य त्याच्याजवळ येऊन बोलले, आम्ही आणि फारिशी बहुत उपास करितों परंतु तुझे शिष्य उपास करीत नाहींत, याचें कारण काय ? तेव्हां येशू त्यांस बोलला, वऱ्हाडांत वर बरोबर आहे तोंपर्यंत त्याच्या सख्याच्यानें उपास करवतो कीं काय ? जितका वेळ वर बरोबर आहे तितका वेळ त्यांच्यानें उपास करवत नाहीं. परंतु ज्या दिवसांत वर त्यांपासून काढून नेला जाईल असा दिवस येईल आणि मग त्या दिवसांत ते उपास करितील.

आणि त्यानें त्यांस दाखलाहि सांगितला कीं, जुन्या वस्त्राला नव्या वस्त्राचें थिगळ कोणी न लावितो; आणि जर अन्यथा तर नवें जुन्याला फाडितें, नव्याचें थिगळ जुन्याला संगतहि होत नाहीं. आणि नवा द्राक्षरस जुन्या बुधल्यांत

कोणी न घालतो ; आणि जर अन्यथा तर नवा द्राक्षरस जुन्या बुधल्यांस फोडील आणि तो ओघळेल , बुधलेहि नासतील ; परंतु नवा द्राक्षरस नव्या बुधल्यांत घालता असावा , मग दोन्हीं राखिलीं जातील. आणि कोणी जुना द्राक्षरस पिऊन तेव्हांच नवा इच्छीत नाहीं , कां कीं तो म्हणतो , जुना अधिक चांगला आहे. तो त्यांसंगातीं बोलत असतां पाहा सभापतींतील एक नावें याईरस तो येतो आणि त्याला पाहून त्याच्या पायांजवळ पडतो आणि त्याला फार विनंती करीत बोलला कीं , माझी लाहान कन्या अंतगतींत आहे , तर तिने राखिलें जावें म्हणून त्वां येऊन तिजवर हात ठेवावे , मग ती वांचेल. आणि येशू उठून त्याच्यामागें गेला , त्याचे शिष्यहि त्याच्या बरोबर गेले आणि तो जात असतां मोठा समुदाय त्याच्या मागें लागून त्याला चेंगरलें. आणि कोणी एके स्त्रीला बारा वर्षें रक्तस्राव होत होता. आणि तिने बहुत वैद्यांपासून उपचार करून बहुत उपद्रव सोसिले आणि आपला अवघें सर्वस्व खर्चिलें तथापि तिला कांहीं गुण आला नाहीं दुखणें मात्र अधिक वाढलें. ती स्त्री येशूचें वर्तमान ऐकून समुदायांत मिळून मागें येऊन त्याच्या वस्त्राला स्पर्श केला. कारण किं तिने असें मनांत आणिलें किं जर मी त्याच्या वस्त्रास स्पर्श मात्र करीन तर आरोग्य

पावेन. तत्काळ तिच्या रक्ताचा झरा सुकून गेला आणि तिला शरिरांत असा अनुभव झाला कीं, मी त्या उपद्रवापासून मुक्त झालें. मग येशू बोलला, मला कोण शिवलें? तेव्हां सर्व नकारीत असतां पेत्र आणि त्याच्या बरोबर जे ते बोलले, हे समुदाय तुला लागतात व चापतात आणि मला कोण शिवलें हें काय ह्मणतोस? तेव्हां येशू बोलला, कोणी मला शिवलें, कां तर माझ्यांतून सामर्थ्य निघालें, हें मला ठाऊक आहे. मग स्त्री आपण लपली न गेली, हें पाहून कांपत आली आणि कोणत्या कारणाकरितां त्याला शिवली आणि तेव्हांच कशी निरोगी झाली, हें त्याच्या पुढें पडून सर्व लोकांसमोर तिने त्याला सांगितलें. तेव्हां तो तिला बोलला, हे कन्ये धीर धर, तुझ्या विश्वासानें तुला तारिलें; सुखानें जा, आणि आपल्या पटकीपासून बरी ऐस. तो बोलतां इतक्यांत सभापतीच्या घरापासून कोणी येऊन म्हणतात, कीं तुझी कन्या मेली; गुरूला अणखी श्रम कां देतोस? मग येशू ह्मटलेली गोष्ट ऐकून वर्यावर सभापतीला म्हणतो, भिऊं नको, केवळ विश्वास धर, ह्मणजे ती तारली जाईल. मग तो सभापतीच्या घरीं येऊन आणि गलबला [म्हणजे] अति रडणारे आणि आकांत करणारे यांस पाहून आंत जाऊन त्यांस म्हणाला तुम्ही कशाला गलबला करितां

आणि रडतां. मूल मेली नाहीं झोंपेंत आहे. तेव्हां त्यांनी त्याचा उपहास केला, मग तो त्या सर्वांस बाहेर काढून मुलीचा बाप आणि आई आणि आपल्या बरो बरचे [मनुष्य] ह्यांस घेऊन जेथें मूल निजविली होती तेथें आंत गेला. आणि त्या मुलीचा हात धरून तिला ह्मणाला तुला आज्ञा करितों टालीथा कूमी ह्याचा अर्थ हे मुली ऊठ. तत्काल मुलगी उठली आणि चालली कारण किं ती बारावर्षांची होती. नंतर ते अति विस्मय पावले. तेव्हां कोणाला हें [वर्तमान] कळवूं नका असी त्याने त्यांस दृढ आज्ञा केली आणि तिला खावयास द्या असें सांगितलें. नंतर ही कीर्त्ति संपूर्ण देशांत गेली.

## अध्याय २१.

आणि येशू तेथून जात असतां दोन आंधळे त्याच्या मागें गेले आणि ओरडून बोलले, हे दाविदाच्या पुत्रा, आह्मावर दया कर. मग तो घरांत गेल्यावर ते आंधळे त्याच्याजवळ आले, आणि येशू त्यांस ह्मणतो कीं, तें करावयास मी समर्थ आहें असें तुह्मी विश्वासितां कीं काय? त्याला ह्मणतात, होय प्रभू; तेव्हां तुमच्या विश्वासाप्रमाणे तुह्मास होवो, असें बोलून त्याने त्यांचे डोळे शिवले आणि त्यांचे डोळे उघडले गेले. मग येशू त्यांस बजावून बोलला कीं, हें कोणी न समजावें याविषयीं तुह्मी जपा. परंतु

त्याणी बाहेर जाऊन त्या संपूर्ण देशांत त्याची कीर्त्ति प्रकट केली. मग पाहा, ते बाहेर गेल्यावर त्याणी त्याच्या जवळ मुक्या भूतग्रस्ताला आणिलें, आणि भूत घालविल्या वर तो मुका बोलला, आणि समुदाय आश्चर्य करून ह्मणाले कीं, याप्रमाणें इस्राएलामध्यें कधींहि पाहिलें नाहीं; परंतु फारिशी बोलले, कीं भुतांच्या अधिकाऱ्या करून हा भुतांस घालवितो.

नंतर तो तेथून निघाला आणि आपल्या देशास आला, त्याचे शिष्यहि त्याच्या मागें आले; मग शाब्बाथ होऊन तो सभेंत उपदेशूं लागला. तेव्हां पुष्कळ ऐकून चकित होऊन बोलले, हें ज्ञान आणि ही अपूर्व शक्ति त्याला कोठून आली? हा त्या सुताराचा पुत्र कीं नाहीं? त्याची आई मारया ह्मटलेली कीं नाहीं? आणि त्याचे भाऊ याकोब व योसेफ व शीमोन व यहूदा कीं नाहींत? आणि त्याच्या सर्व बहिणी आमच्याजवळ आहेत कीं नाहीं? यास्तव हीं सर्व त्याला कोठून आलीं? असें ते त्याविषयीं अडखळले. तेव्हां येशू त्यांस बोलला कीं, भविष्यभाषी आपल्या देशांत व नातलगांमध्यें व आपल्या घरीं नसतां तो सन्मानाविरहित नाहीं; आणि याने थोडक्या विकाऱ्यांवर आपले हात ठेवून त्यांस निरोगी केलें, याखेरीज कोणी

चमत्कार त्याच्याने तेथे न करवला, आणि त्याने त्यांच्या अविश्वासामुळें आश्चर्य केलें.

आणि समुदायांस पाहून त्यास कळवळा आला, यास्तव कीं मेंढक्यावांचून अशीं मेंढरें तसे ते पांगलेले व टाकलेले होते. तेव्हां तो आपल्या शिष्यांस बोलतो कीं, पीक फार आहे परंतु कामकरी थोडे, यास्तव तुम्ही पिकाच्या धन्याची प्रार्थना करावी कीं त्याच्या पिकासाठीं त्याने काम करी लावावे. तेव्हां त्याने आपल्या बारा शिष्यांस जवळ बोलावून त्यांस अशुद्ध आत्म्यांवर असा अधिकार दिल्हा कीं त्यांस घालवावें आणि सर्व रोग व विकृति यांचें निवारण करावें. आणि तो दोघांस पाठवूं लागला व त्यांस नियमित करून सांगितलें कीं, परप्रजांच्या वाटेंत तुम्ही जाऊं नका, आणि शोमरोनकरांच्या नगरांत जाऊं नका, पण त्यांपेक्षां इस्राएलाच्या घरचीं जीं हरपलेलीं मेंढरें त्यां जवळ जा. आणि जातांना गाजवीत बोला कीं, आकाशांचें राज्य जवळ आलें आहे, रोग्यांस निरोगी करा, मेलेल्यांस उठवा, कोड्यांस शुद्ध करा, भुतांस घालवा, फुकट तुम्हास मिळालें फुकट द्या. सोनें किंवा रुपें किंवा तांबें आपल्या कंबरकशांमध्यें घेऊं नका, वाटेसाठीं झोळणा किंवा दोन आंगरखे किंवा वाहाणा किंवा काठ्या घेऊं नका, कां कीं कामकरी आपल्या पोषणास योग्य आहे. आणि

ह्या नगरांत किंवा गांवांत तुह्मी जातां त्यांत कोण योग्य आहे असें पुसा, आणि तुह्मी निघून जाणार तोंपर्यंत तेथे राहा; आणि घरांत जातांना त्यास क्षेम द्या, आणि तें घर जर योग्यच असेल तर तुमचा सलाम त्याजवर जावो, परंतु जर तें योग्य नाहीं तर तुमचा सलाम तुह्मा जवळ परत येवो. आणि जर कोणी तुह्मास स्वीकार णार नाहीं आणि तुमच्या गोष्टी ऐकणार नाहीं, तर त्या घरांतून किंवा त्या शहरांतून निघतांना त्यावर साक्ष होण्यासाठीं तुह्मी आपल्या पायांची धूळ झाडून टाका; मी तुह्मास खचीत सांगतों कीं न्यायठरविण्याच्या दिवशीं सदोम व गमोरा ह्या देशाला त्या नगरापेक्षां सहज पडेल.

पाहा जसें लांडग्यांमध्यें मेंढरें तसें मी तुह्माला पाठ वितों, यास्तव तुह्मी सापांसारिखे चतुर व्हा आणि कबुतरां सारिखे साळसूद व्हा. आणि माणसांविषयीं तुह्मी सावध व्हा, यास्तव कीं ते तुह्मास न्याय सभांच्या स्वाधीन करि तील, आणि त्यांच्या सभांमध्यें तुह्माला मार देतील, आणि सुभेदार व राजे ह्यांजवळ तुह्मी माझ्यासाठीं नेले जाल, कां कीं त्यांस व परप्रजांस प्रमाण व्हावें. परंतु जेव्हां तुम्हास परस्वाधीन करितील तेव्हां कसें अथवा काय बोलावें, ह्याविषयीं फार चिंता करूं नका; यास्तव कीं तुम्ही काय बोलावें, हें त्या घटकेस तुम्हास दिलें जाईल,

का कीं जे बोलणारे ते तुम्ही नव्हेत परंतु जो तुमच्या बापाचा आत्मा तो तुह्मामध्यें बोलतो. आणि भाऊ भाऊास आणि बाप लेंकराला मरणाकडे परस्वाधीन करील, आणि लेंकरें आईबापांवर उठून त्यांस वधवितील; आणि मा नामासाठीं तुह्मी सर्वांकडून द्वेषिले जाल, परंतु जो शेवट पर्यंत टिकेल तोच तारिला जाईल. आणि जेव्हां एका नगरांत तुमचा पाठलाग करितील तेव्हां दुसऱ्या नगरांत पळा; का कीं मी तुह्मास खचीत सांगतों, कीं मनुष्याचा पुत्र येई तोंपर्यंत इस्राएलाच्या नगरांत तुमचें फिरणें समाप्त होणार नाहीं. शिष्य गुरूच्या वरचढ नाहीं; आणि चाकर धन्याच्या वरचढ नाहीं; शिष्य आपल्या गुरूसारिखा आणि चाकर आपल्या धन्यासारिखा असावा, इतकेंच पुरें. घरधन्यास जर त्यांनी बालजबूल ह्मटलें तर घरच्यांस किती विशेषेंकरून ह्मणतील; यास्तव त्यांस भिऊं नका, का कीं जें उघडें केलें जाणार नाहीं असें कांहींच झांकलेलें नाहीं, आणि जें कळविलें जाणार नाहीं असें कांहीं गुप्त नाहीं. मी जें अंधारांत ह्मणतों तें तुह्मी उजेडांत सांगा, आणि जें तुह्मी कानानी ऐकतां तें घरावर गाजवा. आणि जे शरिराला वधितात पण आत्म्याला वधावयास शक्तिमान् नाहींत त्यांस भिऊं नका, परंतु जो आत्मा व शरीर यांचा नरकांत नाश करावयास समर्थ

आहे त्यास विश्वेंकरून भ्या. दोन चिमण्या एक पैशाला विकल्या नाहींत कीं काय? तथापि तुमच्या बापावांचून एक त्यांतून भूमीवर पडणार नाहीं, आणि तुमच्या डोक्याचे केंसहि सर्व मोजलेले आहेत; यास्तव भिऊं नका, बहुत चिमण्यांहून तुम्ही श्रेष्ठ आहां. यास्तव जो कोणी माणसांसमोर मला पत्करील, त्याला मीहि आपल्या आकाशांतील बापासमोर पत्करीन; परंतु जो कोणी माणसांसमोर मला नकारील, त्याला मीहि आपल्या आकाशांतील बापासमोर नकारीन. मी पृथ्वीवर शांति पाठवायास आलों असें कल्पूं नका, परंतु तरवार पाठवायास मी आलों आहें, कां कीं पुत्राला आपल्या बापाविरुद्ध आणि कन्येला आपल्या आईविरुद्ध आणि सुनेला आपल्या सासूविरुद्ध फिरवावयास मी आलों आहें, आणि माणसांचे वैरी त्याच्या घरांतीलच होतील. जो माझ्यापेक्षां बापाची अथवा आईची प्रीति करितो तो मला योग्य नाहीं, आणि जो माझ्यापेक्षां पुत्राची अथवा कन्येची प्रीति करितो तोहि मला योग्य नाहीं, आणि जो आपला मरणखांब घेऊन माझ्यामागें येत नाहीं तो मला योग्य नाहीं. जो आपला जीव रक्षितो तो त्याला गमावील, आणि जो माझ्यासाठीं आपला जीव गमावितो तो त्यास रक्षील; जो तुह्मास स्वीकारितो तो मला स्वीकारितो, आणि जो मला

स्वीकारितो तो माझ्या पाठविणाऱ्यास स्वीकारितो. जो भविष्यभाष्याच्या नामानें भविष्यभाष्यास स्वीकारितो तो भविष्यभाष्याचें वेतन पावेल, आणि जो नीतिमानाच्या नामानें नीतिमानाला स्वीकारितो तो नीतिमानाचें वेतन पावेल, आणि जर कोणी शिष्याच्या नामानें ह्या ल्हाहा गांतील एकाला केवळ थंड पाण्याचा प्याला पाजील, तर मी तुह्मास खचीत सांगतों, तो आपलें वेतन गमाविणार नाहीं.

## अध्याय ११.

मग असें झालें कीं येशूनें आपल्या बारा शिष्यांची नेम णूक समाप्त केल्यावर तो त्यांच्या नगरांमध्यें उपदेशावयास व गाजवावयास एथून निघाला. मग त्यांनी बाहेर निघून लोकांनी पश्चात्ताप करावा असी घोषणा केली. आणि पुष्कळ भुतें बाहेर घालविलीं आणि बहुत रोग्यांस त्यांच्या अंगाला तेल लावून निरोगी केलें.

आणि हेरोदानें पाठवून योहान्नाला धरिलें होतें, आणि त्याला हेरोदियास जी आपला भाऊ फिलोप्पस याची बायको हिजशीं आपण लग्न केलें होतें, यास्तव हिजकरितां बंदिशाळेंत बंद केलें होतें; का कीं योहा नानें हेरोदाला ह्मटलें होतें कीं, तुझ्या भावाची बायको तुझी होणें, हें तुला योग्य नाहीं. मग हेरोदियासीनें

त्याचीं वैर केलें आणि त्याला वधावयास इच्छिलें परंतु न शकली; कारण कीं योहान पुण्यवान् व पवित्र, असें हेरोद जाणून त्याला भ्याला, आणि त्याचें संरक्षण केलें व त्याचें ऐकून बहुत केलीं आणि हर्षानें त्याचें ऐकिलें. नंतर हेरोदाच्या वाढ दिवसाचीं जीं तीं करीत असतां, हेरोदियासोच्या कन्येनें त्यांमध्यें नाचून हेरोदाला संतोषविलें; त्यावरून जें जें ती मागेल तें तें त्यानें शपथपूर्वक तिला देऊं पत्करिलें. आणि ती आपल्या आईनें पूर्वीं प्रेरिली असतां म्हणाली, योहान जो बाप्तिस्मा करणारा त्याचें शीर एथें ताटामध्यें मला दे. तेव्हां राजा खिन्न झाला; तथापि शपथासाठीं व संगतीं बसणाऱ्यांसाठीं त्यानें देण्याची आज्ञा केली. आणि बंदिशाळेंत पाठवून योहानाचें शीर छेदिलें. मग त्याचें शीर ताटांत आणिलें आणि त्या मुलगीस दिलें, मग तिनें आपल्या आईकडे नेलें. नंतर त्याच्या शिष्यांनी जवळ येऊन शरीर उचलिलें व त्याला पुरलें, आणि येऊन येशूला वर्तमान सांगितलें. आणि जीं सर्व येशूकडून घडलीं तीं चौथाईदार हेरोदानें ऐकिलीं आणि भ्रांत झाला, यास्तव कीं योहान मेलेल्यांतून उठला आहे, असें कित्येकाकडून म्हटलें गेलें; आणि कोणाकडून असें कीं एलिया दृश्य झाला, आणि दुसऱ्याकडून असें कीं पूर्वकालिकांतील एक भविष्यवादी उठला आहे. तेव्हां

हेरोद बोलला, योहानाचें शीर त्या छेदिलें, परंतु ज्याविषयीं मी असीं ऐकतों, हा कोण आहे? आणि त्याने त्याला पाहावयास शोधिलें.

मग प्रेषित माघारें येऊन येशूजवळ मिळाले, तेव्हां जें जें त्यांनी केलें आणि जें जें शिकविलें तें सर्व त्यांनी त्यापाशीं निवेदन केलें. आणि तो त्यांस बोलला, तुह्मी स्वतांच एकीकडे रानांतल्या जाग्यांत येऊन थोडा विसांवा घ्या; कारण तेथें पुष्कळ येत जात होते आणि त्यांस खावयासहि अवकाश मिळत नव्हता.

यानंतर येशू गालीलाचा तोच तिबरेयासचा समुद्र याच्या पलिकडे गेला आणि मोठा समुदाय त्याच्या मागें गेला, की तर त्याचे चमत्कार जे त्याने दुखणाईतांवर केले ते त्यांनी पाहिले होते. तेव्हां येशू एका डोंगरावर चढला आणि तेथे आपल्या शिष्यांसुद्धां बसला होता. आणि वल्हांडण यहूद्यांचा एक सण जवळ होता. यास्तव येशूने डोळे वर करून मोठ्या समुदायाला आपल्याजवळ येतां पाहिलें, आणि मेंढ्रांस मेंढपाळ नाहीं त्यांसारिखे ते होते, यास्तव तो त्यांवर कळवळला. तेव्हां तो त्यांस बहुत उप देशूं लागला आणि तितक्यांत फार वेळ गेल्यावर फिलीप्प यास ह्मणतो, यांनी खावें ह्मणून आह्मी भाकरी कोठून विकत घेऊं? परंतु त्याने त्याची परीक्षा करून हें ह्मटलें,

कारण कीं आपण काय करणार होता हें त्याला कळलें होतें. फिलोप्पसानें त्याला उत्तर दिलें कीं, यांतील प्रत्येकानें कांहीं थोडी घ्यावयासाठीं दोनशें पावल्यांच्या भाकरी त्यांस पुरणार नाहींत. त्याच्या शिष्यांतून एक जो शिमोन पेत्रसाचा भाउ आंद्र्यास तो त्याला ह्मणतो, एथे एक तरुण आहे, त्याजवळ जवांच्या पांच भाकरी आणि दोन मासोळ्या आहेत, परंतु इतक्यांस तीं काय आहेत? तेव्हां येशू बोलला, तुह्मी त्यांस पन्नास पन्नासांच्या पंक्तीनीं बसवा. आणि त्या जाग्यांत बहुत घास होतें, यास्तव माणसें मणतीनें सुमारें पांचहजार बसलीं. तेव्हां त्यानें त्या पांच भाकरी व दोन मासे घेऊन आकाशाकडे वर पाहून त्यांविषयीं स्तुति केली; मग मोडलीं आणि शिष्यांजवळ समुदायापुढें वाढावयास दिल्हीं; मग त्यांनीं खालें आणि सर्व तृप्त झाले. आणि ते तृप्त झाल्यावर तो आपल्या शिष्यांस म्हणतो, कांहीं फुकट न जावें ह्मणून उरलेले तुकडे गोळा करा; यास्तव त्यांनीं गोळा केले आणि जवांच्या पांच भाकरींचे जे तुकडे जेवणाऱ्यांपुढें राहिले, त्यांच्या बारा करंड्या भरल्या. त्यावरून येशूनें जो चमत्कार केला तो त्या माणसांनीं पाहून ह्मटलें कीं, जो भविष्यभाषी जगांत यावयाचा तो निश्चयें हाच आहे. यास्तव येशूला राजा करावा ह्मणून ते येऊन त्याला बळानें धरणार

आहेत, हें तो जाणून फिरून डोंगरावर एकला निघून गेला.

मग संध्याकाळ झाल्यावर त्याचे शिष्य खालीं समुद्राजवळ गेले, आणि तारवावर चढून समुद्राच्या पलिकडे कापेर्णाऊमास जात होते; तेव्हां इतक्यांत अंधार झाला, परंतु येशू त्यांच्याजवळ आला नव्हता, परंतु तारूं तेव्हां समुद्रामध्यें असतां लाटांनी डळमळलें गेलें, कारण कीं वारा तोंडाचा होता. मग रात्रीच्या चवथ्या प्रहरीं येशू समुद्रावरून चालत असतां त्यांच्याजवळ गेला. तेव्हां शिष्य त्याला समुद्रावरून चालतां पाहून घाबरे होऊन ह्मणाले, आभास आहे; आणि भयेंकरून ओरडले. परंतु तेव्हांच येशू त्यांस बोलला कीं, धीर धरा, मी आहें, भिऊं नका. तेव्हां पेत्रानें त्याला उत्तर देतां ह्मटलें, हे प्रभू जर तूं आहेस तर पाण्यावरून तुझ्याजवळ यावयास मला आज्ञा दे. नंतर त्यानें ह्मटलें, ये; तेव्हां पेत्र तारवावरून उतरून येशूजवळ जावयास पाण्यावर चालला, परंतु वारा बळकट पाहून तो भ्याला आणि बुडूं लागून ओरडतां बोलला, हे प्रभू मला तार. पण तेव्हांच येशूनें हात लांबवून त्याला धरिलें आणि त्याला ह्मटलें, हे अल्पविश्वासी त्वां संशय कां धरिला; मग ते तारवावर आल्यानंतर वारा समला. तेव्हां जे तारवावर होते ते

येऊन त्याचें भजन करून बोलले, निश्चित तूं देवाचा पुत्र आहेस. नंतर ते पलिकडे जाऊन गेनेसारेत देशाजवळ येऊन तटीस लागले.

मग हे तारवांतून उतरल्यावर तेव्हांच ते त्याला ओळखून, त्या चहूंकडील सर्व ठिकाणीं धांवून ज्यांस रोग होते त्यांस बाजांवर घालून जेथें तो आहे म्हणून त्यांनी ऐकिलें तेथें फिरवूं लागले. आणि जेथें जेथें तो गांवांमध्यें किंवा नगरांमध्यें किंवा वाड्यांमध्यें गेला तेथें तेथें त्यांनी रोग्यांस चव्हाट्यांवर ठेविलें, आणि ह्यांनी त्याच्या वस्त्राच्या पदराला मात्र स्पर्श करावा म्हणून त्याची प्रार्थना केली, आणि जितक्यांनी त्याला स्पर्श केला तितके बरे झाले.

## अध्याय २१.

आणि दुसऱ्या दिवशीं समुदाय समुद्राच्या पलिकडे उभा राहिला असतां त्यांनी पाहिलें कीं एक होडकें ज्यावर त्याचे शिष्य चढले त्यावांचून तेथें दुसरें नाहीं, आणि अेसें कीं येशू आपल्या शिष्यांसुद्धां त्या होडक्यावर चढला नव्हता परंतु त्याचे शिष्य मात्र गेले. तथापि जेथे प्रभूनें आभारस्तुति केल्यावर त्यांनी भाकर खाल्ली त्या जाग्याजवळच्या तिबेरयासापासून दुसरीं होडकीं आलीं. तर समुदायानें जेव्हां पाहिलें कीं येशू आणि त्याचे शिष्य तेथें

नाहींत, तेव्हां तारवावर चढले आणि येशूच्या शोध करीत कापेर्णाऊमांत आले. मग ते त्याला समुद्रापलिकडे पावून त्याला बोलले, हे राब्बी, तूं एथे केव्हां पावलास? येशू त्यांस उत्तर देण्याने बोलला, मी तुह्मास खचीत खचीत सांगतों, तुह्मी चमत्कार पाहिले यासाठीं नाहीं, परंतु तुह्मी भाकरी खाऊन तृप्त झालां यास्तव मला शोधितां. जें अन्न नाशवंत त्यासाठीं काम करूं नका, परंतु जें अन्न सर्वकाळच्या जीवनासाठीं राहतें जें माणसाचा पुत्र तुह्मास देईल त्यासाठीं करा; कां तर बाप जो देव त्याने त्याजवर शिक्का केला आहे. तेव्हां त्यांनी त्याला म्हटलें, आह्मी देवाचीं कामें करावयास काय करूं? येशू उत्तर देण्याने त्यांस बोलला, हें देवाचें काम करणें आहे कीं ज्याला त्याने पाठविलें त्याजवर तुह्मी विश्वास ठेवावा. यावर त्यांनी त्याला म्हटलें, आह्मी पाहून तुजवर विश्वास ठेवावा ह्मणून तूं काय चमत्कार करितोस? तूं काय काम करितोस? असें लिहिलें आहे कीं, त्याने आकाशांतून त्यांस भाकर खावयाला दिल्ही, तसें आमच्या पितरांनी रानामध्यें मान्ना खाल्ला. यास्तव येशूने त्यांस ह्मटलें, मी तुम्हास खचीत खचीत सांगतों, आकाशांतून ती भाकर मोशाने तुम्हास दिल्ही नाहीं, परंतु आकाशांतून जी खरी भाकर ती माझा बाप तुह्मास देतो; यास्तव कीं जी आकाशांतून उत

रती आणि जगाला जीवन देतो तो देवाची भाकर आहे. तेव्हां ते त्याला बोलले, हे प्रभू सर्वकाळ ती भाकर आह्मास दे; तेव्हां येशू त्यांस बोलला, मी जीवनाची भाकर आहें, जो मजकडे येतो त्याला भूक लागणारच नाहीं, आणि मजवर जो विश्वासतो त्याला कधींहि तहान लाग णार नाहीं. परंतु म्या तुह्मास सांगितलें कीं, तुह्मी मला पाहिलेंच तथापि न विश्वासतां. बापाने जो प्रत्येक मला दिल्हा तो मजकडे येईल, आणि जो मजकडे येतो त्याला मी घालविणार नाहींच; कां तर मी आपली इच्छा नव्हे, परंतु ज्याने मला पाठविलें, त्याची इच्छा पाळावयास आकाशांतून उतरलों. आणि ज्या बापाने मला पाठविलें त्याची इच्छा हीच आहे कीं, जें मला दिलें त्यांतून म्या कांहीं न हारवावें, परंतु म्या त्याला शेवटील दिवशीं फिरून उठवावें. आणि ज्याने मला पाठविलें त्याची इच्छा हीच आहे कीं प्रत्येक जो पुत्राला पाहून त्याजवर विश्वास ठेवितो त्याला सर्वकाळचें जीवन व्हावें, आणि शेवटील दिवशीं म्या त्याला फिरून उठवावें.

यास्तव यहूदयांनी त्याविषयीं कुरकूर केली कां कीं तो बोलला, मी आकाशांतून उतरलेली भाकर आहें. आणि ते बोलले, हा येशू योसेफाचा पुत्र ज्याचा बाप व आई आह्मास कळलीं कीं नाहींत? तर तो कसा ह्मणतो

कीं, मी आकाशांतून उतरलों? यास्तव येशू उत्तर देण्याने त्यांस बोलला, तुह्मी परस्परें कुरकूर करूं नका, कोणी मजकडे येऊं यावांचून शकत नाहीं कीं ज्या बापानें मला पाठविलें त्यानें त्याला ओढावें, आणि शेवटील दिवशीं मी त्याला फिरून उठवीन. भविष्यवाद्यांत असें लिहिलें आहे कीं, ते सर्व देवाकडून शिकविलेले होतील; यास्तव जो प्रत्येक बापाजवळ ऐकतो आणि शिकतो तो मजकडे येतो; ह्मणजे कोणी बापाला पाहिलें असें नाहीं, केवळ जो बापाजवळ असतो त्यानें बापाला पाहिलें आहे. मी तुह्मांस खचीत खचीत सांगतों, जो मजवर विश्वास ठेवितो त्याला सर्वकाळचें जीवन आहे; मी त्या जीवनाची भाकर आहें. तुमच्या पितरांनी रानांत मान्ना खाल्ला तथापि ते मेले; आकाशांतून जी भाकर उतरली ती हीच आहे कीं कोणी तींतून खावें आणि न मरावें. जी जिववान् भाकर आकाशांतून उतरली ती मीच आहें; ह्या भाकरींतून जर कोणी खातो तर तो सर्वकाळ वांचेल. आणखी जी भाकर मी देईन ती माझें मांस आहे, ती जगाच्या जीवनासाठीं मी देईन. यास्तव यहूदी आपल्यांमध्यें भांडतां बोलले, हा आपलें मांस आह्मांस खावयाला देण्यास कसें शकतो? यावर येशूनें त्यांस ह्मटलें, मी तुह्मांस खचीत खचीत सांगतों, जर तुह्मी मनुष्यपुत्राचें मांस न खातां

आणि त्याचें रक्त न पितां, तर तुमचें आपल्यांमध्यें जीवन नाहीं. जो माझें मांस खातो आणि रक्त पितो त्याला सर्व काळचें जीवन आहे, आणि शेवटील दिवशीं मी त्याला फिरून उठवीन, कारण कीं माझें मांस अन्न आहे खरें, आणि माझें रक्त पिणें आहे खरें. जो माझें मांस खातो आणि माझें रक्त पितो तो मजमध्यें राहतो आणि मी त्यामध्यें राहतों. जसें जीवंत बापानें मला पाठविलें आणि मी बापाकडून वांचतों, तसें जो मला खातो तोहि मजक डून वांचेल, जी भाकर आकाशांतून उतरली ती हीच आहे. तुमचे पितर मान्ना खाऊन मेले त्यांसरिखें नव्हे, जो ही भाकर खातो तो सर्वकाळ वांचेल. काप र्णाऊमांतील सभेंत शिकवीत असतां त्यानें हीं म्हटलीं.

यास्तव त्याच्या शिष्यांतून बहुतांनीं ऐकून म्हटलें, ही कठीण गोष्ट आहे, ही ऐकावयास कोण शक्तिमान् आहे? तेव्हां त्याच्या शिष्यांनीं तिजविषयीं कुरकूर केली, हें येशू आपणांत जाणून त्यांस बोलला, हें तुह्मास अडखळवितें कीं काय? तर माणसाचा पुत्र अगोदर जेथें होता तेथें जर त्याला चढत पाहतां, मग? जो जीवंत करणारा तो आत्मा आहे, मांस कांहीं लाभ देत नाहीं. ज्या गोष्टी मी तुह्मास सांगतों त्या आत्मा आहेत, आणि जीवन आहेत; परंतु जे विश्वासत नाहींत असे कित्येक तुह्मामध्यें

आहेत. कां तर कोण विश्वास ठेवीत नाहींत आणि त्याला कोण परस्वाधीन करणार, हें येशू प्रारंभापासून समजला होता. मग तो बोलला, याकरितां म्यां तुम्हास सांगितलें कीं कोणाचें मजकडे येणें माझ्या बापानें त्याला दिल्यावांचून होववत नाहीं. तेव्हांपासून त्याच्या शिष्यांतून बहुत माघारे गेले आणि त्यानंतर त्यासहित हिंडले नाहींत, यास्तव येशू त्या बारांस बोलला, तुम्हीहि निघायाला इच्छितां कीं काय? मग शिमोन पेत्रानें त्याला उत्तर दिल्हें, हे प्रभु, आम्ही निघून कोणाकडे जाऊं? सर्वकालिक जीवनाच्या गोष्टी तुम्हाजवळ आहेत, आणि तूं तो ख्रीस्त जीवंत देवाचा पुत्र आहेस, हें आम्ही विश्वासलों आणि जाणलें आहे. येशूनें त्यांस उत्तर दिल्हें कीं, म्यां तुम्हा बारांस निवडिलें कीं नाहीं? तथापि तुम्हामध्यें एक फितुरी आहे. तेव्हां यहूदा इस्कारयोति शिमोनाचा पुत्र जो ह्याविषयीं तो बोलला, कारण कीं हा त्या बारांमध्यें एक असतां त्याला परस्वाधीन करणार होता. आणि यानंतर येशू गालीलांत हिंडला, कारण कीं यहूदी त्याला जिवें मारावयास झटले यास्तव त्यानें यहूदांत हिंडावयास इच्छिलें नाहीं.

## अध्याय २४.

तेव्हां फारिशी आणि शास्त्र्यांतून कित्येक मनुष्य यरुशालेमापासून येऊन त्यापाशीं मिळाले. आणि त्यांनी

त्याच्या शिष्यांतील कितीएकांस अमंगळ हातानी म्हणजे न धुतलेल्या हातानी भाकरी खातां पाहून दोष ठेविला, कारण कीं फारिसी आणि सर्व यहूदी वडिलांचा संप्रदाय धरून आपले हात वेळोवेळ धुतल्यावांचून खात नाहींत, आणि बाजारांतून आले असतां स्नान केल्यावांचून खात नाहींत आणि प्याले घागरी तांब्याचीं भांडीं आणि पलंग यांची जलशुद्धि असले बहुत दुसरे नियम त्यांनी अंगिकारिलेले आहेत. यावरून त्या फारिश्यानी आणि शास्त्री यांनी विचारिलें कीं तुझे शिष्य वडिलांच्या संप्रदायाप्रमाणे चालत नाहींत तर न धुतलेल्या हातानी अन्न खातात असें काय म्हणून करितात? तेव्हां त्याने त्यांस उत्तर केलें कीं तुम्हा ढोंग्यांविषयीं यशायाने भविष्य ठीक सांगितलें त्याने असें लिहिलें कीं हे लोक आपल्या ओंठानी माझा सन्मान करितात परंतु त्यांचें अंतःकरण मजपासून दूर आहे. आणि उपदेशार्थ मनुष्यांच्या आज्ञा ते शिकवितात म्हणून ते मला व्यर्थ भजतात. कारण कीं तुम्ही देवाची आज्ञा सोडून मनुष्यांचा संप्रदाय धरितां म्हणजे घागरी आणि प्याले यांची जलशुद्धि आणि यांसारिखीं दुसरीं अशीं पुष्कळ कर्में करितां. आणखी तो त्यांस बोलला, तुम्ही आपला संप्रदाय पाळावा म्हणून देवाची आज्ञा बरीक मालवितां. कारण कीं तूं आपला बाप आणि आई यांचा

सन्मान कर आणि जो बापाला किंवा आईला निंदितो तो मरण्यास योग्य आहे असें मोशे बोलला. आणि तुम्ही ह्मणतां जर कोणी माणसाने बापाला किंवा आईला ह्मटलें तुमच्या उपयोगी पडावयाजोगें जें कांहीं माझ्याजवळ आहे तें कर्बान ह्मणजे देवास अर्पित आहे, तर त्याला त्याच्या बापासाठीं अथवा आईसाठीं तुह्मी आणखी कांहीं करूं देत नाहीं. ह्याप्रकारें तुम्ही जो आपला संप्रदाय सांगतां तेणें करून देवाचें वाक्य निरर्थ करितां आणि ह्यांसारिखीं अशीं बहुत दुसरीं कर्में करितां. तेव्हां तो सर्व समुदायाला जवळ बोलाकून त्यास ह्मणाला तुह्मी सर्व माझें ऐका आणि समजून घ्या. माणसांत प्रवेश करून त्याला अशुद्ध करील असें कांहीं एक त्याच्या बाहेर नाहीं परंतु जे पदार्थ त्यांतून निघतात तेच माणसाला अपवित्र करणारे आहेत. जर कोणाला ऐकावयास कान आहेत तर त्याने ऐकावें. मग तो समुदायापासून घरांत गेल्यानंतर त्याचे शिष्य जवळ येऊन त्याला बोलले कीं, फारिशी ही गोष्ट ऐकून अडखळविले गेले, हें तुला कळलें काय? परंतु त्याने उत्तर देतां म्हटलें, जें जें रोंप माझ्या आकाशांतील बापानें लाविलें नाहीं तें उपटलें जाईल. त्यांस असूं द्या, ते आंधळ्यांचे आंधळे वाटाडे आहेत. आणि जर आंधळा आंधळ्याला नेईल तर दोघे खांचेंत पडतील. तेव्हां पेत्रस त्याला

उत्तर देतां बोलला, हा दाखला आम्हास फोडून सांग. मग येशू बोलला, अद्यापि तुम्हीहि अज्ञानी आहां काय? हें तुमच्या ध्यानांत नाहीं? कीं सर्व जें बाहेरून मनुष्यांत प्रवेश करितें त्याने त्याला विटाळ होतच नाहीं. कारण कीं तें त्याच्या मनांत जात नाहीं तर पोटांत मात्र जातें मग भक्ष्यांमध्यें जें अशुद्ध आहे तें तर शौचकूपांत बाहेर जातें. आणखी तो बोलला कीं जें मनुष्यांतून निघतें त्यानेंच मनुष्याला विटाळ होतो. कारण कीं आंतून मनुष्याच्या मनोपासून वाईट विचार व्यभिचार शिंदळक्या हत्या चोऱ्या अपरिमित इच्छा मत्सर कपट कामस्वैरपणा, दुष्ट दृष्टि दुर्भाषण गर्व मूर्खपणा हे सर्व वाईट विषय आंतून निघतात आणि त्यांच्या योगानेच मनुष्याला विटाळ होतो; परंतु न धुतल्या हातांनी खाणें, हें माणसाला विटाळवीत नाहीं.

मग तो तेथून उठून सोर व सीदोन यांच्या सिमांत गेला; आणि एका घरांत जाऊन आपल्याला कोणी न जाणावें म्हणून त्याने इच्छिलें परंतु त्याने गुप्त राहावें असें होईना. कारण कीं ज्या बायेच्या बाळास कन्येस अशुद्ध आत्मा लागला होता ती त्याचें वर्त्तमान ऐकून त्याजकडे येऊन त्याच्या पायां पडली. ती बाई आचारेंकरून हेल्लेनीय आणि जातीची सुरफैनीकीय होती आणि त्याने तिच्या

कन्येंतून भूत घालवावें ह्मणून तिनें त्याची प्रार्थना केली; परंतु त्यानें तिला एक शब्दाचें उत्तर दिलें नाहीं. तेव्हां त्याचे शिष्य जवळ येऊन त्यापाशीं मागतां बोलले, ती आमच्यामागें ओरडती आहे, यास्तव तिला निरोप दे. मग तो उत्तर देतां बोलला, मी इस्राएलाच्या घराण्याच्या हरपलेल्या मेंढरांकडे पाठविला आहें, दुसऱ्याकडे नव्हे. तेव्हां ती येऊन त्याच्या पायां पडून बोलली, हे प्रभू; माझें साह्य कर; तेव्हां येशू तिला बोलला, पहिलें लेंकरें तृप्त होऊं जाऊं दे, कारण कीं लेंकरांची भाकर घेणें आणि कुत्र्यांस देणें हें ठीक नाहीं. मग तिनें ह्मटलें, होय प्रभू, तथापि कुत्रींहि आपल्या धन्याच्या चौरंगावरून जे चूर पडतात त्यांतून खातात. तेव्हां येशू उत्तर देतां तिला बोलला, हे स्त्री, तुझा विश्वास मोठा, जसें तूं इच्छितीस तसें होवो आणि त्याच घटकेपासून तिची कन्या बरी झाली.

मग तो फिरून सोर आणि सिदोन यांच्या सिमेंतून निघून देकापलीसाच्या सिमेमधून गालीलाच्या समुद्राजवळ आला. तेव्हां ते बहिरा तोतरा अशा माणसाला त्याजवळ आणितात आणि त्यानें आपल्या हातानीं त्याला स्पर्श करावा ह्मणून त्याला विनंती करितात. मग त्यानें त्याला घेऊन समुदायापासून एकीकडे जाऊन आपलीं बोटें त्याच्या कानांत घातलीं नंतर तो थुंकून त्याच्या जिभेस स्पर्श केला

आणि आकाशाकडे वर पाहून श्वास टाकला मग त्याला ह्मणतो एफ्फाथा ह्मणजे मोकळे व्हा. तेव्हां बरोबर त्याचे कान मोकळे झाले आणि त्याच्या जिभेचा बंद सुटला आणि तो नीट बोलूं लागला. तेव्हां त्यानी तें वर्तमान कोणाला न सांगावें ह्मणून त्याने त्यांस आज्ञा केली परंतु त्याने त्यांस जितकी आज्ञा केली तितकें त्यानी तें फारच घोषण्य केलें. आणि ते अत्यंत विस्मित होऊन बोलले कीं, त्याने सर्व कार्ये चांगलीं केलीं आहेत तो बहिऱ्यांस ऐकणारे आणि मुक्यांसहि बोलणारे असे करितो.

## अध्याय २५.

त्या दिवसांमध्यें समुदाय फार मोठा असतां आणि त्यांस खावयास कांहीं नसतां, येशू आपल्या शिष्यांस जवळ बोलावून त्यांस ह्मणतो, मी समुदायावर करुणा करितों कारण कीं ते आतां तीन दिवस माझ्याजवळ राहिले आहेत आणि त्यांस खावयास कांहीं नाहीं, तर त्यांस उपाशी निरोप द्यावा असें मी इच्छित नाहीं, कां कीं कदाचित् वाटेंत कासावीस होतील, कां कीं त्यांतून कित्येक लांबून आले. नंतर त्याचे शिष्य त्याला ह्मणतात, जितक्यानी मोठा समुदाय तृप्त होईल तितक्या भाकरी रानांत आह्माजवळ कोठून? तेव्हां येशू त्यांस बोलतो, तुह्माजवळ किती भाकरी आहेत? मग त्यानी ह्मटलें, सात आणखि [illegible]

मासे थोडके आहेत. मग त्याने समुदायांस भूमीवर बसा वयाला आज्ञा दिल्ही; नंतर त्याने त्या सात भाकरी व मासे घेऊन आभार मानल्यावर मोडिलीं आणि आपल्या शिष्यांस दिल्हीं, मग शिष्यानी समुदायाला दिल्हीं. नंतर सर्वानी खालें आणि ते तृप्त झाले; मग उरलेल्या चुरांच्या भरलेल्या सात टोपल्या त्यांनी उचलिल्या, आणि ज्यानी खालें ते बायका व लेंकरें ह्यांखेरीज चार हजार होते. मग समुदायांस निरोप दिल्यावर तो तारवावर चढला आणि माग्दालाच्या शिवांत आला.

तेव्हां फारिशी व साद्दुकी ह्यानी येशूजवळ जाऊन त्याची परीक्षा करीत असतां त्यापाशीं सांगितलें, आम्हास आका शांपासून चिन्ह दाखवावें. परंतु उत्तर देतां त्यांस ह्मणाला, सायंकाळ झाला असतां तुम्ही ह्मणतां कीं, उघाड होईल कां कीं आकाश तांबूस आहे, आणि सकाळीं ह्मणतां, आज झड लागेल कां कीं आकाश तांबूस आणि गडद आहे. अहो ढोंगी, तुह्मी आकाशांच्या स्वरूपा विषयीं अनुमान करावयास जाणतां खरें, तर काळांचीं चिन्हें त्यांचें अनुमान करावयास तुह्मी शक्तिमान् नव्हां काय? दुष्ट व व्यभिचारी पिढी चिन्ह मागती, परंतु योना भविष्य वादी याच्या चिन्हावांचून तिला चिन्ह दिल्हें जाणार नाहीं; तेव्हां तो त्यांस सोडून गेला.

नंतर त्याचे शिष्य भाकरी घ्यावयास विसरले होते, तेव्हां येशू त्यांस बोलला कीं, फारिशी व सादूकी ह्यांच्या खमिराविषयीं तुह्मी जपा, आणि सावध व्हा. तेव्हां ते आपणांमध्यें विचार करून म्हणाले, आम्हाजवळ भाकरी नाहींत ह्यास्तव तो असें बोलतो. आणि येशू तें जाणून त्यांस म्हणतो तुह्माजवळ भाकरी नाहींत ह्याविषयीं तुह्मी विचार कां करितां? अद्यापि तुह्मी ध्यानांत आणीत नाहीं आणि समजतहि नाहीं कीं काय? असून तुमचें हृदय कठीणच आहे कीं काय? तुह्मास डोळे असतां तुम्ही पाहत नाहीं? आणि तुम्हास कान असतां तुम्ही ऐकत नाहीं? आणि स्मरणहि करीत नाहीं कीं काय? जेव्हां म्या पांच हजार पुरुषांसाठीं पांच भाकरी मोडिल्या तेव्हां तुह्मी तुकड्यांच्या किती पांट्या भरून उचलिल्या? ते त्याला ह्मणतात बारा उचलिल्या. आणि जेव्हां चार हजार पुरुषांसाठीं म्या सात भाकरी मोडिल्या तेव्हां तुह्मी तुकड्यांचे किती हारे भरून उचलिले? मग ते बोलले सात उचलिले. नंतर तो त्यांस बोलला तुह्मी ध्यानांत कां आणीत नाहीं? कीं फारिशी व सादूकी ह्यांच्या खमिरापासून सावध व्हावें, असें भाकरी विषयीं म्या तुह्मास सांगितलें नाहीं. तेव्हां ते समजले कीं, त्यानें भाकरीच्या खमिराविषयीं नाहीं, परंतु फारिशी व सादूकी ह्यांच्या उपदेशाविषयीं सावध व्हावें, असें ह्मटलें.

मग तो बेथसाइदास आला तेव्हां त्यांनी त्याजवळ एका आंधळ्याला आणिलें आणि त्याने त्याला स्पर्श करावा ह्मणून त्याची प्रार्थना केली. नंतर त्याने त्या आंधळ्याचा हात धरून त्याला गांवाबाहेर नेलें मग त्याच्या डोळ्यांत थुंकून आणि त्याला आपल्या हातानी स्पर्श करून त्याला विचारिलें कीं, तुला कांहीं दिसतें कीं काय? तेव्हां तो वर पाहून बोलला कीं, मला झाडांसारिखीं माणसें चालतां दिसतात. नंतर त्याने त्याच्या डोळ्यांस हात फिरून लाविले आणि त्याला वर पाहावयास सांगितलें. तेव्हां तो यथास्थित झाला आणि संपूर्ण पदार्थ त्याला स्पष्ट दिसूं लागले. मग तो त्याला त्याच्या घरास पाठवितांना बोलला कीं, तूं गांवांत जाऊं नको आणि गांवांतील कोणी एका मनुष्यासहि हें वर्तमान सांगू नको.

आणि येशू फिलोप्पसाची काईसारी भागांत आल्यावर आपल्या शिष्यांस पुसतां बोलला कीं, जो मी मनुष्याचा पुत्र तो मी कोण आहें म्हणून लोक काय ह्मणतात? तेव्हां ते बोलले, कित्येक योहान बाप्तिस्माकरणारा, आणि कित्येक एलीया, आणि कित्येक इर्मेया किंवा भविष्यवाद्यांतील एक आहे, असें ह्मणतात. तो त्यांस म्हणतो, मी कोण आहें ह्मणून तुह्मी काय ह्मणतां? तेव्हां शिमोन पेत्रस उत्तर देतां ह्मणाला, तूं ख्रीस्त जो जीवंत देवाचा

पुत्र तो तूं आहेस. मग पेत्रू उत्तर देतां त्याला ह्मणाला, हे शिमोन योनाचा, तूं धन्य आहेस, यास्तव कीं मांस व रक्त ह्यांनी नाहीं परंतु माझ्या आकाशांतील बाप ह्याने हें तुला कळविलें. आणि मी तुला ह्मणतों कीं, तूं पेत्रस आहेस आणि ह्या खडकावर मी आपली मंडळी उभी करीन आणि तिजविरुद्ध पाताळाच्या दरवाज्याचें बळ चालणार नाहीं. आणि आकाशांच्या राज्याच्या किल्या तुला देईन, मग पृथ्वीवर जें कांहीं तूं बद्ध करिशील तें आकाशांत बद्ध केलेलें असेल, आणि पृथ्वीवर जें कांहीं सोडशील तें आकाशांत सोडलें असेल. तेव्हां त्याने आपल्या शिष्यांस बजावून सांगितलें, कीं येशू जो ख्रीस्त तोच मी आहें, हें त्यांनी कोणास न सांगावें.

तेव्हांपासून येशू आपल्या शिष्यांस समजावूं लागला, कीं मनुष्याच्या पुत्राला बहुत सोसणीं लागतात, ह्मणजे पुरातन व मुख्य उपाध्ये व पंडित यांकडून अव्हेरलें जाणें आणि जिवें मारिलें जाणें, आणि तिसऱ्या दिवशीं उठणें लागतें. आणि त्याने ती गोष्ट उघडी सांगितली, तेव्हां पेत्रस त्याला एकीकडे नेऊन त्याला निषेधूं लागून बोलला, हे प्रभू, तुला दयाळू होणें, हें तुला होणारच नाहीं. परंतु तो मुरडून पेत्रसाला बोलला, अरे सातांना, माझ्या मागें जा, तूं मला अडखळा आहेस, यास्तव कीं जीं देवाचीं तीं चिंतीत नाहींस परंतु माणसांचीं तीं चिंतितोस.

आणि त्याणें आपल्या शिष्यांसुद्धां समुदायाला जवळ बोलावून त्यांस म्हटलें जो कोणी माझ्या मागें यावयास इच्छितो त्याणें आपल्याविषयींची चिंता सोडावी आणि आपला वधस्तंभ उचलून घ्यावा मग त्याणें माझ्यामागें यावें. कारण कीं जो जो आपला जीव रक्षण करावयास इच्छितो तो तो त्याला मुकेल परंतु जो जो माझ्यासाठीं आणि सुभवर्तमानासाठीं आपल्या जिवाला मुकेल तोच तोच त्याला रक्षण करील. कारण कीं जर [कोणी एक] माणूस संपूर्ण पृथ्वी मिळवील आणि आपल्या प्राणाची हानी पावेल तर त्याचें काय हित होईल? अथवा माणूस आपल्या प्राणाचें मोल काय एक न देईल? कारण कीं ह्या व्यभिचारी आणि पापीष्ठ लोकांमध्यें जो जो मजविषयीं आणि माझ्या वाक्यांविषयीं लाजेल त्या त्याविषयीं मनुष्याचा जो पुत्र तोहि जेव्हां आपल्या पवित्र दूतांसहवर्त्तमान आपल्या बापाच्या गौरवानें येईल तेव्हां लाजेल. आणि त्याणें त्यांस म्हटलें कीं मी तुम्हास निश्चय सांगतों कीं जे एथें उभे राहिले आहेत त्यांतील असे कोणी एक आहेत कीं देवाचें राज्य पराक्रमानें आलें असें पाहतील तोंपर्यंत त्यांस मृत्यूचा अनुभव होणार नाहीं.

अध्याय २६.

आणि या गोष्टींनंतर सुमारें आठ दिवस, तेव्हां

असें झालें कीं तो पेत्रस व योहान्न व याकोब यांस घेऊन प्रार्थना करायास डोंगरावर चढला. तेव्हां त्यांच्या समोर त्याचें रूप पालटलें आणि त्याचा तोंडवळा सूर्यासारिखा तेजस्वी झाला आणि त्याचीं वस्त्रें उजेडासारिखीं पांढरीं झालीं. तेव्हां पाहा दोन पुरुष त्याशीं बोलते झाले, ते मोशे व एलीया हे होते; हे गौरवयुक्त दिसून त्याची मत जी तो यरूशालेमांत पूर्ण करणार होता तिजविषयीं बोलले. तेव्हां पेत्रस आणि त्याच्या बराबर जे हे झोंपेनें भरावले होते, परंतु जागे झाल्यावर यांनी त्याचें गौरव आणि ते दोन पुरुष त्याच्या समागमें उभे राहातां पाहिले. मग ते त्यापासून वेगळे होत असतां हें झालें, पेत्रस आपण जें ह्मणतो हें न जाणतां येशूला बोलला, हे स्वामी, आह्मास येथे असणें बरें आहे: तर आह्मी तीन मंडप करावे, तुजसाठीं एक, व मोश्यासाठीं एक, व एलीया साठीं एक, कां कीं काय बोलावें, हें त्याला कळलें नव्हतें, कारण ते भयाभीत होते. तो बोलत असतां, पाहा, प्रकाशमंत मेघानें त्यावर सावली केली आणि पाहा, मेघांतून शब्द होऊन बोलला, कीं हाच माझा प्रिय पुत्र आहे, ज्याजमुळें मी फार संतोषी झालों आहें, याचें तुह्मी ऐका. तेव्हां शिष्य ऐकून आपल्या तोंडाशीं पडले आणि फार भ्याले, परंतु येशू जवळ येऊन त्यांस शिवला आणि

बोलला, उठा आणि भिऊं नका, तेव्हां त्यांनी आपली डोळे वर करून एकट्या येशूशिवाय कोणाला पाहिलें नाहीं. नंतर ते डोंगरावरून उतरत असतां येशू त्यांस सांगी करितां बोलला, मनुष्याचा पुत्र मेलेल्यांमधून उठेल तोंपर्यंत तुम्ही हें पाहाणें कोणाला सांगूं नका; नंतर त्यांनी आपणांजवळ ती गोष्ट धरितां संवाद केला, कीं तें मेलेल्यांमधून फिरून उठणें काय आहे?

तेव्हां त्याचे शिष्य त्याला पुसतां बोलले, तर एलीया पहिल्यानें आला पाहिजे असें पंडित कां म्हणतात? मग येशू उत्तर देतां त्यांस बोलला, एलीया पहिल्याने येणार खरें आणि अवघीं पूर्ववत् करील. आणि मी तुम्हास सांगतों कीं एलीया आलाच आहे आणि त्यांनी त्याला ओळखलें नाहीं, परंतु त्यांनी जीं इच्छिलीं तीं त्याला केलीं आहेत. तसेंहि मनुष्याचा पुत्र त्यांकडून सोसणार आहे; तेव्हां शिष्य समजले कीं योहान बाप्तिस्मा करणारा ह्याविषीं तो त्यांस बोलत होता.

नंतर त्याने शिष्यांजवळ येऊन त्यांच्या सभोंवतां मोठा समुदाय आहे आणि त्यांशीं शास्त्रीहि संवाद करीत आहेत असें त्याने पाहिलें. तेव्हां संपूर्ण समुदाय त्याला पाहतांच फार विस्मित झाला आणि त्यांनी [त्याच्या] जवळ धांवून त्याची भेट घेतली. मग त्याने शास्त्र्यांस विचारिलें कीं

तुह्मी त्यांशीं काय संवाद करितां ? तेव्हां त्याच्याजवळ एक माणूस येऊन त्याजवळ गुडघे टेंकतां बोलला, हे प्रभू, माझ्या पुत्रावर दया कर, कां कीं तो फेंपरेकरी आहे आणि तो भारी पिडा सोसितो, कारण कीं तो वेळोवेळ अग्नींत आणि वेळोवेळ पाण्यांत पडतो. तर पाहा आत्मा त्याला धरितो, मग त्याला आपटून टाकतें, मग हा [त्याच्या योगेंकरून] तोंडाला फेंस आणितो आणि आपले दांत कडकडां खातो आणि सुकून जातो तर तुझ्या शिष्यांनी त्याला बाहेर घालवावें ह्मणून म्यां त्यांस सांगितलें परंतु त्यांची शक्ति चालेना. तेव्हां त्यानें त्याला उत्तर केलें कीं रे अविश्वासी लोक कोठपर्यंत म्यां तुह्मांबरोबर असावें ? कोठ पर्यंत म्यां तुमचें सहन करावें ? त्याला माझ्याजवळ आणा. मग त्यांनी त्याला त्याच्याजवळ आणिलें नंतर मुलानें त्याला पाहतांच त्या आत्म्यानें त्याला पिळून टाकलें आणि [त्याच्या] योगेंकरून तो भूमीवर पडून तोंडाला फेंस आणून लोळूं लागला. तेव्हां त्यानें त्याच्या बापाला पुसलें कीं असें हें ह्याला केव्हांपासून झालें ? मग त्यानें ह्मटलें कीं बाळपणा पासून [झालें.] आणि त्यानें ह्याचा नाश करावयाक रितां ह्याला बहुत वेळा अग्नींत आणि पाण्यांत टाकिलें आहे परंतु तुह्मानें कांहीं करवत असल्यास आह्मावर करुणा करून आह्मास साह्य हो. तेव्हां येशू त्याला बोलला कीं जर

तुझ्यानें विश्वास धरवेल तर विश्वास धरणाराला सर्व साध्य [आहे.] मग तेव्हांच त्या मुलाचा बाप आक्रोश करून आणि नेत्रांत अश्रु आणून बोलला हे प्रभू मी विश्वास धरितों तूं माझ्या अल्प विश्वासाविषयीं साह्य हो. तर [लोकांचा] समुदाय [आपल्या] कडे एके जागीं धांवत येतो हें पाहून येशू त्या अपवित्र आत्म्याला निषेध करून बोलला अरे मुक्या आणि बहिऱ्या आत्म्या मी तुला आज्ञा देतों तूं ह्यांतून निघ आणि फिरून त्यांत शिरूं नको. तेव्हां तो ओरडून आणि त्याला फार पिळून टाकून बाहेर निघाला. नंतर तो मेल्यासारिखा झाला, ह्मणून तो मेलाच आहे असें बहुतेक बोलूं लागले. मग येशूनें त्याचा हात धरून त्याला उठविलें आणि तो उभा राहिला. आणि त्याच्या बापाला तो फिरून दिल्हा; मग देवाच्या महत्वावरून सर्व थक्क झाले. मग तो घरांत गेल्यावर त्याच्या शिष्यांनी त्याला एकीकडे पुसलें, कीं आह्मी त्याला घालवायास शक्तिमान् कां नव्हतों? मग येशू त्यांस बोलला, कीं तुमच्या अविश्वासामुळें; कां कीं मी तुह्मांस खचीत सांगतों, मोहरीच्या दाण्याएवढा विश्वास तुह्मांस जर असेल तर ह्या डोंगराला तुह्मी ह्मणाल, तूं एथून तिकडे ढळ, मग तो ढळेल, आणि तुह्मास कांहीं असाध्य होणार नाहीं; परंतु प्रार्थना व उपास ह्यांवांचून हा प्रकार निघत नाहीं.

नंतर ते तेथून निघून पुढें गालीलावरून गेले, आणि कोणी जाणावें हें त्यानी इच्छिलें नाहीं, कां कीं त्याने आपल्या शिष्यांस उपदेशितांना त्यांस म्हटलें, कीं तुह्मी ह्या गोष्टी आपल्या कानांत ठेवा; कारण कीं मनुष्याचा पुत्र माणसांच्या हातांत स्वाधीन केला जाणार आहे, आणि ते त्याला जिवें मारतील, आणि तो जिवें मारल्यावर तिसऱ्या दिवशीं उठेल. तथापि ही गोष्ट त्यांस कळली नाहीं आणि त्यांनी ती न समजावी ह्मणून त्यांपासून झांकली होती, आणि ह्या गोष्टीविषयीं त्याला विचारा वयास ते भ्याले.

नंतर ते कापेर्णाऊमांत आल्यावर जकातदार पेत्राच्या जवळ आले आणि बोलले, तुमचा गुरु जकात देत नाहीं कीं काय? तो ह्मणतो होय. मग तो घरांत आल्यावर येशू त्याच्या अगोदर बोलून ह्मणाला, हे शिमोना, तुला कसें दिसतें, पृथ्वीचे राजे कोणापासून जकात व पट्टी घेतात, आपल्या पुत्रांपासून किंवा परक्यांपासून? पेत्र त्याला ह्मणतो, परक्यांपासून. येशू त्याला बोलला, तर पुत्र मोकळे आहेत, तथापि आह्मी त्यांस उपद्रव न करावा ह्मणून तूं समुद्राजवळ जाऊन गळ टाक, आणि पहिला मासा जो वर येतो त्याला धर, मग त्याचें तोंड उघडून तुला रुपया सांपडेल, तो घेऊन माझ्यासाठीं आणि तुझ्यासाठीं त्यांस दे.

## अध्याय २७.

आणि घरांत असतां येशूने आपल्या शिष्यांस विचा रिलें, तुह्मी वाटेमध्यें आप आपल्यांत काय संवाद करीत होतां? [हें ऐकून] ते उगीच राहिले कारण कीं [सर्वां मध्यें] श्रेष्ठ कोण [होईल] ह्याविषयीं त्यांनी वाटेमध्यें आप आपल्यांत विवाद केला होता. तेव्हां येशूने त्यांच्या हृद यांतील विचार जाणून त्या बारां [शिष्यांस जवळ] बोला वून त्यांस ह्मणतो कीं आपण [सर्वांहून] श्रेष्ठ व्हावें असें जर कोणी इच्छील तर त्याने सर्वांहून कनिष्ठ आणि सर्वांचा सेवक असें व्हावें. मग त्याने एक बाळक घेऊन त्यांमध्यें ठेविलें आणि त्याला कवटाळून धरून त्यांस ह्मटलें मी तुह्मास खचीत सांगतों, जर तुह्मी फिरविले जात नाहीं आणि बाळकांसारिखे होत नाहीं तर तुह्मी आका शांच्या राज्यांत जाणारच नव्हां. यास्तव जो कोणी आप णाला ह्या बाळकासारिखा लीन करील तोच आकाशांच्या राज्यांत मोठा आहे; आणि जर कोणी माझ्या नामाने अशा एका बाळकाला अंगिकारितो तर तो मला अंगि कारितो, आणि जर कोणी मला अंगिकारील तर तो मला नव्हे, परंतु ज्याने मला पाठविलें त्याला अंगि कारितो.

तेव्हां योहान्नाने त्याला उत्तर केलें कीं हे गुरु जी

आम्हाबरोबर चालत नाहीं आणि तुझ्या नावाच्या आधाराने भुतांस बाहेर घालवीत होता असा कोणी एकाला आम्ही पाहिलें आणि तो आम्हांबरोबर चालत नाहीं ह्मणून आम्ही त्याला निषेध केला. तेव्हां येशू बोलला तुम्ही त्याला निषेध करूं नका कारण कीं जो माझें नांव घेऊन अघटित कर्म करील आणि सहज मजविषयीं दुर्भाषण करील असा कोणी नाहीं, कारण कीं जो तुम्हांस प्रतिकूल नाहीं तो तुम्हांस अनुकूलच आहे. अणखी तुम्ही ख्रीस्ताकडील आहां म्हणून जो कोणी माझ्या नावाकरितां तुम्हांस पाण्याचा प्यालाहि भरून प्यावयास देईल तो आपल्या केलेल्या कर्माचें फळ पावल्यावांचून राहणार नाहीं हें निश्चय सांगतों. आणि जे लहान लोक मजवर विश्वास ठेवितात त्यांतून एकाला जर कोणी एकाने पापरूप फांसांत पाडिलें तर त्यापेक्षां त्याच्या गळ्यांत जांत्याची तळी बांधून त्याला समुद्रांत बुडवावें हें त्याला बरें आहे. आणि जर तुझा हात तुला पापरूप फांसांत पाडावयाचें कारण होतो तर त्याला तोडून टाक; दोन हात असून ज्या नरकांत लोकांस पीडा करणारा असा किडा मरत नाहीं, आणि अग्निहि विझत नाहीं त्या नरकांत पडावें त्यापेक्षां व्यंग होऊन जीवन [रूप लोकांत] जावें हें तुला बरें आहे. आणि जर तुझा पाय तुला [पापरूप] फांसांत पाडावयाचें कारण

होतो तर त्याला तोडून टाक; दोन पाय असून ज्या
नरकांत कीडांस [पीडा करणारा अथवा] किडा मरत
नाहीं आणि अग्निहि विझत नाहीं त्या नरकांत क्षेपण
व्हावें ह्यापेक्षां व्यंग [होऊन] जीवन [रूप लोकांत] जावें हें
तुला बरें आहे. आणि जर तुझा डोळा तुला [पापरूप]
फांसांत पाडावयाचें कारण होतो तर त्याला काढून
टाक, दोन डोळे असून ज्या अग्निरूप नरकांत कीडांस
[पिडा करणारा अथवा] किडा मरत नाहीं आणि अग्निहि
विझत नाहीं त्या नरकांत तुझें क्षेपण व्हावें ह्यापेक्षां एकाक्ष
[होऊन] देवाच्या राज्यांत जावें हें तुला बरें आहे. कारण
की जसें संपूर्ण बळिदानांस क्षाराने क्षारयुक्त करितात तसें
संपूर्ण [मनुष्यांचें क्षाररूप] अग्नीने क्षारयुक्त करणें होईल.
मीठ चांगलें आहे, परंतु मीठ जर क्षारहीन ह्यावें
तर त्याला कशाने क्षारयुक्त करावें? तुह्मी आपल्यांमध्यें
क्षारत्व धारण करा आणि एकमेकांशीं शांतचि असा.

ह्या लाहानांतील एकाचा धिःकार न करावा ह्मणून
तुह्मी जपा, कां कीं तुह्मास सांगतों, कीं आकाशांत
त्यांचे दूत माझ्या आकाशांतील बापाचें तोंड नित्य पाह
तात. ह्मणजी जें हरपलेलें त्याला तारावयास मनुष्याचा
पुत्र आला आहे. तुह्मास कसें दिसतें, कोण्या माण
साला शंभर मेंढीं जर असतील आणि त्यांतून एक भट

करों, तर त्या नव्याण्णवांस तो डोंगरावर सोडून जें भटकलें, त्याचा शोधीत जात नाहीं कीं काय? आणि तें जर त्याला सांपडलें असेल, तर तुह्मांस खचीत सांगतों कीं जीं नव्याण्णव भटकलीं नाहींत त्यांपेक्षां तो त्याविषयीं अधिक आनंद पावतो; तसें ह्या बाळकांतील एकाचा नाश व्हावा ह्मणून तुमच्या आकाशांतील बापाची इच्छा नाहीं. आणि जर तुझा भाऊ तुजविरुद्ध पाप करील, तर तूं जा, आणि तूं व तो एकच होऊन त्याचा निषेध कर; जर तो ऐकेल तर त्वां आपल्या भावाला मिळविलें आहे. परंतु तो जर न ऐकेल तर दोन अथवा तीन साक्ष्यांच्या तोंडानें प्रत्येक शब्द खचीत ठरवावा ह्मणून तूं आणखी एकास अथवा दोघांस आपल्या बराबर घे, आणि जर तो त्यांस न ऐकेल तर मंडळीस सांग, आणि जर तो मंडळीसहि न ऐकेल तर तो परभ्रांतील माणुस व जकातदार ह्यांसारिखा तुला होवो. मी तुह्मांस खचित सांगतों कीं जें जें तुह्मी पृथ्वीवर बद्ध कराल तें तें आकाशांमध्यें बद्ध केलेलें आहेल, आणि जें जें तुह्मी पृथ्वीवर सोडाल तें तें आकाशांमध्यें सोडलेलें आहेल. आणखी तुह्मांस सांगतों कीं जर पृथ्वीवर तुह्मांमधील दोघे कांहीं एका गोष्टीविषयीं एकचित्त होऊन ती मागतील, तर ती माझ्या आकाशांतील बापाकडून त्यांच्यासाठीं होईल; कारण

कीं जेथें दोघे अथवा तिघे माझ्या नामानें एकवट झालेले तेथें त्यांच्यामध्यें मी आहें.

तेव्हां पेत्रस त्याजवळ येऊन बोलला, हे प्रभू, माझा भाऊ मजविरुद्ध कितीदां पाप करितांना मी त्याला क्षमा करूं? सात वेळ कीं काय? येशू त्याला म्हणतो, सात वेळ असें मी तुला ह्मणत नाहीं, परंतु सातांच्या सत्तर वेळ. ह्याविषयीं कोणीएक राजाची उपमा आहे ह्यांच्या राज्याला दिल्ही जाईल; त्यानें आपल्या चाकरांचा हिशेब घेऊं इच्छिलें, आणि तो घेऊं लागल्यावर दाहा हजार मण पैक्याचा एक देणेदार त्याच्याजवळ आणिला होता. परंतु फेडावयास त्याला कांहीं नसतां त्याच्या प्रभूनें आज्ञा दिल्ही कीं, त्याला व त्याच्या बायकोला व लेकरांला व त्याचीं अवघीं जितकीं होतीं त्यांस विकावें आणि ऋण फेडावें. ह्यास्तव तो चाकर त्याच्या पायां पडून मान करून बोलला, हे प्रभू, मला अवकाश दे ह्मणजे मी तुझें सर्व फेडीन; तेव्हां चाकराच्या प्रभूला करुणा येऊन त्याला त्यानें मोकळें केलें आणि त्याला ऋण सोडिलें. परंतु तोच चाकर बाहेर जाऊन आपल्या सोबती चाकरांतील एक जो त्याला शंभर पावल्यांचा देणेदार होता तो मिळाला; तेव्हां त्याला धरून नरडी आवळतां बोलला, जें तझें ऋण आहे तें मला दे

चाकर त्याच्या पायां पडला आणि त्याला विनंती करितां बोलला, मला अवकाश दे ह्मणजे मी तुझें सर्व फेडीन; तेव्हां त्याने मानलें नाहीं परंतु जाऊन तो तें देणें देई तोंपर्यंत त्याला बंदिशाळेंत घातलें. तेव्हां जें झालें तें त्याचे सोबती चाकर पाहून फार खिन्न झाले, आणि त्यांनी येऊन जें झालें तें अवघें आपल्या प्रभूला निवेदन केलें. तेव्हां त्याचा प्रभु त्याला बोलावून त्याला ह्मणतो, अरे दुष्ट चाकरा, त्वां मला विनंती केली ह्मणून म्या तें सर्व देणें तुला सोडिलें; जसी म्या तुजवर दया केली तसी तुलाहि तुझ्या सोबत्यावर दया करणें योग्य नव्हतें कीं काय? आणि त्याच्या प्रभूने त्याजवर रागें भरून तो त्याचें सर्व देणें फेडी तोंपर्यंत त्याला दंड करणाऱ्यांच्या आधीन केलें. जर तुह्मी आपल्या हृदयांतून आप आपल्या भावाला त्यांचे अपराध न सोडितां तर माझा आकाशांतील बाप तुह्माविषयीं तसेंच करील.

## अध्याय २८.

आणि त्यांनंतर प्रभूने दुसऱ्या सत्तरांसहि नेमिलें, आणि प्रत्येक नगर व ठिकाण जेथें आपण जाणार होता तेथें दोघे दोघे आपल्या तोंडीं पुढें पाठविले. तेव्हां तो त्यांस बोलला, पीक फार खरें, परंतु कामकरी थोडके, याकरितां पिकाच्या प्रभूने कामकऱ्यांस आपल्या पिकामध्यें बाहेर

धाडावें म्हणून त्याची प्रार्थना करा. तुह्मी जा, पाहा, लांड
ग्यांमध्यें जसें कर्डीस तसें मी तुह्मास पाठवितों; कसणी व
झोळणा व जोडे नेऊं नका, आणि वाटेंत कोणाला
भेटाहूं नका, आणि कोण्या घरांत जातां प्रथम म्हणा.
ह्या घराचें कल्याण असो. आणि जर कल्याणाचा पुत्र
तेथें असेल खरें, तर त्याजवळ तुमचें कल्याण राहील,
परंतु जर नसेल तर तुह्मावर फिरून येईल. आणि
त्याच घरांत त्यांच्याजवळ जें तें खातां व पितां राहा, कां
तर कामकरी आपल्या वेतनाला योग्य आहे, घरोघरीं
फिरूं नका. आणि जर तुह्मी कोण्या नगरांत जातां
आणि ते तुह्मास अंगिकारितात तर तुमच्या पुढें जें वाढलें
तें खा, आणि त्यांत जे दुखणाईत त्यांस निरोगी करा
आणि त्यांस बोला, देवाचें राज्य तुह्माजवळ आलें
आहे. परंतु जर तुह्मी कोण्या नगरांत जातां आणि ते
तुह्मास अंगिकारीत नाहींत तर त्यांच्या मार्गांत बाहेर
जातां बोला, तुमच्या नगराची धूळ जी आह्मास लागती
तीच तुमच्यासाठीं आह्मी झाडून टाकितों, तथापि हें
जाणा कीं देवाचें राज्य तुमच्याजवळ आलें आहे; आणि
मी तुह्मास सांगतों कीं त्या दिवशीं त्या नगरापेक्षां सदोमाला
साहावतें होईल. हे खराजीना तुला हायहाय, हे बेथ
सैदा, तुला हायहाय, कां तर तुह्मामध्यें जे चमत्कार

घडले ते सोरांत आणि सीदोनांत घडले असते, तर त्यांनी पूर्वकाळीं तरट व राख यांत बसून पश्चात्ताप केला असता; म्हणवी न्याय ठरविण्यांत तुह्मापेक्षां सोर व सीदोन यांस साहावतें होईल; आणि हे कापेर्णाऊमा, जें आकाशापर्यंत उंच केलेलें, तें तूं लोकांतरापर्यंत खालीं टाकलें जाशील. जो तुमचें ऐकतो तो माझें ऐकतो, आणि जो तुह्मास अव्हेरितो तो मला अव्हेरितो, आणि जो मला अव्हेरितो तो माझ्या पाठविणाऱ्याला अव्हेरितो.

तेव्हां मंडप घालणें हा यहूद्यांचा सण जवळ होता, यास्तव त्याचे भाऊ त्याला बोलले, तूं एथून ढळून यहूदांत यासाठीं जा कीं जीं कामें तूं करितोस तीं तुझ्या शिष्यांनीहि पाहावीं; कारण कीं कोणी आपण प्रगटांत व्हावयास म्हटतांना गुप्तांत कांहीं करीत नाहीं, जर तूं हीं करितोस तर आपणास जगाला दाखीव; कां कीं त्याच्या भावांनीहि त्याजवर विश्वास ठेविला नाहीं. यास्तव येशू त्यांस म्हणतो माझा काळ आजून आला नाहीं, परंतु तुमचा काळ सर्वदा सिद्ध आहे. जग तुमचा द्वेष करूं शकत नाहीं, परंतु माझा करितें कां कीं त्याचीं कामें वाईट आहेत असी मी त्याविषयीं साक्ष देतों; तुह्मी या सणास वर जा, माझा काळ अद्याप पूर्ण झाला नाहीं, यास्तव मी इतक्यांत या सणास वर जात नाहीं. आणि तो त्यांस हीं बोलून गाली

ष्टांत राहिला, मग त्याचे भाऊ वर गेल्यानंतर तोहि प्रग टरूपें नव्हे परंतु गुप्तांत असा सणास वर गेला. यावर यहूदी सणांत त्याला शोधून बोलले, तो कोठे आहे? मग समुदायांमध्यें त्याजविषयीं बहुत कुजबूज झाली. कित्येक तर बोलले कीं, तो चांगला आहे, आणि दुसरे बोलले नव्हे परंतु तो जनाला ठकवितो; तथापि यहूद्यांच्या भया मुळें कोणी त्याविषयीं उघडें बोलला नाहीं.

आणि इतक्यांत सणाच्या मध्यें असतां येशूने देवळांत जाऊन शिकविलें. तेव्हां यहूदी आश्चर्य करून बोलले, हा शिकला नसतां अक्षरें कशीं जाणतो? येशूने त्यांस उत्तर देतां म्हटलें, माझा उपदेश तो माझा नव्हे परंतु ज्याने मला पाठविलें त्याचा; त्याच्या इच्छेप्रमाणे करावयास जर कोणी मान्य आहे, तर माझा उपदेश कसा, देवापासून आहे किंवा मी आपल्या आपण बोलतों, याविषयीं तो समजेल. जो आपल्या आपण बोलतो तो आपलें गौरव शोधितो, परंतु जो आपल्या पाठविणाऱ्याचें गौरव शोधितो तो खरा आहे आणि त्यामध्यें अन्याय नाहीं. मोशाने तुह्मास नेमशास्त्र दिल्हें कीं नाहीं? परंतु तुह्मामधील कोणी तें नेमशास्त्र पाळीत नाहीं. तुह्मी मला जिवें मारावयास कां पाहतां? समुदाय उत्तर देण्याने बोलला, तुला भूत लागलें, तुला जिवें मारावयास कोण पाहतो? येशूने

उत्तर देतांना त्यांस म्हटलें, म्या एक काम केलें आणि तुह्मी सर्व आश्चर्य करितां, यावरून ह्मणतों, मोश्याने तुह्मास सुंता दिल्ही ह्मणजे मोश्यापासून असें नव्हे परंतु पितरांपासून, आणि तुम्ही शाब्बाथांत माणसाची सुंता करितां. मोश्याचें नेमशास्त्र मोडलें न जावयाकरितां जर माणूस शाब्बाथांत सुंता घेतो, तर म्या शाब्बाथांत माणसाला अगदीं निरोगी केलें, यास्तव तुह्मी मजवर रागें भरतां कीं काय? तोंडाप्रमाणे न्याय ठरवूं नका, परंतु यथार्थ न्याय ठरवा. यास्तव यरुशालेमकरांतून कित्येकांनी म्हटलें ज्याला जिवें मारावयास पाहतात, तो हाच आहे कीं नाहीं? आणि पाहा, तो उघडें बोलतो आणि ते त्याला कांहीं ह्मणत नाहींत. हाच ख्रीस्त आहे खरें, हें अधिकारी निश्चयें समजतात काय? तथापि हा कोठून आहे असा आह्मास कळला, परंतु जेव्हां ख्रीस्त येतो, तेव्हां तो कोठून आहे हें कोणी जाणत नाहीं. यावर येशू देवळांत शिकवितांना ओरडत बोलला, तुह्मी मला जाणतां आणि मी कोठून आहें हें जाणतां, तथापि मी आपल्या आपण आलों नाहीं परंतु ज्याने मला पाठविलें तो खरा आहे. त्याला तुम्ही न जाणतां परंतु मी त्याला जाणतों, कारण कीं मी त्याजवळून आहें आणि त्याने मला पाठविलें आहे. यावर त्यांनी त्याला धरावयास

पाहिलें, परंतु त्याचा काळ तोंपर्यंत आला नव्हता, यास्तव कोणी त्याजवर हात टाकिला नाहीं. तेव्हां समुदायांतून पुष्कळांनी त्याजवर विश्वास ठेविला, आणि म्हटलें कीं, जेव्हां ख्रीस्त येतो, तेव्हां ह्याने जे चमत्कार केले त्यांहून अधिक करील कीं काय? समुदाय त्याविषयीं असी कुजबूज करीत होते, हें फारिश्यांनी ऐकिलें; मग फारिशी व मुख्य उपाध्ये यांनी त्याला धरावयास हस्तक पाठविले. यास्तव येशू त्यांस बोलला, अद्याप थोडका वेळ मी तुह्मासहित आहें, ज्याने मला पाठविलें त्याकडे मी निघून जातों. तुह्मी मला शोधाल परंतु मी तुम्हास सांपडणार नाहीं, आणि जेथें मी आहें तेथें तुह्मी येऊं न शकतां. यावर यहूदी आपणांमध्यें बोलले, हा कोठे असा जाणार कीं आह्मास सांपडणार नाहीं? तो हेल्लास्यांतील फांकलेल्या जवळ जाऊन हेल्लास्यांस उपदेशणार आहे कीं काय? तुम्ही मला शोधाल परंतु मी तुह्मास सांपडणार नाहीं, आणि जेथें मी आहें तेथें तुह्मी येऊं न शकतां असी गोष्ट त्याने म्हटली ही काय?

## अध्याय २९.

मग सणाच्या शेवटल्या मोठ्या दिवशीं येशू उभा राहून ओरडत बोलला, जर कोणी तान्हेला तर तो मजकडे येऊन पिवो; जसें धर्मलेखाने म्हटलें, तसें जो मजवर विश्वासतो

त्याच्या पोटांतून जीववान् पाण्याच्या नद्या वाहातील. तर त्याजवर ज्ये विश्वासणारे जो आत्मा पावणार होते त्याविषयीं त्याने ह्मटलें, कारण कीं येशू तोंपर्यंत गौरविला नव्हता, यास्तव तोंपर्यंत पवित्र आत्मा दिल्हा नव्हता. यावर समुदायांतून बहुतानी ही गोष्ट ऐकून ह्मटलें, हा तो भविष्यभाषी आहे खरें; दुसऱ्यानी ह्मटलें, हा तो ख्रीस्त आहे. परंतु दुसऱ्यानी ह्मटलें कीं, ख्रीस्त गालीलांतून येतो काय? ख्रीस्त दाविदाच्या बिजांतून आणि बेथलेहेम गांव जेथें दावीद होता, तेथून येतो, असें धर्मलेखाने सांगितलें कीं नाहीं? यास्तव त्याविषयीं समुदायांत फूट झाली. आणि त्यांमधील कित्येकानी त्याला धरावयास इच्छिलें, परंतु कोणी त्याजवर हात टाकिले नाहींत. यावर हस्तक मुख्य उपाध्यां व फारिस्यांजवळ आले; मग हे त्यांस बोलले, तुह्मी त्याला कां न आणिलें? हस्तकानी असें उत्तर दिलें, या माणसासारिखा कोणी माणूस कधींहि बोलला नाहीं. यावर फारिस्यानी त्यांस उत्तर दिल्हें कीं, तुह्मीहि ठकविले गेलां काय? अधिकाऱ्यांमधून किंवा फारिस्यांमधून कोणी त्याजवर विश्वासला काय? परंतु हे जन नेमशास्त्र न जाणतें, हे शापग्रस्त आहेत. निकदेमस जो रात्रीं त्याजवळ आला तो त्यांमधील एक असतां त्यांस बोलला, पूर्वीं माणसाचें ऐकिलें आणि त्याने जें केलें तें जाणलें यांवांचून आमचें

नेमशास्त्र त्याचा न्याय ठरवितें काय? त्यांनी उत्तर देतांना त्याला ह्मटलें, तूंहि गालीलांतील आहेस कीं काय? शोध करून पाहा, कां तर गालीलांतून भविष्यभाषी उत्पन्न होत नाहीं. तेव्हां प्रत्येक आप आपल्या घरास गेला. मग येशू जाइतझाडांच्या डोंगरास गेला.

नंतर सकाळीं तो देवळांत फिरून पावला; मग सगळा लोक त्याजवळ आला आणि त्याने बसून त्यांस शिकविलें. तेव्हां पंडित आणि फारिशी व्यभिचारांत सांपडलेली बायको त्याजवळ आणितात. मग तिला मध्यें ठेवून त्याला बोलतात, हे गुरू, ही बायको व्यभिचार करीत त्याच दोषांत सांपडली, आणि मोशाने नेमशास्त्रांत आह्मास आज्ञा दिल्ही कीं, अशांस धोंड्यांनी मारावें; तर तूं काय सांगतोस? परंतु त्यांनी त्याला झट लावितां आपणांस त्याजवर दोष ठेवायाचें कांहीं व्हावें ह्मणून हें ह्मटलें. तेव्हां येशूने खालीं ओणवून बोटाने भूमीवर लिहिलें; तथापि ते त्याला पुसत राहतां तो उठून त्यांस बोलला, जो तुह्मामध्यें पापाविरहित तो पहिला तिजवर धोंडा टाको. मग त्याने दुसरेदां खालीं ओणवून भूमीवर लिहिलें; तेव्हां ते ऐकून आणि भावाने निश्चा पटलेले होऊन वृद्धापासून आरंभून शेवटल्यापर्यंत एकामागें एक असे निघाले, आणि मध्यें उभ्या राहिलेल्या बायकोसुद्धां

येशू एकला मोडला गेला. तेव्हां येशू उठून आणि बायकोवांचून कोणाला न पाहून तिला बोलला, हे बाई, ते तुजवर दोष ठेवणारे कोठें आहेत? कोणी तुला दंडलें नाहीं कीं काय? मग ती बोलली, हे प्रभू, कोणी नाहीं. तेव्हां येशू तिला बोलला, मीहि तुला दंडीत नाहीं, तूं जा आणि यापुढें पाप करूं नको.

यावर येशू त्यांस फिरून बोलला कीं, मी जगाचा उजेड आहें, जो मला अनुसरतो तो अंधारांत चालणा रच नाहीं परंतु जीवनाचा उजेड त्याला होईल. यास्तव फारिसी त्याला बोलले, तूं आपणाविषयीं साक्ष देतोस, तुझी साक्ष खरी नाहीं. येशू उत्तर देण्याने त्यांस बोलला, जरीं मी आपणाविषयीं साक्ष देतों, तथापि माझी साक्ष खरी आहे, कां कीं मी कोठून आलों आणि कोठें जातों हें मला कळलें, परंतु मी कोठून येतों आणि कोठें जातों हें तुम्हास कळलें नाहीं. तुम्ही देहाप्रमाणें न्याय ठरवितां, मी कोणाचा न्याय ठरवीत नाहीं, अणखी जर मी न्याय ठरवितों, तथापि माझें ठरविणें खरें आहे, कां कीं मी एकला नाहीं परंतु मी आणि बाप ज्याने मला पाठविलें तो आहे. आणि तुमच्या नियमा यांत असें लिहिलें कीं, दोन माणसांची साक्ष खरी आहे; मी आपणाविषयीं साक्ष देणारा असा आहें आणि बाप

ज्याने मला पाठविलें तो मजविषयीं साक्ष देतो. यास्तव ते त्याला बोलले, तुझा बाप कोठें आहे? येशूने उत्तर दिलें कीं, तुह्मी मला व माझ्या बापालाहि न जाणलें, जर तुह्मी मला जाणलें असतें तर माझ्या बापाला जाणलें असतें. येशू देवळांत शिकवीत असतां ह्या गोष्टी भांडारांत बोलला आणि त्याचा काळ तोंपर्यंत आला नव्हता, यास्तव कोणी त्याला धरिलें नाहीं.

यावर येशू त्यांस फिरून बोलला, मी निघून जातों आणि तुह्मी मला शोधाल परंतु आपल्या पापांत मराल; जेथें मीं जातों तेथें तुह्मी येऊं न शकतां. यास्तव यहूदी बोलले, काय? तो आपणाला जिवें मारील? यास्तव बोलतो, जेथें मी जातों तेथें तुह्मी येऊं न शकतां? आणि त्याने त्यांस ह्मटलें, तुह्मी खालचे आहां, मी वरचा आहें, तुह्मी ह्या जगाचे आहां, मी या जगाचा नाहीं. यास्तव मी तुह्मास बोललों कीं, तुह्मी आपल्या पापांमध्यें मराल, कां कीं तुह्मी जर न विश्वासतां कीं मी तो आहें तर तुह्मी आपल्या पापांमध्यें मराल. यास्तव त्यांनी त्याला ह्मटलें, तूं कोण आहेस? तेव्हां येशूने त्यांस ह्मटलें, जें पहिल्याने तुह्मास सांगत आलों तेंच. तुह्माविषयीं बोलावयाचीं आणि न्याय ठरवायाचीं मला बहुत आहेत, परंतु ज्याने मला पाठविलें तो खरा आहे, आणि ह्या त्याजवळ जीं ऐकिलीं

तीं मी जगास सांगतों. त्याने त्यांस बापाविषयीं ह्मटलें असें ते समजले नाहींत; यावर येशूने त्यांस ह्मटलें, जेव्हां तुह्मी माणसाचा पुत्र उंच कराल तेव्हां जाणाल कीं मी तो आहें, आणि मी आपल्या आपण कांहीं करीत नाहीं, परंतु असें माझ्या बापाने मला शिकविलें तीं मी बोलतों. आणि ज्याने मला पाठविलें तो माझ्यासहित आहे; बापाने मला एकलें सोडलें नाहीं, कां कीं जीं त्याला अवडतीं तीं मी सर्वदां करितों.

## अध्याय ३०.

येशू हीं बोलत असतां बहुतानी त्याजवर विश्वास ठेविला, यास्तव ज्या यहूद्यानी त्याजवर विश्वास ठेविला त्यांस तो बोलला, जर तुह्मी माझ्या गोष्टींत राहतां तर तुह्मी माझे शिष्य आहां खरें, आणि तुह्मी खरेपण जाणाल आणि खरेपण तुह्मास मोकळें करील. त्यानी त्याला असें उत्तर दिल्हें, आह्मी आब्राहामाचें बीज आहों आणि कधींहि कोणाचीं दासपणांत नव्हतों; तुह्मी मोकळे व्हाल असें तूं कसें ह्मणतोस? येशूने त्यांस असें उत्तर दिल्हें, मी तुह्मास खचीत खचीत सांगतों, जो कोणी पाप करितो तो पापाचा दास आहे आणि दास सर्वकाळ घरांत राहत नाहीं पुत्र सर्वकाळ राहतो, यास्तव जर पुत्र तुह्मास मोकळें करील तर तुह्मी निश्चयें मोकळे व्हाल. तुह्मी आब्राहामाचें बीज

आहां हें मला कळलें, तथापि माझी गोष्ट तुह्मांत ठिकाण पावत नाहीं, यास्तव तुह्मी मला जिवें मारावयास पाहतां. म्या आपल्या बापाजवळ जें पाहिलें तें बोलतों, तुह्मी तर आपल्या बापाजवळ जें पाहिलें तें करितां. ते उत्तर देण्याने त्याला बोलले आब्राहाम आमचा बाप आहे. येशू त्यांस बोलतो, जर तुह्मी आब्राहामाचीं लेंकरें असतां तर आब्राहामाचीं कामें केलीं असतीं, परंतु आतां म्या जें खरेपण देवाजवळ ऐकिलें तें तुह्मास बोलतों, अशा माणसाला, मला जिवें मारावयास पाहतां, आब्राहामानें असें केलें नाहीं. तुह्मी आपल्या बापाचीं कामें करितां. यावर ते त्याला बोलले, आह्मी शिंदळकींपासून न जन्मलों, आह्मास एक बाप तो देव आहे. यास्तव येशू त्यांस बोलला, जर देव तुमचा बाप असतां तर तुह्मी मजवर प्रीति केली असती, कारण कीं मी देवापासून निघून आलों, अणखी आपल्या आपण आलोंहि नाहीं परंतु त्यानें मला पाठविलें आहे. तुह्मी माझें बोलणें कशा करितां न समजतां? कारण कीं माझी गोष्ट तुह्मी ऐकावयास शक्तिमान् नव्हां. तुह्मी द्याबलस बापापासून आहां, आणि तुमच्या बापाच्या लोभांप्रमाणें करावयास तुह्मी इच्छितां, तो प्रारंभापासून नरहिंसक झाला आणि त्यामध्यें खरेपण नाहीं, यास्तव तो खरेपणांत उभा टिकला नाहीं. जेव्हां

तो खोटें बोलतो, तेव्हां तो आपलों जों यांतून बोलतो, कां तर तो लबाड आणि तिचा बाप आहे, परंतु मी तुह्मास खरेंपण बोलतों यास्तव तुह्मी मजवर विश्वास न ठेवितां. मला पापाविषयीं निश्चय तुह्मामधील कोण देतो? आणि जर मी खरेपण बोलतों तर तुह्मी कशामुळें मजवर विश्वास न ठेवितां? जो देवाचा आहे तो देवाच्या गोष्टी ऐकतो, ह्यावरून तुह्मी न ऐकतां कीं तुह्मी देवाचे नव्हां. यावर यहूदी उत्तर देतांना त्याला बोलले, तूं शोमरोनी आहेस आणि तुला भूत आहे, हें आह्मी ठीक न ह्मणतों कीं काय? येशूनें असें उत्तर दिलें, मला भूत नाहीं, परंतु मी आपल्या बापाचा सन्मान करितों आणि तुह्मी माझा अपमान करितां. तथापि मी आपलें गौरव शोधीत नाहीं, जो शोधितो आणि न्याय ठरवितो असा एक आहे, मी तुह्मास खचीत खचीत सांगतों जर कोण्ही माझी गोष्ट पाळील तो सर्वकाळ मरण पाहणारच नाहीं.

यावर यहूदी त्याला बोलले, आतां तुला भूत आहे ह्मणून आह्मास कळलें; आब्राहाम व भविष्यभाषी मेले, तथापि तूं बोलतोस जर कोणी माझी गोष्ट पाळील तर तो सर्वकाळ मरण चाखणार नाहीं. आमचा पितर आब्राहाम यापेक्षां तूं थोर आहेस काय? तोच मेला आणि भविष्यभाषी मेले, तूं आपणाला कोण करितोस?

येशूनें असें उत्तर दिल्हें, जर मी आपणाला गौरवितों तर माझें गौरव कांहीं नाहीं. जो मला गौरवितो तो माझा बाप, त्याविषयीं तुह्मी ह्मणतां कीं तो आमचा देव आहे. तथापि तुह्मी त्याला न जाणलें परंतु मला तो कळला, आणि तो मला न कळला असें जर मी ह्मणेन, तर तुम च्यासारिखा मी लबाड होईन, परंतु तो मला कळला आणि त्याची गोष्ट मी पाळितों. तुमचा बाप आब्राहाम माझा दिवस पाहावयास हर्षित झाला आणि पाहून आनं दला. यावर यहूदी त्याला बोलले, तूं आजून पन्नास वर्षांचा नाहींस, तर त्वां आब्राहामाला पाहिलें काय? येशू त्यांस बोलला, मीं तुह्मास खचीत खचीत सांगतों आब्राहाम झाल्यापूर्वीं मी आहें. यावर त्यांनी त्याजवर धोंडे टाकावयास उचलिले, परंतु येशू लपाला आणि त्यांच्यामधून जाऊन देवळांतून निघाला आणि तसाच तेथून गेला.

मग पुढें जाऊन जन्मांध माणूस पाहिला आणि त्याचे शिष्य त्याला विचारितां बोलले, हे राब्बी, ज्या पापामुळें हा आंधळा जन्मला कोणी तें केलें, यानें? किंवा याच्या आईबापानी? येशूनें उत्तर दिल्हें, कीं यानें आणि याच्या आईबापानीहि पाप न केलें, परंतु याकडून देवाचीं कामें प्रकट व्हावीं यामुळें. जोंपर्यंत दिवस आहे तोंपर्यंत माझ्या

पाठविणाऱ्याचीं कामें मला केलीं पाहिजेत, रात्र येती तेव्हां कोणाला काम करायास शक्ति नाहीं, मी जगांत आहें तों पर्यंत मी जगाचा उजेड आहें. तो हें बोलून भूमीवर थुंकला, मग त्यानें थुंकीनें चिखल केला आणि तो चिखल त्या आंधळ्याच्या डोळ्यांवर लाविला, नंतर त्याला ह्मटलें; जा, शिलोहामाच्या तळ्यांत धू; हा शिलोहाम ह्मणजे पाठविलेला. यास्तव तो गेला आणि धुवून पाहत आला. यावर शेजारी आणि ज्यांनी त्याला पूर्वीं पाहिलें कीं आंधळा होता ते बोलले, जो बसत आणि भीक मागत होता तो हाच कीं नाहीं? कित्येक बोलले कीं, तो आहे आणि दुसरे कीं, त्याच्या सारिखा आहे; परंतु तो बोलला कीं मी तोच आहें. यास्तव त्यांनी त्याला ह्मटलें, तुझे डोळे कसे उघडले? तो उत्तर देतांना बोलला, येशू ह्मटलेल्या माणसानें चिखल केला आणि माझ्या डोळ्यांवर लावून मला सांगितलें, तूं शिलोहामाच्या तळ्यास जा आणि धू, तेव्हां जाऊन व धुवून मला दिसलें. यावर त्यांनी त्याला ह्मटलें, तो कोठे आहे? तो बोलला, मला ठाऊक नाहीं.

जो पूर्वीं आंधळा त्याला फारिशांजवळ आणितात. आणि जेव्हां येशूनें चिखल केला व त्याचे डोळे उघडले तेव्हां शाब्बाथ होता, यास्तव अणखी त्याला दिसणें कसें झालें,

हें फारिश्यानी त्याला पुसलें. आणि तो त्यांस बोलला त्यानें माझ्या डोळ्यांवर चिखल लाविला, मग म्या धुतलें आणि मी पाहतों. यास्तव फारिश्यांतून कित्येक बोलले, हा माणूस देवापासून नाहीं, कां तर तो शाब्बाथ पाळीत नाहीं. दुसरे बोलले, जो पापी माणूस तो एवढे चमत्कार करूं कसा शकतो? तेव्हां त्यांमध्यें फूट झाली. फिरून ते त्या आंधळ्याला ह्मणतात, त्यानें तुझे डोळे उघडले ह्मणून त्याविषयीं तूं काय बोलतोस? मग त्यानें म्हटलें कीं, तो भविष्यभाषी आहे. तेव्हां यहूद्यानी त्या दृष्टि पावलेल्याच्या आईबापांस बोलाविलें; तोंपर्यंत विश्वास धरिला नाहीं कीं तो आंधळा होता आणि दृष्टि पावला. मग त्यानी त्यांस विचारितां म्हटलें, तुमचा पुत्र जो जन्मांध होता ह्मणून तुह्मी म्हणतां तो हाच आहे कीं काय? तर तो आतां कसा पाहतो? त्याचीं आईबापें त्यांस उत्तर देण्यानें बोललीं, हा आमचा पुत्र आहे, हें आणि जन्मांध होता, हें आह्मास कळलें, परंतु तो आतां कसा पाहतो हें आह्मास कळलें नाहीं, किंवा त्याचे डोळे कोणी उघडले हें आह्मास कळलें नाहीं, त्याला प्रौढ पण आहे त्याला विचारा, तो आपल्याविषयीं सांगेल. त्याच्या आईबापानी यहूद्यांचें भय धरिलें, यास्तव असीं म्हटलीं, कारण कीं हा ख्रीस्त असें जर कोणी पत्करील,

तर तो सभेंतून घालविला जावा, असा यहूद्यांनी तितक्यांत एकोपा केला होता. ह्यावरून त्याच्या आईबापांनी ह्मटलें कीं त्याला प्रौढपण आहे त्याला विचारा. यावर जो माणूस आंधळा होता त्याला त्यांनी दुसऱ्याने बोलाविलें आणि त्याला ह्मटलें, देवाला गौरव दे, हा माणूस पापी आहे, हें आह्मास कळलें. यावर तो उत्तर देतांना बोलला, पापी किंवा नाहीं हें मला कळलें नाहीं, एक मला कळलें कीं, मी आंधळा असून आतां पाहतों. मग त्यांनी त्याला फिरून ह्मटलें, त्याने तुला काय केलें? त्याने तुझे डोळे कसे उघडिले? त्याने त्यांस उत्तर दिलें, ह्या आतांच तुह्मास सांगितलें आणि तुह्मी ऐकिलें नाहीं, फिरून ऐकावयास कां इच्छितां? तुह्मीहि त्याचे शिष्य होऊं इच्छितां कीं काय? यावर ते त्याला निंदितांना बोलले, तूं त्याचा शिष्य आहेस परंतु आह्मी मोशाचे शिष्य आहों. देव मोशाशीं बोलला, हें आह्मास ठाऊक आहे, परंतु हा माणूस कोठला आहे हें आह्मास ठाऊक नाहीं. तो माणूस उत्तर देण्याने त्यांस बोलला, तर यावरून आश्चर्य आहे कीं त्याने माझे डोळे उघडिले असतांना तो कोठला आहे हें तुह्मास ठाऊक नाहीं. आणि आह्मास कळलें कीं देव पाप्यांचें ऐकत नाहीं परंतु जर कोणी देवभक्त आहे आणि त्याच्या इच्छेप्रमाणे करितो तर त्याचें तो ऐकतो.

कोणी जन्मांधाचे डोळे उघडिले असें काळांतरापासून ऐकिलें न गेलें. जर हा देवापासून नसता तर कांहीं करूं न शकता. ते उत्तर देण्याने त्याला बोलले, तूं अगदीं पापांमध्यें जन्म पावलास आणि तूं आम्हास उपदेशितोस काय? मग त्यांनी त्याला बाहेर घालविलें.

## अध्याय २१.

त्यांनी त्याला बाहेर घालविलें हें येशूने ऐकिलें, नंतर त्याला पावून त्याला ह्मटलें, तूं देवाच्या पुत्रावर विश्वास ठेवितोस कीं काय? तो उत्तर देण्याने बोलला, हे प्रभू, म्या त्याजवर विश्वास ठेवावा म्हणून तो कोण आहे? तेव्हां येशू त्याला बोलला, त्वां त्याला पाहिलें आहे आणि तुजशीं जो बोलतो तोच तो आहे. तेव्हां त्याने ह्मटलें, हे प्रभू, मी विश्वासतों; मग त्याने त्याची भक्ति केली. तेव्हां येशू बोलला, जे पाहत नाहींत त्यांनी पाहावें, आणि जे पाहतात त्यांनी आंधळें व्हावें, ह्मणून न्याय ठरविण्यासाठीं मी ह्या जगांत आलों आहें. तेव्हां फारिशी जे त्याच्याजवळ होते त्यांतून कित्येक हें ऐकून त्याला बोलले, आह्मीहि आंधळे आहों कीं काय? येशू त्यांस बोलला, जर तुम्ही आंधळे असतां तर तुमचें पाप नसतें, परंतु आतां तुह्मी ह्मणतां कीं आम्ही पाहतों यास्तव तुमचें पाप राहतें.

मी तुह्मास खचीत खचीत सांगतों, जो मेंढवाड्यांत दाराने न शिरतो परंतु दुसऱ्या ठायीं चढतो, तो चोर व लुटारू आहे. परंतु जो दाराने शिरतो तो मेंढ्रांचा पाळणारा आहे, त्याच्या साठीं द्वारपाळ उघडितो, मेंढ्रें हि त्याचा शब्द ऐकतात आणि तो आपल्या मेंढ्रांस नावाने बोलाविताना त्यांस बाहेर नेतो. आणि जेव्हां तो आपलीं मेंढ्रें बाहेर काढितो तेव्हां त्यांच्या पुढें चालतो आणि मेंढ्रें त्याचा शब्द जाणतात, यास्तव त्याच्यामागें जातात; परंतु परक्याच्यामागें जात नाहींत, अणखी त्यापासून पळतात कां तर तीं परक्याचा शब्द न जाणतात. येशूने ही उपमा त्यांस सांगितली परंतु जीं त्याने त्यांस म्हटलीं तीं काय आहेत, हें ते न समजले. यास्तव येशू त्यांस बोलला, मी तुम्हास खचीत सांगतों, कीं मी मेंढ्रांचें दार आहें; माझ्यापूर्वीं जितके आले ते सर्व चोर व लुटारू आहेत परंतु मेंढ्रांनी त्यांचें न ऐकिलें. मी दार आहें, जर कोणी मजकडून शिरतो तर तारला जाईल, आणि आंत जाईल व बाहेर निघेल आणि चारा पावेल. चोरी करावी व मारावें व नाश करावा यांवांचून दुसऱ्यासाठीं चोर येत नाहीं; त्यांस जीवन व्हावें आणि तें त्यांस अति सर्वे व्हावें म्हणून मी आलों आहें. मी उत्तम मेंढपाळ आहें. जो उत्तम मेंढपाळ तो मेंढ्रांकरितां आपला जीव

मग ते सत्तर आनंदाने माघारें येऊन बोलले, हे प्रभू, तुझ्या नावाकडून भुतें देखील आमच्या स्वाधीन आहेत. तेव्हां तो त्यांस बोलला, सैतानाला विजेसारिखें आकाशांतून पडतां म्यां पाहिलें; पाहा, साप जे व विंचू जे यांवर पाय घालायास आणि वैऱ्याच्या सर्व शक्तीवर मी तुम्हास अधिकार देतों, आणि कांहीं तुम्हास बाधक होणार नाहींच. तथापि आत्मे तुमच्या स्वाधीन आहेत यांत तुम्ही आनंदूं नका, परंतु त्यापेक्षां यांत आनंद करा कीं तुमचीं नावें आकाशांमध्यें लिहिलीं आहेत. त्या वेळेस येशू आत्म्यांत हर्षित झाला आणि बोलला, हे बापा, आकाशांच्या आणि पृथ्वीच्या प्रभू, त्वां ज्ञानी व बुद्धिमान् यांपासून हीं लपविलीं आणि बाळकांस हीं प्रगटविलीं आहेत. यावरून मी तुला पत्करून स्तवितों, होय बापा, कां तर तुझ्या विचारांत असा मनोरथ झाला आहे. माझ्या बापाकडून अवघीं माझ्या स्वाधीन केलीं आहेत, आणि पुत्र कोण आहे, हें बापाखेरीज कोणाला ठाऊक नाहीं, आणि बाप कोण आहे, हें पुत्र आणि ज्याला पुत्र प्रगट करावयाला इच्छीत असेल त्यांखेरीज कोणाला ठाऊक नाहीं. तेव्हां तो शिष्यांकडे मुरडून एकांतीं बोलला, जीं तुम्ही पाहतां तीं जे डोळे पाहतात ते धन्य, कां तर मी तुम्हास सांगतों कीं जीं तुम्ही

पाहतां तीं बहुत भविष्यवाद्यांनीं आणि राजांनीं पाहावयास इच्छिलीं परंतु पाहिलीं नाहींत, आणि जीं तुम्ही ऐकतां तीं ऐकावयास इच्छिलीं परंतु ऐकिलीं नाहींत.

तेव्हां पाहा कोणी शास्त्री उभा राहून त्याची परीक्षा करितांना बोलला, हे गुरु, म्या काय केल्याने सर्वकाळ जीवनाचें वतन पावेन? तेव्हां तो त्याला बोलला, धर्मनेमांत काय लिहिलें आहे, तूं कसें वाचितोस? तेव्हां तो उत्तर देतां बोलला, प्रभु, जो तुझा देव त्यावर तूं आपल्या संपूर्ण हृदयाने आणि आपल्या संपूर्ण जिवाने आणि आपल्या संपूर्ण शक्तीने आणि आपल्या संपूर्ण बुद्धीने प्रीति कर; आणि जशी आपणावर तशी आपल्या शेजाऱ्यावर प्रीति कर. नंतर तो त्याला बोलला, त्वां उत्तर नीट केलें, तूं हें कर, मग वांचशील. तेव्हां तो आपणाला पुण्यवान् ह्मणवावयास इच्छितां येशूला बोलला, तर माझा शेजारी कोण आहे? तेव्हां येशू अर्थ धरून बोलला कोणी माणूस यरुशालेमाहून यरीहोस खालीं जात होता आणि लुटारांमध्यें सांपडला. तेव्हां ते त्याला उघडें करून आणि फटके मारून अर्ध मेला प्राणावर सोडून निघाले. मग प्रसंगाप्रमाणे कोणी उपाध्या त्या वाटेने खालीं जात होता, आणि तो त्याला पाहून आडून गेला. आणि त्याचारिखें लेवीहि त्या

ठिकाणाजवळ असतां येऊन व पाहून वाहून गेला. परंतु
कोणी शोमरोनी वाटेंत जातां त्याजवळ आला, आणि
त्याला पाहून कळवळला; मग जवळ येऊन त्याच्या घायांत
तेल व द्राक्षरस ओतून मोट बांधिली, आणि त्याला
आपल्या पाठवळावर बसवून धर्मशाळेंत आणून त्याचा सांभाळ
केला. आणि सकाळीं तो निघतां दोन पावल्या काढून
धर्मशाळकऱ्याला देतांना त्याला बोलला, तूं याचा सांभाळ
कर, आणि याहून जें खर्चिशील तें मी माघारें आल्या
वर तुला भरून देईन. तर या तिघांतून कोणता लुटा
यांत सांपडलेल्याचा शेजारी होता तुला दिसतो? तेव्हां
तो बोलला, ज्याने त्याजवर दया केली तो; म्हणून येशू
त्याला बोलला, तूं जा आणि तसेंच कर.

## अध्याय ११.

आणि तो प्रार्थना करीत कोण्या ठिकाणीं असतांना,
जेव्हां त्याने समाप्त केली तेव्हां असें झालें त्याच्या
शिष्यांमधून कोणी त्याला बोलला, हे प्रभू, जसें योहा
नाने आपल्या शिष्यांस शिकविलें तसें तूंहि आम्हास प्रार्थना
करायास शिकीव. मग तो त्यांस बोलला, जेव्हां तुम्ही
प्रार्थना करितां तेव्हां म्हणा, हे आमच्या बापा आकाशांतल्या,
तुझें नाव पवित्र मानिलें होवो, तुझें राज्य येवो, जसें
आकाशांत तसें पृथ्वींतहि तुझी इच्छा होवो. आमचें नि

त्याचें अन्न आह्मास प्रतिदिवशीं दे, आणि आमचीं पापें आह्मास सोड, कां कीं आह्मी आपणहि प्रत्येक ओशाळ्याला सोडितों; आणि आह्मास हल्ल्यांत न न्यावें, परंतु आह्मास वाइटापासून सोडीव. आणि तो त्यांस बोलला, तुह्मा मध्यें असा कोण, कीं त्याला सखा असतांना त्याच्याजवळ मध्यरात्रीं जाईल आणि त्याला बोलेल, हे सखा, मला तीन भाकरी उसन्या दे, कारण कीं माझा मित्र वाटेंतून माझ्याजवळ आला, आणि जें म्या त्याच्यापुढें वाढावें तें मज पाशीं नाहीं. मग तो आंतून उत्तर देतां बोलेल, मला श्रम देऊं नको, आतां दार बंद केलें आहे, आणि माझीं मुलें माझ्याजवळ अंथरुणावर आहेत, उठून तुला द्यावें असें माझानें करवत नाहीं; मी तुह्मास सांगतों, तो त्याचा मित्र आहे यामुळें त्याला जरी तो उठून देणार नाहीं, तथापि त्याच्या आग्रहामुळें तो उठून त्याला जितक्या पाहिजेत तितक्या देईल. आणि तुह्मास सांगतों, मागा मग तुह्मास दिल्हें जाईल, शोधा मग तुह्मास सांपडेल, ठोका मग तुह्मासाठीं उघडलें जाईल; कां तर प्रत्येक जो मागतो तो पावतो, आणि जो शोधितो त्याला सांपडतें, आणि जो ठोकितो त्यासाठीं उघडलें जातें. आणि तुह्मा मधील कोण्या बापाजवळ पुत्र भाकर मागेल तर काय त्याला धोंडा देईल? आणि जर मासा मागेल तर माशाच्या

ठिकाणीं त्याला साप देईल कीं काय? किंवा जर तो अं
डहि मागेल तर त्याला विंचू देईल कीं काय? यास्तव तुम्ही
दुष्ट असतां जर आपल्या मुलांस उत्तम देणीं द्यावयास
जाणतां, तर किती विशेषें आकाशांतील बाप आपल्या
मागणाऱ्यांस पवित्र आत्मा देईल.

आणि तो शाब्बाथामध्यें एका सभेंत उपदेशीत होता,
तेव्हां पाहा ज्या स्त्रीला अठरा वर्षें विकाराचा आत्मा होता,
ती तेथें होती; आणि ती कुबडी वांकली होती, आणि
नीट होऊं सर्व प्रकारें न शकली. तेव्हां येशूनें तिला पाहून
जवळ बोलाविलें आणि तिला म्हटलें, हे स्त्रिये, तुझ्या
विकारापासून तूं सुटली आहेस. मग त्यानें तिजवर
हात ठेविले आणि तेव्हांच ती फिरून उभी झाली, आणि
तिनें देवाला गौरविलें. परंतु येशूनें शाब्बाथांत निरोगी
केलें, यास्तव सभेचा अधिकारी जळफळून उत्तर देतां समु
दायाला बोलला, ज्यांमध्यें काम करावें असे साहा दिवस
आहेत, तर त्यांत येऊन निरोगी केले जा, परंतु शाब्बाथ
दिवशीं नका. यास्तव प्रभूनें त्याला उत्तर देतांना म्हटलें,
हे ढोंगी, तुह्मांमधील प्रत्येक आपला बैल अथवा गाढव
यांस शाब्बाथांत गव्हाणीपासून सोडून आणि दूर नेऊन न
पाजितो कीं काय? आणि ही आब्राहामाची कन्या असतां
जिला सैतानानें अठरा वर्षें हेंबीव बंद केलें, पाहा, तिला

ह्या बंधनापासून शाब्बाथदिवशीं सोडिलें न पाहिजे कीं काय ? आणि तो हीं बोलतां त्याचे सर्व अडविणारे लाजविले गेले, आणि त्याकडून अद्भुतें जीं नवलें झालीं त्यांवरून सर्व समुदाय आनंद पावला.

मग तो बोलला, देवाचें राज्य कशासारिखें आहे ? आणि मी त्याला कशाची उपमा देऊं ? तें मोहरीच्या अशा दाण्यासारिखें आहे कीं माणसानें घेऊन आपल्या मळ्यांत टाकला, मग तो वाढला आणि असें मोठें झाड झालें कीं आकाशांतील पांखरांनी त्याच्या फांद्यांमध्यें वस्ती केली. आणि तो फिरून बोलला, देवाच्या राज्याला काय उपमा देऊं ? तें असें फगवणासारिखें आहे कीं बायकोनें घेऊन तीन पावफऱ्यांचें पीठ संपूर्ण फुगविलें गेलें, तोंपर्यंत त्यांत लपविलें.

तेव्हां तो उपदेशितां आणि यरुशालेमाकडे गमन करितां प्रतिनगर व गांव यांमधून गेला. तेव्हां कोणी त्याला बोलला, हे प्रभू, जे तारिले जातात ते थोडके कीं काय ? मग तो त्यांस बोलला, तुह्मी अरुंद दाराकडून शिरावयाला प्रयास करा, कां तर मी तुह्मास सांगतों बहुत आंत जाय याच झटतील, परंतु येथपासून न शकतील ; कां कीं घराचा धनी उठून त्यानें दार बंद केलें असतां तुह्मी बाहेर उभे राहूं व दारावर ठोकूं लागून ह्मणाल, हे प्रभू प्रभू,

आम्हांसाठीं उघड. मग तो उत्तर देतां तुम्हास बोलेल, मी तुम्हास ओळखिलें नाहीं कीं तुम्ही कोठून आहां. तेव्हां तुम्ही बोलूं लागाल, आम्ही तुझ्या समोर खाल्लें व प्यालों आहों, आणि त्वां आमच्या मार्गांत उपदेशिलें आहे. परंतु तो बोलेल, मी तुम्हास सांगतों, मी तुम्हास ओळखिलें नाहीं तुम्ही कोठून आहां, अहो अन्याय करणारे, सर्व तुम्ही मजपासून दूर व्हा. आब्राहाम व इसहाक व याकोब व सर्व भविष्यभाषी यांस देवाच्या राज्यांत आणि आपणांस बाहेर टाकलेले असें जेव्हां तुम्ही पाहाल, तेव्हां रडणें व दांत कडकडविणें होईल. आणि उगवत व मावळत यांपासून येतील आणि देवाच्या राज्यांत बसतील; आणि पाहा, जे शेवटले ते पहिले होतील असे आहेत, आणि जे पहिले ते शेवटले होतील असे आहेत.

त्याच दिवशीं कित्येक फारिशी जवळ येऊन त्याला बोलले, तूं निघून एथून जा, कां तर हेरोद तुला जिवें मारावयास इच्छितो. परंतु तो त्यांस बोलला, तुम्ही जाऊन त्या कोल्ह्याला सांगा, पाहा, आज व उद्यां मी भुतांस काढवितों आणि निरोगी करणीं संपवितों, मग तिसऱ्यांत पूर्ण केला जाईन. तथापि आज व उद्यां व परवां मला चालणें अगत्य आहे, कां तर यरूशालेमाबाहेर भविष्यभाषी घात पावणें संभवत नाहीं. हे यरूशालेमा, यरूशालेमा,

जो तूं भविष्यवाद्यांस जिवें मारितोस आणि आपणाकडे जे पाठविले त्यांस धोंड्यांनी मारितोस, जशी कोंबडी आपल्या पिलवर्गास पांखांखालीं एकवट करिती, त्या प्रकारें तुझ्या लेंकरांस एकवट करायास म्यां कितीदां इच्छिलें? परंतु तुह्मी न इच्छिलें. पाहा, तुमचें घर तुह्मास ओसाड ठेविलें आहे, आणि मी तुह्मास खचीत सांगतों कीं जो प्रभूच्या नावानें येतो तो धन्यवादित असें तुह्मी ह्मणाल, ही वेळ येईल तोंपर्यंत तुह्मी मला पाहणार नाहींस.

अध्याय १४.

आणि शाब्बाथांत तो फारिश्यांतील एका अधिकाऱ्याच्या घरांत अन्न खावयास आल्या वेळेस असें झालें कीं ते त्याला जपत होते. तेव्हां पाहा कोणी जलोदराचा माणूस त्याच्यासमोर होता, आणि येशू उत्तर देतां त्या पंडितांस व फारिश्यांस बोलला, शाब्बाथांत निरोगी करणें योग्य आहे कीं काय? तेव्हां ते उगेच राहिले. मग त्यानें त्याला धरून निरोगी केलें आणि सोडिलें; मग त्यांस उत्तर देतां ह्मटलें तुह्मामधील कोणाचें गाढव किंवा बैल खांचेंत पडेल आणि शाब्बाथ दिवशीं त्याला तेव्हांच बाहेर न काढील? नंतर यांविषयीं ते त्याला विरुद्ध उत्तर देऊं न शकले.

आणि जे बोलाविलेले त्यांनी उत्तम आसनें कशीं निवडून

घेतलीं, याविषयीं लक्ष लावून तो त्यांस दाखला बोलतां त्यांस ह्मणाला, जेव्हां तूं कोणाकडून लग्नकार्यांस बोलाविला आहेस, तेव्हां उत्तम आसनीं बसूं नको; कदाचित् कोणी तुजपेक्षां सन्मानी त्याकडून बोलाविलेला असेल, मग ज्याने तुला व त्याला बोलाविलें तो येऊन तुला ह्मणेल, ह्याला जागा दे, आणि तेव्हां तूं लाजेनें शेवटील जागा धरूं लागसील. परंतु जेव्हां तूं बोलाविला अससील, तेव्हां जाऊन शेवटील जागीं बैस, तर्धे ज्याने तुला बोलाविलें तो जेव्हां येतो, तेव्हां त्याने तुला ह्मणावें, हे मित्रा, याह्रन उंचावर जवळ ये; नंतर तुझ्या सोबती बसणाऱ्यां समोर तुला गौरव होईल. कां तर जो कोणी आपणाला उंच करितो तो नीच केला जाईल आणि जो आपणाला नीच करितो तो उंच केला जाईल. आणि ज्याने त्याला बोलाविलें होतें त्यालाहि तो बोलला, जेव्हां तूं दुपारचें किंवा संध्याकाळचें जेवण करितोस, तेव्हां तुझ्या मित्रांस किंवा तुझ्या भावांस किंवा तुझ्या नातलगांस किंवा धनवान् शेजाऱ्यांस बोलावूं नको; कदाचित् तेहि तुला फिरून बोलावितील आणि तुला फेड होईल. परंतु जेव्हां तूं जेवण करितोस तेव्हां दरिद्र्यांस व्यंगांस लंगड्यांस, आंधळ्यांस बोलाव; मग तूं धन्य होसील, कां कीं तुझें फेडावयास

ह्यांपाशीं नाहीं, म्हणोनी पुण्यावानांच्या फिरून उठल्या वेळेस तुम्ही फेड होईल.

नंतर संगतीं जेवणाऱ्यांतील कोणी हीं ऐकून त्याला बोलला, जो देवाच्या राज्यांत अन्न खाईल तो धन्य. तेव्हां त्याला तो बोलला, एका माणसानें मोठें सांजजेवण केलें आणि बहुतांस बोलाविलें. मग अवघीं आतां सिद्ध झालीं आहेत यास्तव या, असें जेवणाच्या वेळेस बोलाविलेल्यांस सांगावयाला त्यानें आपला चाकर पाठविला. तेव्हां एका पासून सगळे सुटका मागूं लागले; पहिला त्याला बोलला, म्या शेत विकत घेतलें आहे आणि बाहेर जाऊन त्याला पाहण्याचें अगत्य मला आहे, मी तुला विनंती करितों मला सोडलें मान. आणि दुसरा बोलला, म्या बैलांच्या पांच जोड्या विकत घेतल्या आहेत आणि मी त्यांची प्रतीति पाहावयास जातों; मी तुला विनंती करितों मला सोडलें मान. आणि दुसरा बोलला, म्या बायको केली आहे, तर ह्यासाठीं माझ्यानें येववत नाहीं. तेव्हां त्या चाकरानें जवळ येऊन आपल्या धन्याला हीं निवेदिलीं; नंतर घरध न्यानें रागें भरून आपल्या चाकराला सांगितलें, बाहेर नग राच्या मार्गांत व गल्ल्यांत वेगें जा, आणि दरिद्र्यांस व लंग ड्यांस व आंधळ्यांस इकडे आण. मग तो चाकर बोलला, हे धन्या, जसी त्वां आज्ञा दिल्ही तसें झालें आहे आणि

अद्याप जागा आहे. मग धनी चाकराला बोलला, माझें घर भरावें ह्मणून वाटांमध्यें व कुंपणांमध्यें बाहेर जाऊन अग त्याने आंत येवीव, कां तर मी तुह्मास सांगतों कीं जों बोलाविलीं त्या माणसांमधील कोणी माझें जेवण चाखणार नाहीं.

आणि त्याच्या बराबर बहुत समुदाय चालिले, तेव्हां तो मुरडून त्यांस बोलला, जर कोणी मजकडे येतो आणि आपला बाप व भाई व बायको व लेंकरें व भाऊ व बहिणी यांस अणखी आपल्या जिवालाहि द्वेषीत नाहीं, तर तो माझा शिष्य होण्यास शक्तिमान् नाहीं; आणि जो कोणी आपला वधस्तंभ वागवितांना माझ्यामागें येत नाहीं, तो माझा शिष्य होण्यास शक्तिमान् नाहीं. कां तर तुह्मास धील असा कोण कीं बुरूज बांधावयास इच्छितां समाप्त करण्यासाठीं जों, तीं आपणापाशीं आहेत किंवा नाहींत, असें पहिलें बसून खर्च न गणतो? कारण कीं कदाचित् पाया घालून आणि समाप्त करावयास शक्तिमान् न होऊन सर्व जे पाहतात ते त्याची विटंबना करूं लागून बोलतील कीं, हा माणूस बांधूं लागला परंतु संपवूं न शकला. अथवा असा कोण राजा कीं दुसऱ्या राजाशीं लढाईंत भिडावयास जात असतां बसून पहिल्याने विचार न करितो कीं, जो वीस हजार घेऊन आपल्यावर येतो त्याशी

आपण दाहाहजार घेऊन सामोरें आवयास शक्तिमान् आहे किंवा नाहीं? आणि जर नाहीं खरें, तर तो दूर असतां इतक्यांत हा वकिलीस पाठवून सल्ला होण्यास अशीं काय ह्मणून विनंती करितो. यास्तव तसेंच तुह्मामधील प्रत्येक जो आपलीं अवघीं जीं आहेत त्यांपासून विदा होत नाहीं, तो माझा शिष्य होऊं शकत नाहीं. मीठ चांगलें आहे, परंतु मीठ जर निःसत्व झालें तर कशानें खारट केलें आईल? भूमि व खतहि यां जोगें नाहीं, त्याला बाहेर टाकितात; ज्याला ऐकावयास कान आहेत तो ऐको.

तेव्हां त्याचें ऐकावयास सर्व करघेणारे व पापी त्याच्या जवळ येत होते; आणि फारिशी व पंडित कुजबुजतां बोलले कीं, हा माणूस पाप्यांस अंगिकारितो आणि त्यांस रावर खातो. तेव्हां तो हा दाखला त्यांस बोलतां ह्मणाला, तुह्मामधील असा कोण माणूस कीं ज्याचीं शंभर मेंढ्रें असतां आणि त्यांतून एक हरविल्यावर, तीं नव्याण्णव रानामध्यें सोडून जें हारपलें तें सांपडे तोंपर्यंत त्यासाठीं न जातो? आणि सांपडल्यास तो आनंदतां आपल्या खांद्यावर ठेवितो, मग घरीं येऊन मित्रांस व शेजाऱ्यांस बोलावून त्यांस सांगतो, माझें हारपलेलें मेंढूं सांप डलें, यास्तव तुह्मी माझ्यासंगतीं आनंद करा. मी तुह्मास सांगतों कीं तसें नव्याण्णव पुण्यवान् ज्यांस पश्चात्तापाचें

अगत्य नाहीं, त्यांहून पश्चात्ताप कर्त्या एक पाप्यावर आकाशामध्यें आनंद होईल. किंवा अशी कोण बायको कीं आपणाला दाहा पावल्या असतां, जर ती एक पावली हरवील तर दिवा लावून व घर झाडून ती सांपडे तोंपर्यंत एकनिष्ठेने शोध न करिती? आणि सांपडल्यावर मित्रांस व शेजाऱ्यांस बोलावून म्हणती, जी पावली म्या हरविली ती मला सांपडली, यास्तव माझ्या संगतीं आनंद करा. तसें मी तुम्हास सांगतों, एक पापी जो पश्चात्ताप करितो, यावर देवाच्या दूतांच्या भावनेंत आनंद होतो.

## अध्याय २४.

आणि तो बोलला, कोण्या माणसाला दोन पुत्र होते; तेव्हां यांतील धाकटा तो बापाला बोलला, हे बापा, वस्तभावेचा वांटा जो मला लागतो तो मला दे. मग त्याने त्यांस उपजीवन वांटलें, आणि फार दिवसांचें अंतर नसतां धाकटा पुत्र अवघीं गोळा करून दूर देशांत प्रवासाला गेला आणि तेथें आपलें धन उधळेपणाने उडविलें. नंतर त्याने अवघीं खर्चल्यावर त्या देशांत मोठा दुकाळ झाला आणि त्याला उणें होऊं लागलें. मग तो जाऊन त्या ठिकाणींतील एका देशस्थाला जडला, आणि त्याने त्याला डुकरांस चारावयाला आपल्या शेतांत पाठविलें. तेव्हां डुकरांनी जीं गुळीं खाल्लीं त्यांकडून त्याने आपलें पोट भरावयास

फार इच्छिलें, आणि कोणी त्याला दिल्हें नाहीं. नंतर तो आपलेपणांत आल्यावर बोलला, माझ्या बापाच्या किती मोलकऱ्यांस पुष्कळ अन्न आहे, परंतु मी भुकेनें नाश पावतों? मी उठून आपल्या बापाजवळ जाईन, मग त्याला ह्मणेन, हे बापा, म्या आकाशाशीं आणि तुझ्या पाहण्यांत पाप केलें आहे, आणि आतांपासून मी तुझा पुत्र ह्मटला जाण्यास योग्य नाहीं; तुझ्या एका मोलकऱ्याप्रमाणें मला ठेव. नंतर उठून आपल्या बापाजवळ आला; तेव्हां तो रस्त्यांत फार दूर असतां त्याचा बाप त्याला पाहतांना कळवळला, तेव्हां धांवून त्याच्या मानेवर पडला आणि त्याचें चुंबन ह्मणे घेतलें. मग पुत्र त्याला बोलला, हे बापा, आकाशाशीं आणि तुझ्या पाहण्यांत म्या पाप केलें आहे, आणि आतांपासून मी तुझा पुत्र ह्मटला जाण्यास योग्य नाहीं. परंतु बापानें आपल्या चाकरांस ह्मटलें, तुह्मी उत्तम झगा काढून याला लेववा, आणि याच्या हातीं आंगठी, आणि पायीं जोडे घाला. मग पुष्ट वांसरूं आणून मारा आणि आह्मी खाऊन हर्षित होऊं, कां तर हा माझा पुत्र मेला होता परंतु फिरून जीवंत झाला, आणि हारपला होता परंतु सांपडला आहे. आणि ते हर्षित होऊं लागले, परंतु त्याचा वडील पुत्र शेतांत होता, मग येऊन घराजवळ पोंहोंचल्यावर त्यानें वाद्य

व नाच ऐकिले. तेव्हां चाकरांतील एकाला बोलाकून विचारिलें, हें कशाला असतील? नंतर तो त्याला बोलला, तुझा भाऊ आला यासाठीं, आणि तुझा बाप त्याला सुखरूप पावला यास्तव त्याने पुष्ट वांसरूं मारिलें आहे. मग ह्याने रागें भरून आंत जावयाला अनमान केला, यास्तव याच्या बापाने बाहेर येऊन याला समजाविलें. परंतु हा उत्तर देतां बापास बोलला, पाहा मी इतकीं वर्षें तुझी चाकरी करितों आणि तुझी आज्ञा म्या कधीं उल्लंघिली नाहीं; तथापि माझ्या मित्रांच्याबराबर म्या हर्षित व्हावें म्हणून त्वां मला कधीं बकरूं दिल्हें नाहीं. परंतु हा तुझा पुत्र ज्याने तुझें उपजीवन कळवांतिणींबराबर खाऊन टाकिलें, तो जेव्हां आला, तेव्हां त्वां त्याच्यासाठीं पुष्ट वांसरूं मारिलें आहे. तेव्हां तो त्याला बोलला, हे लेंकरा, तूं सर्वदा माझ्याजवळ आहेस आणि अवघीं जीं माझीं तीं तुझीं आहेत. परंतु हर्षित व आनंदित होणें अगत्य झालें, कां तर तुझा भाऊ मेला होता परंतु फिरून जीवंत झाला आहे, आणि तो हारपला होता परंतु सांपडला आहे.

अणखी तो आपल्या शिष्यांस बोलला, कोणी धनवान् माणूस होता, याचा कारभारी होता, आणि ह्याने त्याचीं द्रव्यें उडविलीं अशा त्याच्याजवळ अपवादिला गेला. आणि

त्याने त्याला बोलावून त्याला म्हटलें तुजविषयीं हें मी काय ऐकतों ? तुझ्या कारभाराची झडती दे, कारण कीं आतां पासून तूं कारभार करूं शकणार नाहींस. तेव्हां तो कारभारी आपल्यांत बोलला, माझा प्रभू मजपासून कारभार काढितो, यास्तव मी काय करूं ? खणावयास मला शक्ति नाहीं आणि भीक मागावयास लाजतों. जेव्हां मी कारभारीपणांतून घालविला जाईन, तेव्हां त्यानी आपल्या घरांत मला घ्यावें ह्मणून म्या काय करावें, हें मला कळलें. तेव्हां त्याने आपल्या धन्याचे देणेकरी यांतील एक एकाला बोलाविल्यावर, पहिल्याला ह्मटलें, माझ्या धन्याचें तुला किती देणें आहे ? मग हा बोलला, तेलाचे शंभर मण ; तेव्हां तो त्याला बोलला, तुझा लेख घे आणि लवकर बसून पन्नास मांड. नंतर दुसऱ्याला बोलला, आणि तुझा किती देणें आहे ? तेव्हां हा बोलला, गव्हांच्या शंभर खंड्या ; मग तो त्याला ह्मणतो, तुझें लिखीत घे आणि ऐंशीं मांड. नंतर अन्यायी कारभाऱ्याने शाहाणपणें केल्यास्तव धन्याने त्याला वाखाणिलें ; कां तर ह्या जगाचे पुत्र आपल्या पिढीमध्यें प्रकाशाच्या पुत्रांपेक्षां अधिक शाहाणे आहेत. आणि मी तुह्मास सांगतों, अन्यायी लक्ष्मीकडून तुह्मी आपल्यासाठीं मित्रांस मिळवा यासाठीं कीं तुह्मी खुंटाल तेव्हां त्यानी तुह्मास सर्वकाळांच्या वस्त्यांत घ्यावें. जो अति लाहा

याविषयीं विश्वासू तो फाराविषयींहि विश्वासू आहे. आणि जो अति लाहानाविषयीं अन्यायी तो फाराविषयीं अन्यायी आहे. यास्तव जर तुह्मी अन्यायी लक्ष्मीविषयीं विश्वासू न झालां, तर जी खरी ती तुमच्या विश्वासावर कोण ठेवील? आणि दुसऱ्याचें जें याविषयीं जर तुह्मी विश्वासू न झालां, तर तुमचें जें तें तुह्मास कोण देईल? कोणी घरचाकर दोघा धन्यांची चाकरी करूं शकत नाहीं, कारण कीं तो एकाला द्वेषील आणि दुसऱ्यावर प्रीति करील, अथवा एकाचा पक्ष धरील आणि दुसऱ्याला तुच्छ करील; तुम्ही देवाची आणि लक्ष्मीची चाकरी करूं न शकतां.

आणि फारिशी जे पैकालोभी असतात, यांनी हीं अवघीं ऐकिलीं आणि त्याला नाकारिलें. तेव्हां तो त्यांस बोलला, जे आपणांस माणसांसमोर पुण्यवान् ठरवितात ते तुह्मी आहां, परंतु देव तुमच्या हृदयांस जाणतो; कां तर माणसांमध्यें जें फार उंच तें देवाच्या पाहण्यांत मळमळीत आहे. नेमशास्त्र व भविष्यभाषी योहानापर्यंत होते, तेव्हांपासून देवाच्या राज्याचें शुभवर्त्तमान सांगितलें आहे आणि प्रत्येक त्यांत बळानें जातो. परंतु नेमशास्त्राचा एक फांटा गळण्यापेक्षां आकाश व पृथ्वी नाहींशीं होणें, हें सोपें आहे. जो कोणी आपल्या बायकोला सूट देतो आणि दुसरीशीं लग्न करितो तो व्यभिचार करितो, आणि जव

त्यापासून सूट पावलेल्या स्त्रीशीं जो कोणी लग्न करितो ते व्यभिचार करितो.

अध्याय ३५.

तर कोणी धनवान् माणूस होता, आणि तो किरमजी व बुत्ती वस्त्रें लेऊन प्रतिदिवशीं तेजस्वी उत्साह करीत होता. आणि लाजारस नांवें कोणी दरिद्री होता, हा फोडयुक्त असून त्याच्या दरवाज्याजवळ टाकिला होता, आणि तो त्या धनवानाच्या अडणीवरून पडलेले चुरे यांपासून पोसला जाण्यास आशावला, अणखी कुत्र्यानीहि येऊन त्याचे फोड चाटिले. मग असें झालें कीं दरिद्री मेला आणि दूतां करून आब्राहामाच्या उराकडे तो नेला गेला. तेव्हां धनवान्हि मेला आणि पुरला गेला, आणि लोकांतरीं पिडां मध्यें असतां त्याने आपले डोळे वर करून दुरून आब्राहामाला व त्याच्या उरीं लाजारसाला पाहिलें. मग तो हाक मारितां बोलला, हे आब्राहामा बापा, मजवर दया कर आणि लाजारसाला याशाठीं पाठीव कीं त्याने आपल्या बोटाचें अग्र पाण्यांत बुचकन माझ्या जिभेला थंड करावें, कां तर मी ह्या जाळांत क्लेशी आहे. परंतु आब्राहाम बोलला, हे लेंकरा, तूं हें आठीव कीं आपल्या आयुष्यांत आपलीं जीं उत्तम तीं पावलास, आणि त्याप्रमाणे लाजारस वाईट तीं पावला; परंतु आतां हा एथे शांतविला

आहे आणि तूं कोशित आहेस. आणि या सगळ्यांवर आमच्या व तुमच्या मध्यें मोठा चर स्थापिला आहे, यास्तव जे एथून पार तुह्माकडे जाण्यास इच्छितात ते शकत नाहींत, आणि तिकडून आह्माकडे त्यांच्याने वल्हांडवत नाहीं मग तो बोलला, तर बापा, मी तुला विनंती करितों कीं त्वां त्याला माझ्या बापाच्या घरास पाठवावें; कां तर मला पांच भाऊ आहेत, म्हणजे त्याने त्यांस साक्ष यासाठीं पटवावी कीं त्यानी ह्या पिडेच्या जाग्यांत न यावें. आब्राहाम त्याला बोलतो, त्यांच्याजवळ मोशे व भविष्यभाषी आहेत, यांचें ते ऐकोत. मग तो बोलला, हे आब्राहामा बापा, असें नको परंतु जर कोणी मेलेल्यांमधून त्यांजवळ जाईल, तर ते पश्चात्ताप करितील. तेव्हां ह्याने त्याला ह्मटलें, जर ते मोशाचें व भविष्यभाष्यांचें ऐकत नाहींत, तर मेलेल्यां मधूनहि जरीं कोणी उठला तरीं ते विश्वासविले जाणार नाहींत.

तेव्हां तो शिष्यांस बोलला, अडखळणीं न येणें हें असंभव आहे, परंतु ज्याकडून येतात त्याला हायहाय; त्याने ह्या धाकट्यांतून एकाला अडखळवावें यापेक्षां त्याच्या गळ्यांत जांत्याचें पेढ घातलें जाणें आणि तो समुद्रांत टाकला जाणें, हें त्याला लाभ असतें. तुह्मी आपणांविषीं सावध व्हा, आणि जर तुझा भाऊ तुझ्याजवळ पाप करितो तर त्याला

निषेध कर, आणि जर तो पश्चात्ताप करितो तर त्याला क्षमा कर. आणि जर तो दिवसांत सात वेळा तुझ्याविरुद्ध पाप करितो आणि त्या दिवसांत सात वेळा तुजकडे परतून बोलेल, मी पश्चात्ताप करितों, तर त्वां त्याला क्षमा करावी. तेव्हां ते प्रेषित प्रभूला बोलले, आमचा विश्वास वाढीव; आणि प्रभु बोलला जर तुम्हावर मोहरीच्या दाण्याइतका विश्वास झाला असता आणि तुम्ही या उंबराला सांगितलें असतें, तूं उपटला जा आणि समुद्रांत लावला जा, तर त्यानें तुमचें मानलें असतें. आणि तुह्मामधील असा कोण? कीं याचा चाकर नांगरीत किंवा चारवीत असतां, शेतापासून आल्यावर त्याला बोलेल, तूं जवळ येऊन जेवायास बैस. काय, त्याला वेगळें न ह्मणेल कीं म्या जेवावें ह्मणून कांहीं सिद्ध कर आणि तूं कंबर बांधून मी खातों व पितों तोंपर्यंत माझी सेवा कर, आणि त्यानं तर तूं खाशील व पिशील? काय, तो त्या चाकराचा आभार मानितो कीं त्याला जीं नेमिलीं होतीं तीं त्यानें केलीं ह्मणून? मला वाटतें, नाहीं. तसें तुह्मीहि अवघीं जा तुह्मास नेमिलीं तीं जेव्हां कराल तेव्हां बोला कीं, जें करीं वयास आम्ही बांधले होतों तें मात्र केलें, वास्तव आह्मी अहितकारी चाकर आहों

आणि त्याला वर घेण्याचे दिवस पूर्ण झाले असतांना

असें झालें कीं त्यानें आपलें तोंड यरुशालेमास जावयास स्थिर केलें ; आणि तो यरुशालेमास जात होता, तेव्हां असें झालें कीं शोमरोन व गालील यांच्यामधून गेला. आणि त्यानें आपल्या तोंडें दूतांस पुढें पाठविलें, तेव्हां ते जाऊन त्याच्यासाठीं सिद्ध करावयास शोमरोनकरांच्या गांवांत गेले, परंतु त्याचें तोंड यरुशालेमास जावयाचें होतें, यास्तव त्यांनी त्याला अंगिकारिलें नाहीं. नंतर त्याचे शिष्य याकोब व योहान पाहून बोलले, हे प्रभू, जसें एलीयानें केलें, तसें आकाशांतून अग्नीनें पडावें आणि त्यांस नाहींसें करावें म्हणून आम्हीं सांगावें असी तुमची इच्छा आहे कीं काय ? परंतु त्यानें मुरडून त्यांस निषेधिलें आणि म्हटलें, तुम्ही कोणत्या आत्म्याचे आहां, हें तुम्हास कळलें नाहीं, कां तर मनुष्याचा पुत्र माणसांच्या प्राणांचा नाश करावयास नाहीं परंतु तारावयास आला आहे ; तेव्हां ते दुसऱ्या गांवास गेले.

आणि तो एका गांवांत जात असतां दाहा कोढी माणूस त्याला भेटून दूर उभे राहिले, आणि ते उंच स्वर काढून बोलले, हे येशू स्वामी, आम्हावर दया कर. मग तो पाहून त्यांस बोलला, तुम्ही जाऊन आपणांस उपाध्यांसीं दाखवा ; नंतर त्यांच्या जाण्या वेळेस असें झालें कीं ते शुद्ध केले गेले. आणि त्यांमधील एकानें आपण बरा झाला

असें पाहून माघारें फिरून मोठ्या स्वरानें देवाला गौरविलें, आणि त्याच्या पायांजवळ पालथा पडून त्याला उपकार मानिला; आणि हा शोमरोनकर होता. तेव्हां येशू उत्तर देतां बोलला, दाहा शुद्ध केले नव्हते काय? तर ते नव कोठे? हा अन्य जातीस वांचून देवाला गौरव द्यावयास परतलेले असे सांपडले नाहींत? मग तो त्याला बोलला, तूं उठून जा, तुझ्या विश्वासानें तुला तारिलें आहे.

आणि देवाचें राज्य केव्हां येतें, असें फारिश्यांकडून तो विचारिलेला असतां, त्यांस उत्तर देतांना बोलला, देवाचें राज्य जपण्यानें येत नाहीं; आणि एथें पाहा किंवा तेथें पाहा, असें न बोलतील, कां तर पाहा देवाचें राज्य तुह्मामध्यें आहे. आणि तो शिष्यांस बोलला, असे दिवस येतील कीं तेव्हां तुह्मी माणसाच्या पुत्राच्या दिवसांतील एकाला पाहावयास इच्छाल परंतु न पाहाल. आणि तुह्मांस बोलतील, एथें पाहा किंवा तेथें पाहा, तेव्हां तुह्मी निघूं नका आणि मागें जाऊं नका, कारण कीं ज्या प्रकारें वीज आकाशाखालच्या एकडून चमकून आकाशाखालच्या तिकडे प्रकाशती, तसा माणसाचा पुत्रहि आपल्या दिवसांत होईल; परंतु पहिल्यानें बहुत सोसणें आणि या पिढीकडून अव्हेरिलें जाणें, हीं त्याला लागतात. आणि

नोहाच्या दिवसांत जसें झालें, तसें मनुष्यपुत्राच्या दिवसांतहि होईल; नोहा तारवांत गेला आणि प्रलयपूरानें येऊन सर्वांचा नाश केला, त्या दिवसापर्यंत त्यांनी खाल्लें, तीं प्यालीं, त्यांनी वऱ्हाडून घेतलीं, तीं वऱ्हाडून गेलीं. आणि लोटाच्या दिवसांत जसें झालें, तसेंहि त्यांनी खाल्लें, तीं प्यालीं, त्यांनी विकत घेतलें, त्यांनी विकिलें, त्यांनी लावणें केलें, त्यांनी बांधिलें; परंतु लोट सदोमापासून निघाला त्या दिवशीं आकाशांतून अग्नि व गंधक यांचा पाऊस झाला आणि त्यांनी सर्वांचा नाश केला. माणसाचा पुत्र प्रगट होईल तो दिवस त्याप्रमाणें होईल; त्या दिवशीं जो गच्चीवर होईल आणि त्याच्या वस्तू घरांत तो त्या न्यावयास खालीं न येवो. आणि जो शेतांत तो तसाच माघारीं जीं यांसाठीं न फिरो; लोटाच्या बायकोची आठवण करा. जर कोणी आपला जीव राखावयास झटतो तर तो त्याला गमावील, आणि जर कोणी त्याला गमावील तर तो त्याला जीवंत काढील. मी तुह्मास सांगतों, त्या रात्रीं एका बाजेवर दोघे होतील, एक धरिला जाईल आणि दुसरा ठेविला जाईल. दोघी एकवट दळीत होतील, एक धरिली जाईल आणि दुसरी ठेविली जाईल. शेतामध्यें दोघे होतील, एक धरिला जाईल आणि दुसरा ठेविला जाईल. तेव्हां ते उत्तर देतां त्याला बोलले, हे प्रभू कोठें?

मग तो त्यांस बोलला, जेथे प्रेत तेथें गिधाडेंहि एकत्र मिळतील.

## अध्याय १८.

आणखी त्याने त्यांस हा दाखला सांगितला कीं, सर्वदा प्रार्थना करणें आणि न भागणें लागतें, कीं एक नगरांत कोणी एक न्यायाधीश होता, देवाला न भ्याला, आणि त्याने माणसांची भीड मानिली नाहीं. तेव्हां त्या नगरांत कोणी विधवा होती आणि ती त्याच्याजवळ येऊन बोलली, माझ्या वाद्यापासून मला न्यायकरून दे. तेव्हां कांहीं वेळपर्यंत त्याने मानिलें नाहीं, परंतु त्यानंतर तो आपणांत बोलला, जरी मी देवाला भीत नाहीं आणि माणसांचीहि भीड मानीत नाहीं; तथापि ही विधवा मला श्रम देती, यास्तव तिचा न्यायकरून यासाठीं पावेन कीं तिने शेवटपर्यंत येऊन माझ्या तोंडावर न मारावें. आणि प्रभु बोलला, अन्यायी न्यायाधीश काय म्हणतो तें तुम्ही ऐका; तर देव आपले निवडलेले जे रात्रीं व दिवसीं त्याला हाक मारितात, त्यांविषयीं फार वाट्टांहि त्यांचा न्याय करून घेणार नाहीं कीं काय? मी तुम्हांस सांगतों कीं तो त्यांचा न्यायकरून लवकर देईल; तथापि माणसाचा पुत्र येऊन पृथ्वीवर त्याला विश्वास सांपडेल कीं काय?

आणखी आपण पुण्यवान आहों असें जे कितीएकांनी आप

णांवर विश्वासलें आणि दुसऱ्यांस धि:कारिलें, त्यांस त्यानें हा दाखला सांगितला. दोघे माणूस, एक फारिशी व दुसरा करघेणारा, हे प्रार्थना करावयास देवळास चढले. फारिश्यानें आपणाशीं उभा राहून हीं प्रार्थिलीं, हे देवा, दुसरीं माणसें, अपहारी, अन्यायी, व्यभिचारी, यांसारिखा किंवा या करघेणाऱ्यासारिखाहि मी नव्हें, यास्तव मी तुझा उपकार मानितों; सात्यांत दोनदां उपास करितों, जितकीं मला मिळतात त्या अवघ्यांचें दाहावें देतों. परंतु करघेणाऱ्यानें दूर उभा राहून डोळे आकाशाकडे वर करावयास अनमान केला; भणखी आपल्या उरावर मारून बोलला, हे देवा, मज पाप्यास प्रसन्न हो. मी तुह्मास सांगतों, हा दुसऱ्यापेक्षां न्यायी मोजलेला आपल्या घरास उतरला, कां तर जो कोणी आपणाला उंच करितो तो नीच केला जाईल, आणि जो आपणाला नीच करितो तो उंच केला जाईल.

मग हे चालत असतां असें झालें कीं तो कोण्या गांवांत आला, आणि मार्था नावें कोणी स्त्री तिनें आपल्या घरीं त्याचें आतिथ्य केलें. भणखी तिला मारया ह्मटलेली बहीण होती, आणि ही येशूच्या पायांजवळ बसून त्याची गोष्ट ऐकत होती, परंतु मार्था बहुत सेवेविषयीं ओढा ओढींत होती. तेव्हां जवळ येऊन तो बोलली, हे प्रभू,

माझ्या बहिणीने मला एकटें सेवा करावयास सोडून दिलें याची तुला चिंता नाहीं कीं काय? यास्तव तिला माझें साह्य करावें ह्मणून सांग. तेव्हां येशू उत्तर देतां तिला बोलला, हे मार्थे, मार्थे, तूं बहुतांविषयीं चिंतातुर व गडबडीत आहेस, परंतु एकाचें अगत्य आहे, आणि मारयेनें जो चांगला वांटा तिजपासून घेतला जाणार नाहीं, तो निवडला आहे.

तेव्हां यरूशालेमांत संस्कार कार्याचा दिवस आणि हिंवाळा होता, आणि येशू देवळीं शलमोनाच्या मंडपांत फिरत होता. यावर यहूदी त्याच्या भोंवतें येऊन त्याला बोलले, तूं कोठपर्यंत आमचा जीव संदेहांत धरितोस? जर तूं ख्रीस्त आहेस तर आह्मास उघडें सांग. येशूनें त्यांस उत्तर दिलें, म्यां तुह्मास सांगितलें, तथापि तुह्मी न विश्वासतां. जीं कामें मी आपल्या बापाच्या नावानें करितों तीं मजविषयीं साक्ष देतात, परंतु तुह्मी मजवर न विश्वासतां, कारण कीं माझ्या मेंढ्रांतील नव्हां. जसें म्यां तुह्मास सांगितलें तसें, माझीं मेंढ्रें माझा शब्द ऐकतात, मीहि त्यांस जाणतों आणि तीं माझ्यामागें येतात आणि मी त्यांस सर्वकाळ जीवन देतों; ह्मणजे त्यांचा नाश सर्वकाळापर्यंत होणार नाहीं, आणि कोणी त्यांस माझ्या हातांतून हिसकणार नाहीं. माझा बाप ज्यानें मला दिलीं तो सर्वांपेक्षां थोर

आहे, आणि त्यांस माझ्या बापाच्या हातांतून हिसकून घ्यास कोणी शक्तिमान् नाहीं; मी व बाप एक आहों. त्यावर त्याला धोंडमार करायास यहूद्यांनी फिरून धोंडे घेतले. येशूने त्यांस उत्तर दिल्हें, म्यां आपल्या बापाचीं बहुत चांगलीं कामें तुह्मांस दाखविलीं आहेत, त्यांतून कोणत्या कामासाठीं तुह्मी मला धोंडमार करितां? यहूदी त्याला उत्तर देतां बोलले, चांगल्या कामासाठीं आह्मी तुला धोंड मार करीत नाहीं परंतु दुर्भाषणासाठीं, आणि यासाठीं कीं तूं मनुष्य असतां आपणाला देव करवितोस. येशूने त्यांस उत्तर दिल्हें, काय, तुमच्या शास्त्रांत न लिहिलें कीं, मी बोललों तुह्मी देव आहां? ज्यांवर देवाची गोष्ट प्राप्त झाली त्यांस जर त्याने देव ह्मटलें, आणि धर्मलेखाचा भंग होववत नाहीं, तर ज्याला बापाने पवित्र मानिलें आणि जगांत पाठविलें आहे, त्याला तुह्मी ह्मणतां कीं दुर्भाषण बोलतोस, मी देवाचा पुत्र आहें हें ह्मटल्यावरून? जर मी आपल्या बापाचीं कामें न करितों तर मजवर विश्वास ठेवूं नका, परंतु जर मी करितों मग जरीं मजवर न विश्वासतां, तथापि त्या कामांवर विश्वास असा ठेवा कीं तुह्मी जाणावें आणि विश्वासावें कीं मजमध्यें बाप आणि त्याजमध्यें मी आहें. यास्तव त्यांनी फिरून त्याला धरायास पाहिलें, परंतु तो त्यांच्या हातांपासून निघाला.

आणि तो फिरून यार्देनेपलिकडे जेथे योहान पहिल्याने बाप्तिस्मा करीत होता, त्या ठिकाणास जाऊन तेथे राहिला. तेव्हां बहुत त्याजवळ आले आणि बोलले कीं, योहानाने कांहीं चमत्कार केला नाहीं खरा, परंतु योहानाने ह्याविषयीं अवघीं जीं सांगितलीं तीं खरीं होतीं; आणि तेथे बहुतांनी त्याजवर विश्वास ठेविला.

## अध्याय ११.

तेव्हां मारया व तिची बहीण मार्था यांचा गांव जो बेथानी तेथील लाजारस नांवें कोणी त्याला विकार होता; आणि ज्या मारयेनें प्रभूला सुगंध तेलाने चर्चिलें आणि त्याचे पाय आपल्या केंसानी पुसले ती होती, तिचा भाऊ लाजारस याला विकार होता. यास्तव बहिणीनी त्याच्याजवळ पाठवून म्हटलें, हे प्रभू, पाहा, ज्यावर तूं प्रीति करितोस त्याला विकार आहे. तेव्हां येशू ऐकून बोलला, हा विकार मरणासाठीं नव्हे परंतु याकडून देवाच्या पुत्राचा गौरव व्हावा ह्मणून, हा देवाच्या गौरवासाठीं आहे. तेव्हां येशूने मार्था व तिची बहीण व लाजारस यांवर प्रीति केली होती; यावर त्याला विकार आहे, हें ऐकिल्यानंतर तो जेथे होता त्याच ठिकाणीं दोन दिवस राहिला. मग त्यानंतर तो शिष्यांस ह्मणतो, आपण यहूदांत फिरून जाऊं? शिष्य त्याला ह्मणतात, हे राब्बी, यहूदी आतां

तुला धोंडमार करावयास झटले आणि तूं तेथें फिरून जातोस काय? येशूनें उत्तर दिल्हें, कीं दिवसाच्या बारा घटिका कीं नाहींत? जर कोणी दिवसां चालतो तो या जगाचा उजेड पाहातो, यास्तव त्याला ठेंच लागत नाहीं. परंतु जर कोणी रात्रीं चालतो तर त्याला उजेड नाहीं, यास्तव ठेंच लागतो. त्यानें हीं म्हटलीं आणि यानंतरच त्यांस म्हणतो, आमच्या लाजारस मित्राला नीज लागली परंतु मी त्याला जागा करावयास जातों. यावर त्याचे शिष्य बोलले, हे प्रभू, जर त्याला नीज लागली तर तो पार होईल. तेव्हां येशू त्याच्या मरणाविषयीं बोलला, परंतु झोपेच्या निजण्याविषयीं बोलतो, असें त्यांस वाटलें. यास्तव त्यानंतर येशूनें त्यांस उघडें सांगितलें, लाजारस मेला आहे, आणि मी तेथे नव्हतों यास्तव तुह्मामुळें मी आनंद करितों, कारण कीं तुह्मी विश्वास धरावा; परंतु आपण त्याच्या जवळ जाऊं. यावर थोमा जो दिदुमस म्हटलेला तो सोबती शिष्यांस बोलला, आपणहि त्यासहित मरावयास जाऊं.

यावर येशू आला असतां, त्याला तो तेव्हांच चार दिवस थडग्यांत राहिलेला सांपडला; बेथानी तर यरुशालेमाजवळ सुमारें पंधरा धांवांभर दूर होती. आणि मार्था व मारया यांच्या भावाविषयीं यांचें सांत्वन कराव

याच त्यांच्यापाशीं यहूद्यांतील बहुत आले होते. तर येशू येतो हें मार्थेने ऐकिलें असतां ती जाऊन त्याला भेटली, परंतु मारया घरांत बसली. तेव्हां मार्था येशूला बोलली, हे प्रभू, जर तूं एथें असतास तर माझा भाऊ मेला नसता ; परंतु आतांहि जें कांहीं तूं देवाजवळ मागशील तें देव तुला देईल, हें मला कळतें. येशू तिला ह्मणतो, तुझा भाऊ पुन्हा उठेल ; मार्था त्याला ह्मणते, शेवटील दिवशीं पुन्हा उठण्यांत तो पुन्हा उठेल हें मला कळतें. येशू तिला बोलला मी पुन्हा उठणें आणि जीवन आहें, जो मजवर विश्वास ठेवितो तो जरी मेला तरी वांचेल, आणि जो कोणी वांचतांना मजवर विश्वासतो तो सर्वकाळापर्यंत मरणारच नाहीं, यास तूं विश्वासतीस कीं काय? ती त्याला ह्मणती, होय प्रभू, तूं तो ख्रीस्त देवाचा पुत्र जो जगांत येतो असा आहेस, ह्मणून मी विश्वासतें. आणि ती हें बोलून निघाली, आणि आपली बहीण जी मारया तिला गुप्त बोलाविता ह्मणाली, गुरु आला आहे आणि तुला बोलावितो ; ती हें ऐकतांच वेगें उठून त्याच्याजवळ येती. आणि तोंपर्यंत येशू गांवांत आला नव्हता, परंतु जेथे मार्था त्याला भेटली त्या जाग्यांत होता. यहूदी तर जे तिच्याजवळ घरांत असतांना तिचें सांतवन करीत होते, त्यांनी पाहिलें कीं मारया

लवकर उठून बाहेर निघाली; तेव्हां तिच्या मागें आतां म्हटलें, कीं, तो घडग्याजवळ तेथे रडावयास जात आहे. मारया तर जेथे येशू होता, तेथे आल्यावर त्याला पाहत असतां त्याच्या पायां पडून त्याला बोलली, हे प्रभू जर तूं एथे असतास तर माझा भाऊ मेला नसता.

यावर येशूने तिला रडतां आणि जे यहूदी तिच्या जवळ मिळाले त्यांस रडतां पाहिलें, तेव्हां तो आत्म्यांत कण्हला, व आपण विव्हळ झाला आणि बोलला, तुह्मी त्याला कोठे ठेविलें? ते त्याला ह्मणतात, हे प्रभू येऊन पाहा. येशू रडला. यास्तव यहूदी बोलले, पाहा, त्याने त्याजवर केवढी प्रीति केली. आणि त्यांमधून कित्येक बोलले, ज्याने आंधळ्याचे डोळे उघडिले त्या ह्याला असें करण्याची शक्ति नव्हती काय? कीं हाहि न मरावा. यावर येशू फिरून आपणांत कण्हून घडग्याजवळ येतो; तें तर गुहा होती आणि तिजवर धोंड ठेविली होती. येशू ह्मणतो, धोंड काढा; त्या मेलेल्याची बहीण जी मार्था ती त्याला म्हणती, हे प्रभू, चवथा दिवस झाला यास्तव आतां तो घाणतो. येशू तिला ह्मणतो, जर तूं विश्वासशील तर देवाचा गौरव पाहशील, हें म्या तुला सांगितलें कीं नाहीं? यास्तव जेथे तो मेलेला ठेविला होता, तेथून त्यांनी धोंड काढिली. तेव्हां येशू आपले डोळे वर

करून बोलला, हे बापा, तूं माझें ऐकिलें, यास्तव मी तुझा उपकार मानितों, आणि तूं सर्वदा माझें ऐकतोस हें मला कळतें. परंतु जन जे भोंवतीं उभे आहेत त्यामुळें बोललों, कारण त्यांनीं विश्वास धरावा कीं तूं मला पाठविलें आहे. मग हें बोलून तो उंच स्वरानें ओरडला, हे लाजारस बाहेर ये. तेव्हां जो मेला होता तो बाहेर आला, पाय व हात वेष्टणांनीं बांधलेले, आणि त्याचें तोंड रुमालानें वेष्टिलेलें होतें; येशू त्यांस म्हणतो, त्याला मोकळें करा आणि जाऊं द्या. यास्तव यहूदी जे मरयेजवळ आले आणि जें येशूनें केलें तें पाहत होते, त्यांतून बहुतांनीं त्यावर विश्वास ठेविला; परंतु त्यांतून कित्येकांनीं फारिश्यांजवळ जाऊन येशूनें जें केलें तें त्याला सांगितलें.

अध्याय ३८.

मग मुख्य उपाध्ये व फारिसी यांनीं सभा करून एकत्र जमून म्हटलें, आम्ही काय करूं? कां कीं हा मनुष्य बहुत चमत्कार करितो; जर आम्ही याला असा असूं देतों तर अवघे यावर विश्वासतील, मग रोमी येतील आणि आमचें ठिकाण व राष्ट्रहि घेतील. आणि त्यांतून कोणीएक कयाफा त्या वर्षी मुख्य उपाध्या असतां, तो त्यांस बोलला, तुम्ही कांहीं न जाणतां आणि विचार

न करितां, कां कीं प्रजेसाठीं एका माणसाने मरावें आणि सर्व राष्ट्राने नाश न पावावा ह्मणून आह्मास उपयोगी आहे. तेव्हां तो आपल्या आपण हें बोलला नाहीं, परंतु त्या वर्षी तो मुख्य उपाध्या असतां त्याने भविष्य ह्मटलें कीं, येशू राष्ट्रासाठीं मरणार होता, आणि केवळ त्या राष्ट्रासाठीं नव्हे परंतु असें कीं त्याने देवाचीं फांकलेलीं लेंकरेंहि एकवट मिळवावीं, यास्तव त्या दिवसापासून त्याला जिवें मारायास त्यांनी मसलत केली, यास्तव येशू तेव्हांपासून यहूद्यांमध्यें प्रगटपणें फिरला नाहीं, परंतु तेथून रानाजवळील प्रांत यांतील एफ्राइम ह्मटलेल्या नगरांत गेला आणि तेथे आपल्या शिष्यांसुद्धां राहिला.

आणि जेव्हां येशूने ह्या गोष्टी संपविल्या होत्या, तेव्हां असें झालें कीं तो गालीलाहून पलिकडे गेला, आणि यार्देनेवरील यहूदाच्या सिवांत आला. मग बहुत समुदाय त्याच्यामागें गेले, आणि त्याने आपल्या वहिवाटीप्रमाणे त्यांस फिरून उपदेशिलें आणि त्यांस तेथे निरोगी केलें.

तेव्हां फारिसी त्याच्याजवळ येऊन त्याची परीक्षा घेतांना त्याला बोलले, माणसाने आपल्या बायकोला प्रत्येक निमित्तावरून सोडणें उचित आहे कीं काय? मग तो उत्तर देतां त्यांस बोलला, हें तुह्मी वाचलें नाहीं काय? कीं ज्याने त्यांस प्रारंभीं उत्पन्न केलें, त्याने त्यांस

पुरुष आणि स्त्री असें उत्पन्न केलें; आणि ह्मटलें, ह्याक रितां माणूस आपला बाप व आई ह्यांस सोडील, आणि आपल्या बायकोशीं जडेल आणि तीं दोघें एक शरीर होतील, अशास्तव पुढें तीं दोन नाहींत, परंतु एक शरीर आहेत; यास्तव जें देवानें एकवट जोडलें आहे त्याला माणूस न तोडो. ते त्याला म्हणतात, तर मोश्यानें आज्ञा कां दिल्ही कीं सूटपत्र द्यावें आणि तिला सोडावें? तो त्यांस ह्मणतो कीं, तुमच्या कठीण अंतःकरणापासून मोश्यानें तुमच्या बायकांस तुह्मास सोडूं दिल्हें, परंतु पहिल्यापासून असें नव्हतें. आणि मी तुह्मास सांगतों कीं, जो जो आपल्या बायकोला जारकर्माच्या कारणावांचून सोडील आणि दुसरीशीं लग्न करील तो तो व्यभिचार करितो. त्याचे शिष्य त्याला म्हणतात, बायकोविषयीं जर माणसाची दशा अशी आहे तर लग्न करणें उपयोगी नाहीं. तेव्हां तो त्यांस बोलला, ह्या गोष्टीचें धारण सर्वांस होत नाहीं, केवळ ज्यांस दिल्हें त्यांस धारण होतें, कारण कित्येक नपुंसक असे आहेत कीं आईच्या पोटापासून तसे जन्मले होते. आणि कित्येक नपुंसक असे आहेत कीं माणसांकडून नपुंसक केले होते, आणि ज्यांनी आकाशांच्या राज्यासाठीं आप णांस नपुंसक केलें असेहि नपुंसक आहेत; जो धारण करावयास शक्तिमान् आहे त्यानें धारण करावें.

नंतर बाळकें त्याच्याजवळ आणिलीं होतीं अशासाठीं कीं त्याने त्यांवर हात ठेवावे आणि प्रार्थना करावी. तेव्हां शिष्यांनी त्यांस शब्द लाविला, परंतु येशू बोलला, बाळकांस असूं द्या आणि मजजवळ यावयास त्यांस मना करूं नका, कां कीं आकाशांचें राज्य अशांचें आहे. मी तुम्हांस निश्चय असें सांगतों कीं, जर कोणीएक मनुष्य देवाचें राज्य लेंकरासारिखें घेणार नाहीं तर तो त्या राज्यांत जाणारच नाहीं. तेव्हां त्याने त्यांस कवटाळून धरून आणि त्यांच्या अंगावर हात ठेवून आशीर्वाद दिला.

मग तो वाटेंत बाहेर जात असतां कोणी एक पुरुष धांवत येऊन आणि त्याच्यापुढें आपले गुडघे भूमीवर टेंकून त्याला विचारिलें, हे उत्तम गुरू म्या निरंतर जीवन पावावें ह्याविषयीं म्या काय करावें? तेव्हां येशू त्याला बोलला कीं, तूं मला उत्तम कां ह्मणतोस? एका देवावांचून दुसरा कोणी उत्तम नाहीं. जीवनांत जावयास जर इच्छितोस तर ज्या आज्ञा आहेत त्या पाळ. तो त्याला ह्मणतो, कोणत्या? तेव्हां येशू बोलला कीं, तूं हत्या करूं नको, व्यभिचार करूं नको, चोरी करूं नको, खोटी साक्ष देऊं नको, तुझा बाप आणि आई यांची मर्यादा राख, आणि आपल्यासारिखी आपल्या शेजाऱ्यावर प्रीति कर. तो तरुण त्याला ह्मणतो ह्या आपल्या बाळपणापासून हीं अवघीं पाळिलीं आहेत;

आजून मी कशाविषयीं उणा आहें. येशूनें त्याजकडे लक्ष लावून त्याजवर प्रीति केली आणि त्याला ह्मटलें कीं, एक तुझ्या मध्यें उणें आहे जो तुझें जितकें आहे तितकें विकून दरिद्र्यांस दे मग तुला आकाशांत द्रव्याचा संग्रह होईल नंतर तूं वधस्तंभ उचलून माझ्यामागें ये. तेव्हां तो त्या वाक्याकरून खिन्न होऊन दुःखित होत्साता निघाला कारण कीं त्याजवळ द्रव्य बहुत होतें. तेव्हां तो कष्टी झाला हें येशू पाहून आपल्या शिष्यांस ह्मणतो कीं, ज्यांजवळ द्रव्य आहे त्यांनीं देवाच्या राज्यांत जावें हें त्यांस किती कठीण आहे? मग शिष्य त्याच्या वाक्याकरून विस्मित झाले. तेव्हां येशूनें त्यांस फिरून उत्तर दिल्हें कीं, हे लेंकरांहो जे द्रव्याचा भरवसा धरितात त्यांनीं देवाच्या राज्यांत जावें हें त्यांस किती कठीण आहे? धनवान पुरुषानें देवाच्या राज्यांत जावें ह्यापेक्षां उंटानें सुईच्या वेज्यांतून जावें हें सोपें आहे. तेव्हां ते अत्यंत चकित होऊन आपआपल्यांमध्यें बोलले कीं, असें असतां तरावयास कोण समर्थ होईल? मग येशू त्यांकडे पाहून ह्मणतो कीं, मनुष्यांस हें अशक्य आहे परंतु देवाला अशक्य नाहीं कारण कीं देवाला संपूर्ण शक्य आहे.

तेव्हां पेत्रस उत्तर देतां त्याला बोलला, पाहा आह्मी सर्वस्व सोडिलें आणि तुजमागें आलों आहों, ह्मणून आह्मांस काय होईल? मग येशू त्यांस बोलला, मी

तुम्हास खचीत म्हणतों कीं जेव्हां मनुष्याचा पुत्र आपल्या गौरवाच्या राजासनावर बसेल, तेव्हां जे तुम्ही मजमागें पुनर्जन्मांत चाललां, तुम्हीहि इस्राएलाच्या बारा वंशांचा न्याय ठरवितां यास्तव बारा राजासनांवर बसाल. आणि ज्याने घर किंवा भाऊ किंवा बहिणी किंवा बाप किंवा आई किंवा बायको किंवा लेंकरें किंवा शेतें हीं मजकरितां आणि सुभवर्त्तमानाकरितां सोडलीं आहेत, आणि जो असें केल्यावर ह्या सांप्रतकाळीं घरें आणि भाऊ आणि बहिणी आणि आया आणि लेंकरें आणि शेतें आणि प्राप्त व्हावयाच्या लोकीं निरंतर जीवनहि पावल्यावांचून राहील असा कोणी नाहीं. परंतु जे बहुत पहिले आहेत ते शेवटचे होतील, आणि शेवटचे आहेत ते पहिले होतील.

## अध्याय २९.

कारण कीं आकाशांचें राज्य कोणएका गृहपति सारिखें आहे, जो तो आपल्या द्राक्षमळ्यांत कामकरी मोलाने ठेवावयास सकाळीं बाहेर गेला; आणि त्याने कामकऱ्यांशीं दिनशाला पावल्याचा ठराव केल्यावर त्यांस आपल्या द्राक्षमळ्यांत पाठविलें. आणि त्याने तिसऱ्या तासीं बाहेर जाऊन अड्ड्यावर दुसरे रिकामे उभे राहतां पाहिले, आणि तो त्यांस बोलला, तुम्हीहि द्राक्षमळ्यांत जा आणि जें जें योग्य असेल तें तें तुम्हास देईन, मग ते

गेले ; आणखी साहाव्या व नव्या तासीं त्यानें बाहेर जाऊन तसेंच केलें. नंतर अकराव्या तासीं बाहेर जाऊन दुसरे रिकामे उभे राहतां पाहिले, आणि तो त्यांस ह्मणतो, तुह्मी सारा दिवस एथे रिकामे कां उभे राहातां ? ते त्याला ह्मणतात, आह्मास मोलानें कोणी ठेविलें नाहीं यासाठीं राहतों. तो त्यांस ह्मणतो तुह्मीहि द्राक्षमळ्यांत जा, आणि जें जें योग्य असेल तें तें तुह्मी पावाल. तेव्हां सायंकाळ झाल्यावर त्या द्राक्षमळ्यांचा धनी आपल्या कारभाऱ्याला ह्मणतो, कामकऱ्यांस बोलाव, आणि शेवटल्यापासून आरंभून पहिल्यापावेतों त्यांस मोल दे. तेव्हां जे अकराव्या तासींचे ते येऊन त्या एक एकाला पावला मिळाला ; मग जे पहिले त्यांनी येऊन आपणांस अधिक मिळेल असें कल्पिलें, परंतु त्या एक एकालाहि पावला मिळाला. आणि त्यांनी घेतल्यावर गृहपतिविरुद्ध कुरकुर करून ह्मटलें, ह्या शेवटल्यानी एकच तास काम केलें, तथापि ज्यांनी दिवसाचा भार व ऊन सोसिलें त्या आह्मासमान त्वां त्यांस केलें आहे. परंतु तो त्यांतून एकाला उत्तर देतां बोलला, हे सख्या, मी तुझा अन्याय करीत नाहीं ; त्वां मजसीं पावल्याचा ठराव केला नाहीं काय ? जें तुझें तें घेऊन जा, परंतु जसें तुला तसें ह्या शेवटल्यालाहि द्यावयास माझी इच्छा आहे. कीं माझीं

त्याविषयीं जें मी इच्छितों तें करणें, हें मला उचित नाहीं काय? मी चांगला आहें, यास्तव तुझा डोळा वाईट आहे काय? असे शेवटले ते पहिले, आणि पहिले ते शेवटले होतील, यास्तव कीं बहुत बोलावलेले परंतु थोडके निवडिलेले आहेत.

आणि ते वाटेंत यरूशालेमास वर जात होते त्या काळीं येशू त्यांच्या पुढें जात असतां ते विस्मित झाले आणि मागें चालत असतां भयाभीत झाले. तेव्हां तो फिरून त्या बारा [जणांस] जवळ घेऊन आपणाला जें जें प्राप्त होणार होतें तें तें त्यांस सांगूं लागला कीं, पाहा आह्मी यरूशालेमास वर जातों आणि भविष्यवाद्यांकडून माणसाच्या पुत्राविषयीं सर्व जीं लिहिलीं तीं पूर्ण केलीं जातील, कारण कीं तो मुख्य उपाध्ये व पंडित यांच्या स्वाधीन केला जाईल आणि ते त्याला मरणदंड ठरवितील. मग त्याचा उपहास करावयास आणि मार द्यावयास आणि वधस्तंभीं द्यावयास परप्रजांच्या आधीन करितील, मग तिसऱ्या दिवशीं तो फिरून उठेल. परंतु ते ह्यांतील कांहीं न समजले, ह्मणजे ही गोष्ट त्यांपासून लपविली गेली आणि जीं ह्मटलीं तीं त्यांनी न जाणलीं.

तेव्हां जेबेदीच्या पुत्रांच्या आईनें आपल्या पुत्रांबराबर त्याच्याजवळ येऊन पायां पडतां त्यापाशीं कांहीं मागितलें.

मग तो तिला बोलला, काय इच्छितोस? तो त्याला ह्मणती, हे माझे दोघे पुत्र एकाने तुझ्या उजव्याकडे, आणि एकाने तुझ्या डाव्याकडे तुझ्या राज्यांत बसावें ह्मणून सांग. परंतु येशू उत्तर देतां ह्मणाला, जें तुह्मी मागतां तें तुह्मास कळलें नाहीं; जो प्याला मी पिणार आहें तो तुह्मी प्यावयास आणि ज्या बाप्तिस्म्याने मी बाप्तिस्मी होतों त्याने तुम्ही बाप्तिस्मी व्हावयास शक्तिमान् आहां काय? ते त्याला ह्मणतात, आह्मी शक्तिमान् आहों. मग तो त्यांस ह्मणतो, माझा प्याला तुह्मी प्याल, आणि ज्या बाप्तिस्म्याने मी बाप्तिस्मी होतों त्याने तुम्ही बाप्तिस्मी व्हाल; परंतु ज्यांसाठीं माझ्या बापाने सिद्ध केलें त्यांवांचून दुसऱ्यांस माझ्या उजव्याकडे आणि डाव्याकडे बसूं देणें हें माझें नाहीं. तेव्हां ते दाहा हें ऐकून त्या दोघा भावांवर जळफळले, परंतु येशूने त्यांस जवळ बोलावून ह्मटलें, परप्रजांचे अधिकारी त्यांवर धनीपण करितात, आणि जे मोठे ते त्यांवर सत्ता करितात, हें तुह्मास कळलें आहे. तथापि तुह्मामध्यें तसें होऊं नये. परंतु जर कोणी तुह्मामध्यें मोठा होऊं इच्छीस तर तो तुमचा सेवक होवो, आणि जर कोणी तुह्मामध्यें पहिला होऊं इच्छितो तर तो तुमचा चाकर होवो. ज्या प्रकारें मनुष्याचा पुत्र सेविला जावयास नाहीं

परंतु सेवावयास आणि बहुतांच्या ठिकाणीं खंडणी आपला
जीव द्यावयास आला त्याप्रकारें.

नंतर यरीहोस आले मग तो आणि त्याचे शिष्य आणि
मोठा समुदाय हे [सर्व] यरीहोपासून बाहेर जात असतां
तीमी ह्याचा पुत्र बार्तिमी ह्या नामेंकरून एक आंधळा
वाटेवर भीक मागत बसला होता. तेव्हां त्याने समुदाय
पुढून चालतां ऐकून हें काय असेल? असें पुसलें, मग
त्यांनी त्याला सांगितलें कीं, नाजोरी येशू जवळून जात
आहे. तेव्हां तो ओरडून बोलूं लागला कीं, हे येशू
दावीदाच्या पुत्रा तूं मजवर दया कर. तेव्हां बहुत
लोकांनी त्याला दृढ आज्ञा केली कीं, तूं उगाच राहा;
परंतु तो फार अधिकच ओरडला कीं, हे दावीदाच्या पुत्रा
तूं मजवर दया कर. तेव्हां येशूने उभा राहून त्याला बोला
वयास सांगितलें, मग ते त्या आंधळ्याला बोलावून त्याला
म्हणतात, तूं धीर धर ऊठ तो तुला बोलावितो. नंतर तो
आपलें वस्त्र टाकून उठून येशूजवळ आला. तेव्हां येशूने
त्याला उत्तर केलें कीं, म्यां तुजसाठीं काय सिद्ध करावें म्हणून
तूं इच्छितोस? मग तो आंधळा त्याला बोलला, हे माझ्या
सद्गुरू मला दिसावें असें मी इच्छितों. तेव्हां येशू करुणा
करून त्याच्या डोळ्यांस शिवून त्याला बोलला, तुला दिसो,
तुझ्या विश्वासाने तुला तारिलें आहे. आणि त्याला तेव्हांच

मग तो तिला बोलला, काय इच्छितोस? तो त्याला ह्मणती, हे माझे दोघे पुत्र एकाने तुझ्या उजव्याकडे, आणि एकाने तुझ्या डाव्याकडे तुझ्या राज्यांत बसावें ह्मणून सांग. परंतु येशू उत्तर देतां ह्मणाला, जें तुह्मी मागतां तें तुह्मास कळलें नाहीं; जो प्याला मी पिणार आहें तो तुह्मी प्यावयास आणि ज्या बाप्तिस्म्याने मी बाप्तिस्मी होतों त्याने तुह्मी बाप्तिस्मी व्हावयास शक्तिमान् आहां काय? ते त्याला ह्मणतात, आह्मी शक्तिमान् आहों. मग तो त्यांस ह्मणतो, माझा प्याला तुह्मी प्याल, आणि ज्या बाप्तिस्म्याने मी बाप्तिस्मी होतों त्याने तुह्मी बाप्तिस्मी व्हाल; परंतु ज्यांसाठीं माझ्या बापाने सिद्ध केलें त्यांवांचून दुसऱ्यांस माझ्या उजव्याकडे आणि डाव्याकडे बसूं देणें हें माझें नाहीं. तेव्हां ते दाहा हें ऐकून त्या दोघा भावांवर जळफळले, परंतु येशूने त्यांस जवळ बोलावून ह्मटलें, परप्रजांचे अधिकारी त्यांवर धनीपण करितात, आणि जे मोठे ते त्यांवर सत्ता करितात, हें तुह्मास कळलें आहे. तथापि तुह्मामध्यें तसें होऊं नये. परंतु जर कोणी तुह्मामध्यें मोठा होऊं इच्छील तर तो तुमचा सेवक होवो, आणि जर कोणी तुह्मामध्यें पहिला होऊं इच्छितो तर तो तुमचा चाकर होवो. ज्या प्रकारें मनुष्याचा पुत्र सेविला जावयास नाहीं

परंतु सेवा करावयास आणि बहुतांच्या ठिकाणीं खंडणी आपला जीवच द्यावयास आला त्याप्रकारें.

नंतर यरीहोस आले मग तो आणि त्याचे शिष्य आणि मोठा समुदाय हे [सर्व] यरीहोपासून बाहेर जात असतां तीमी याचा पुत्र बार्तिमी या नामेंकरून एक आंधळा वाटेवर भीक मागत बसला होता. तेव्हां त्याने समुदाय पुढून चालतां ऐकून हें काय असेल? असें पुसलें, मग त्यांनी त्याला सांगितलें कीं, नाझोरी येशू जवळून जात आहे. तेव्हां तो ओरडून बोलूं लागला कीं, हे येशू दावीदाच्या पुत्रा तूं मजवर दया कर. तेव्हां बहुत लोकांनी त्याला दृढ आज्ञा केली कीं, तूं उगाच राहा; परंतु तो फार अधिकच ओरडला कीं, हे दावीदाच्या पुत्रा तूं मजवर दया कर. तेव्हां येशूने उभा राहून त्याला बोलावयास सांगितलें, मग ते त्या आंधळ्याला बोलावून त्याला म्हणतात, तूं धीर धर ऊठ तो तुला बोलाविती. नंतर तो आपलें वस्त्र टाकून उठून येशूजवळ आला. तेव्हां येशूने त्याला उत्तर केलें कीं, म्यां तुजसाठीं काय सिद्ध करावें म्हणून तूं इच्छितोस? मग तो आंधळा त्याला बोलला, हे माझ्या सद्गुरु मला दिसावें असें मी इच्छितों. तेव्हां येशू करुणा करून त्याच्या डोळ्यांस शिवून त्याला बोलला, तुला दिसो, तुझ्या विश्वासाने तुला तारिलें आहे. आणि त्याला तेव्हांच

दिधलें, मग तो देवाला गौरवीत त्याच्या मागें गेला, आणि सर्व लोकांनी पाहून देवाला स्तुति दिल्ही; आणि तो आंत येऊन यरीहोमधून गेला.

## अध्याय ४०.

तेव्हां पाहा जाक्की नावाने म्हटलेला माणूस होता आणि तो मुख्य करघेणारा होता. तो धनवान्हि होता, आणि येशू कोण आहे, हें पाहावयास त्याने यत्न केला, परंतु समुदायामुळें न शकला कां कीं वाह्याने ठेंगणा होता. तेव्हां तो त्याला पाहावयासाठीं पुढें धांवून उंबरा वर चढला, कां तर हा त्याजवळून जाणार होता. आणि त्या जाग्यावर आला असतां येशूने दृष्टि वर करून त्याला पाहिलें आणि त्याला म्हटलें, हे जाक्की, घाईने उतर, कां कीं आज तुझ्या घरीं मला राहावें लागतें. मग त्याने घाईने उतरून आनंदाने त्याला अंगीकारिलें, तेव्हां सर्व पाहून कुरकुरतां बोलले कीं, तो पापी माणसाकडे उतरावयास आंत गेला आहे. तेव्हां जाक्की उभा राहून प्रभूला बोलला, पाहा, प्रभू, माझीं अर्धीं द्रव्यें दरिद्र्यांस देतों आणि जर कुभांडाने कोणाचें कांहीं घेतलें तर चौपट परत देतों. तेव्हां येशूने त्याविषयीं असें म्हटलें, आज या घराला तारण प्राप्त झालें आहे, यास्तव कीं हाहि आब्राहामाचें संतान आहे; कारण कीं जें हारपलेलें त्याला

शोधावयास आणि तारावयास माणसाचा पुत्र आला आहे.

तेव्हां ते हीं ऐकत असतां त्याने अणखी दाखला सांगितला; यामुळें कीं तो यरुशालेमाजवळ होता, आणि देवाचें राज्य सवकर प्रकाशित होणार आहे असें त्यांस वाटलें, म्हणून बोलला, कोणी सुकुळीन माणूस आपल्यासाठीं राज्य घेण्यास आणि माघारें येण्यास दूर देशांत गेला. आणि त्याने आपल्या दाहा चाकरांस बोलावून त्यांस दाहा शेर पैका दिल्हा आणि त्यांस ह्मटलें, मी येतों तोंपर्यंत तुह्मी व्यापार करा. परंतु त्याच्या नागरिकानी त्याचा द्वेष केला आणि त्याच्या मागें वकिली पाठवून ह्मटलें, याने आह्मावर राज्य करावें ह्मणून आह्मी न इच्छितों. मग तो राज्य पावून माघारें आल्यावर असें झालें कीं ज्या चाकरांस पैका दिल्हा त्यांतील कोणी काय मिळविलें, हें आपण जाणावें ह्मणून त्याने त्यांस आपल्याजवळ बोलावायास सांगितलें. तेव्हां पहिला जवळ येऊन बोलला, हे प्रभू, तुह्मा शेराने दाहा शेर मिळविले आहेत. मग त्याला तो बोलला, बरें उत्तम चाकरा, तूं फार थोडक्याविषयीं विश्वासू झालास, यास्तव दाहा नगरांवर अधिकार करीत रेस. तेव्हां दुसरा येऊन बोलला, हे प्रभू, तुह्मा शेरांने पांच शेर मिळविले आहेत; तेव्हां यालाहि तो बोलला, तूंहि पांच

नकरांवर शेव. मग दुसरा येऊन बोलला, हे प्रभू पाहा, तुझा मोर जो म्या फडक्यांत ठेवून राखिला आहे; तो घ्या, कां तर मी तुला भ्यालों, कारण कीं तूं खट माणूस आहेस, जें त्वां ठेविलें नाहीं तें तूं घेतोस आणि, जें त्वां पेरिलें नाहीं तें तूं कापितोस. तेव्हां तो त्याला ह्मणाले, दुष्ट चाकरा, मी तुझ्या मुखानें तुझा न्याय ठरवितों. मी खट माणूस आहें, जें म्या ठेविलें नाहीं तें मी घेतों, आणि जें म्या पेरिलें नाहीं तें मी कापितों, हें त्वां जाणलें, तर माझा पैका पेढीवर कां ठेविला नाहीं, ह्मणजे म्या येऊन तो व्याजासुद्धां उगवविला असता? तेव्हां जवळ उभा राहणाऱ्यांस तो बोलला, तो एक मोर त्यापासून घ्या, आणि ज्याला दाहा मोर आहेत त्याला द्या. मग ते त्याला बोलले, हे प्रभू, त्याला दाहा मोर आहेत. कीं तुह्मास कारण सांगतों कीं ज्या प्रत्येकाला आहे त्याला दिलें जाईल, आणि ज्याला नाहीं त्याचें जें आहे तेंहि त्यापासून घेतलें जाईल, भणखी वे माझे शत्रु ज्यांनी आपल्यांवर म्या राज्य करावें ह्मणून इच्छिलें नाहीं त्यांस एथे आणा आणि माझ्यासमोर वधून टाका, आणि तो हें बोलून यरुशालेमास वर जात असतां पुढें चालिला.

आणि चढल्यांचा वल्हांडण सण जवळ होता, आणि पुष्कळ त्याच्या अगोदर बहुत आपल्यांस शुद्ध करावयास त्या प्रांता

पासून यरुशालेमास वर गेले. यास्तव त्यांनी येशूला शोधिलें आणि देवळांत उभे राहत असतां एकमेकांशीं बोलले, तुह्मास कसें दिसतें कीं तो सणास येणार नाहीं कीं काय? अणखी मुख्य उपाध्ये व फारिसी यानीं त्याला धरावें, म्हणून अशी आज्ञा दिल्ही होती कीं तो कोठे आहे असें जर कोणाला ठाउक असेल, तर त्याने सुचना द्यावी. यावर वल्हांडण सणाच्या साहा दिवस पूर्वीं येशू बेथान्यास आला; ज्या मेलेल्या लाजारसाला त्याने मेलेल्यां मधून उठविलें होतें, तो तेथे होता. तेव्हां यहूद्यांतून फार लोकानी जाणलें कीं तो तेथे आहे, आणि ते आले केवळ येशूमुळें नव्हे, परंतु त्याने ज्या लाजारसाला मेलेल्यां मधून उठविलें त्यालाहि आपण पाहावें ह्मणून. तेव्हां मुख्य उपाध्यानी लाजारसालाहि जिवें मारावयास मनसोबा केला, कारण कीं त्यामुळें यहूद्यांमधून बहुतानी जाऊन येशूवर विश्वास ठेविला.

दुसऱ्या दिवशीं येशू यरुशालेमास येतो, हें सणास आलेल्या फार लोकानी ऐकून खजुरांच्या डाहाळ्या घेतल्या आणि त्याच्या भेटीस ते बाहेर गेले. मंतर तो जवळ बेथ फागे व बेथानी तेथवर जाईतझाडांच्या ह्मटलेल्या डोंगरास आला असतां हें झालें, तो आपल्या शिष्यांतून दोघांस पाठवितांना बोलला, तुह्मी समोरच्या गावास जा, त्यांत

शिरतां तुह्मास बांधलेला शिंगरू ज्यावर कोणी माणूस कधींहि बसला नाहीं असा तुह्मास सांपडेल, त्याला सोडून आणा. आणि कां सोडितां? असें जर कोणी तुह्मास विचारितो तर त्याला असें बोला कीं. प्रभूला त्याचें अगत्य आहे. आणि जे पाठविले ते जाऊन त्यांस जसें ह्याने सांगितलें होतें तसें सांपडलें. आणि ते शिंग्याला सोडीत असतां याचे धनी त्यांस बोलले, तुह्मी शिंग्याला कां सोडितां? मग ते बोलले, प्रभूला याचें अगत्य आहे. आणि त्यांनी त्याला येशूच्याजवळ आणिलें, नंतर आपलीं वस्त्रें शिंग्यावर घालून येशूला वरती बसविलें; जसें लिहिलें आहे तसें कीं, हे सीयोनाच्या कन्ये, भिऊं नको, पाहा तुझा राजा गाढवीच्या शिंग्यावर बसून येतो. तथापि त्याचे शिष्य हीं प्रथम समजले नव्हते, परंतु जेव्हां येशू गौरविला होता, तेव्हां त्याविषयीं हीं लिहिलीं आणि त्यांनी हीं त्याला केलीं होतीं, असें त्यांनी आठविलें. समुदाय जो त्याच्या संगतीं होता त्याने तर साक्ष दिल्ही कीं, ह्याने लाजारसाला प्रेतपेंवांतून बोलाविलें आणि त्याला मेलेल्यांमधून उठविलें. तेव्हां बहुतांनी आपलीं वस्त्रें वाटेस पसरलीं, आणि दुसऱ्यांनी झाडांपासून डाहाळ्या तोडिल्या आणि वाटेस पसरल्या. आणि तो रतव्यांत जाईत्यावेळीं मराच्या उपणीजवळ आला असतां, शिष्यांचा सर्व भरणा

आनंद करून आपण जे चमत्कार पाहिले होते त्यांविषयीं मोठ्या शब्दाने देवाची स्तुति करूं लागतां ओरडले, तार णविनंती प्रभूच्या नावाने जो इस्राएलाचा राजा येतो, तो धन्य वादित, आमचा पितर दावीद याचें राज्य जें प्रभूच्या नावाने येतें तें आशीर्वादित असो सर्वांहून उंचामध्यें तारण विनंती. तेव्हां समुदायामधून कित्येक फारिशी त्याला बोलले, हे गुरू, तूं आपल्या शिष्यांस निषेध कर. मग तो उत्तर देतां त्यांस बोलला, मी तुम्हास सांगतों कीं जर हे उगेच असतील तर धोंडे ओरडतील. आणि जवळ आल्यावर त्याने नगराला पाहून त्याविषयीं रडतां म्हटलें कीं, तुझी शांतिकारक जीं तीं त्यां ह्या तुझ्या दिवशींहि खरें अवश्य जाणावींच होतीं, परंतु आतां तीं तुझ्या डोळ्यांपासून लपविलीं गेलीं आहेत. कां तर असे दिवस तुज वर येतील कीं तुझे शत्रू तुझ्याभोंवता मोर्चा बांधितांना तुला वेढितील, आणि तुला चहूंकडून कोंडितील; आणि तुला व तुझ्यामधील तुझीं लेंकरें यांस भूईसरसें करितील, आणि तुझ्यामध्यें धोंड्यावर धोंडा राहूं देणार नाहींत; याचें कारण कीं त्यां आपली भेट होण्याचा समय जाणला नाहीं

अध्याय ४१.

मग तो यरूशलेमांत आल्यावर सर्व नगर खळबळ

बोलले हा कोण आहे ? आणि समुदाय बोलले, येशू भविष्यभाषी जो गालीलांतील नाजारेथपासून तो हाच आहे. मग आंधळे व लंगडे देवळांत त्याच्याजवळ आले आणि त्याने त्यांस निरोगी केलें. तेव्हां त्याने जे चमत्कार केले, ते मुख्य उपाध्या व पंडित पाहून आणि देवळांत लेकरें ओरडतांना म्हणतात, दाविदाच्या संतानासाठीं तारणविनंती, त्यांसहि ते पाहून जळफळले आणि त्याला बोलले, हे काय बोलतात तें तूं ऐकतोस कीं काय ? तेव्हां येशू त्यांस म्हणतो, होय, बाळकें व तान्हीं यांच्या तोंडांतून ता स्तुति पूर्ण करविली आहे हें तुह्मीं कधीं न वाचिलें काय ?

आणि सणांत जे भजन करावयास चढले, त्यांमध्यें कित्येक हेल्लाणी होते ; यास्तव ते गालीलांतील बेथसाद यांच्या फिलीप्पसाजवळ आले आणि त्यापासीं मागत बोलले, हे स्वामी, आह्मी येशूला पाहावयास इच्छितों. फिलीप्पस येऊन आंद्रियासाला सांगतो ; मग फिरून आंद्रियास व फिलीप्पस येशूला सांगतात, तेव्हां येशू त्यावर बोलता त्यांस म्हणाला, माणसाचा पुत्र गौरविला जावा ह्मणून वेळ आली आहे. मी तुह्मास खचीत सांगतों, जर गव्हाचा दाणा भूमींत पडून न मरतो तर तो एकला राहतो, परंतु जर मरतो तर बहुत पीक देतो. जो आपल्या

जिवावर प्रीति करितो तो त्याला गमावील, परंतु जो ह्या जगांत आपल्या जिवावर द्वेष करितो तो त्याला सर्वकालिक जीवनासाठीं राखील. जर कोणी माझी सेवा करितो तर तो माझ्या मागें येवो; मग जेथें मी आहें तेथें माझा सेवकहि होईल, आणि जर कोणी माझी सेवा करितो तर त्याची मान्यता बाप करील. आतां माझा जीव घरा रला आहे; मी काय बोलूं? हे बापा, ह्या प्रसंगापासून मला तार? तर ह्यासाठींच मी ह्या प्रसंगास आलों. हे बापा, तुझ्या नावाचें गौरव कर; यास्तव आकाशांतून शब्द निघाला कीं, म्या गौरविलेंच आणि फिरून गौरवीन, यावर समुदाय जो उभा राहतां ऐकत होता त्यानें म्हटलें, गडगडाट झाला. दुसऱ्यांनी म्हटलें, त्याशीं दूत बोलला, येशूनें उत्तर देण्यानें बोलला, मजसाठीं नव्हे परंतु तुह्मा साठीं हा शब्द झाला. आतां ह्या जगाचा न्याय ठरविणें आहे; आतां ह्या जगाचा अधिकारी बाहेर घालविला जाईल, आणि जर मी पृथ्वीपासून उंच केला जातों तर सर्वांस आपणाकडे ओढीन. तेव्हां तो कोणत्या मरणानें मरणार होता, हें सुचवीत असतां असें बोलला. समुदायानें त्याला उत्तर दिलें, ख्रीस्त सर्व काळापर्यंत राहील हें आह्मी शास्त्रांतून ऐकिलें; तर माणसाचा पुत्र उंच केला पाहिजे, असें तूं कसें बोलतोस? हा माणसाचा पुत्र कोण

आहे? यावर येशू त्यांस बोलला, थोडका वेळ तुह्मांस कळ उजेड आहे तुह्मास अंधाराने न आटोपावें ह्मणून जोंपर्यंत तुह्मास उजेड आहे तोंपर्यंत चाला; कां जो अंधारांत चालतो तो कोठे जातो, हें त्याला कळलें नाहीं. तुह्मी उजेडाचे पुत्र व्हावे ह्मणून जोंपर्यंत तुह्मास उजेड आहे तोंपर्यंत त्या उजेडावर विश्वास ठेवा. येशू हीं बोलला, आणि संध्याकाळ झाला असतां तो त्या बारांसुद्धां निघून बेथानीस गेला, आणि तेथे वस्तीस राहिला.

त्याने इतकेहि चमत्कार त्यांदेखत केले असतां, त्यांनी त्याजवर विश्वास न ठेविला, असें कीं यशाया भविष्यवाद्याने जी गोष्ट ह्मटली ती पूर्ण व्हावी कीं, हे प्रभू, आमच्या परिसविण्यावर कोणी विश्वास ठेविला? आणि प्रभूचा भुज कोणाशीं प्रगट केला? त्याकरितां ते विश्वास ठेवूं न शकले, कां कीं यशाया फिरून बोलला, त्यांनी डोळ्यांनी न पाहावें, आणि हृदयाने बुद्धि न पावावी, आणि परत न फिरावें, आणि ह्या त्यांस बरें न करावें, ह्मणून त्याने त्यांचे डोळे आंधळे केले, आणि त्यांचें हृदय बहुरूप केलें आहे. यशायाने जेव्हां ह्याचें गौरव पाहिलें आणि ह्याविषयीं सांगितलें, तेव्हां हो ह्मटली. असें असतांहि अधिकाऱ्यांतून देखील बहुतांनी त्याजवर विश्वास ठेविला खरें, परंतु आपण सभेंतून घालविले न जावे

ह्मणून फारिश्यांमुळें त्यांनी त्याचें न ह्मणविलें; कारण कीं देवाच्या गौरवापेक्षां त्यांस माणसांचें गौरव अधिक आवडलें. तेव्हां येशू ओरडत बोलला, जो मजवर विश्वासतो तो केवळ मजवर नव्हे परंतु ज्यानें मला पाठविलें त्याजवर विश्वासतो; आणि जो मला पाहतो तो ज्यानें मला पाठविलें त्याला पाहतो. जो कोणी मजवर विश्वासतो त्यानें अंधारांत न राहावें ह्मणून मी उजेड जगांत आलों आहें; आणि जर कोणी माझ्या गोष्टी ऐकून न विश्वासतो तरीं मी त्याचा न्याय ठरवीत नाहीं, कारण कीं मी जगाचा न्याय ठरवावा म्हणून नव्हे, परंतु जगाला तारावें ह्मणून आलों. जो मला अव्हेरितो आणि माझ्या गोष्टी घेत नाहीं, त्याचा न्याय ठरविणारा असा त्याला आहे, ज्या जी गोष्ट म्हटली ती शेवटील दिवशीं त्याचा न्याय ठरवील. का कीं मी आपल्या आपण बोललों नाहीं, परंतु ज्या काय सांगावें आणि काय बोलावें, हें बाप ज्यानें मला पाठविलें त्यानें मला आज्ञा दिल्ही. आणि त्याची आज्ञा सर्वकालिक जीवन आहे हें मला कळलें, यास्तव मी जें बोलतों तें जसें बापानें मला सांगितलें तसें बोलतों.

आणि दुसऱ्या दिवशीं ते बेथानीपासून बाहेर येत असतां त्याला भूक लागली. तेव्हां दुरून अंजिराचें

आहे? यावर येशू त्यांस बोलला, थोडका वेळ तुह्माज
वळ उजेड आहे तुह्मास अंधाराने न आटोपावें म्हणून
जोंपर्यंत तुह्मास उजेड आहे तोंपर्यंत चाला; कां जो
अंधारांत चालतो तो कोठे जातो, हें त्याला कळत नाहीं.
तुह्मी उजेडाचे पुत्र व्हावे म्हणून जोंपर्यंत तुह्मास उजेड आहे
तोंपर्यंत त्या उजेडावर विश्वास ठेवा. येशू हीं बोलला,
आणि संध्याकाळ झाला असतां तो त्या बारांसुद्धां निघून
बेथानीस गेला, आणि तेथे वस्तीस राहिला.

त्याने इतकेहि चमत्कार त्यांदेखत केले असतां, त्यांनी
त्याजवर विश्वास न ठेविला, असें कीं यशायाह भविष्यवादी
याने जी गोष्ट म्हटली ती पूर्ण व्हावी कीं, हे प्रभू,
आमच्या परिसविण्यावर कोणी विश्वास ठेविला? आणि
प्रभूचा भुज कोणाशीं प्रगट केला? त्याकरितां ते विश्वास
ठेवूं न शकले, कां कीं यशाया फिरून बोलला, त्यांनी
डोळ्यांनी न पाहावें, आणि हृदयाने बुद्धि न पावावी,
आणि परत न फिरावें, आणि म्या त्यांस बरें न करावें,
म्हणून त्याने त्यांचे डोळे आंधळे केले, आणि त्यांचें हृदय
बहुरूप केलें आहे. यशायाने जेव्हा ह्याचें गौरव पाहिलें
आणि ह्याविषयीं सांगितलें, तेव्हां हीं म्हटली. असें
असतांहि अधिकाऱ्यांतून देखील बहुतांनी त्याजवर विश्वास
ठेविला खरें, परंतु आपण सभेंतून घालविले न जावे

ह्मणून फारिसांमुळें त्यांनी त्याचें न ह्मणविलें; कारण कीं देवाच्या गौरवापेक्षां त्यांस माणसांचें गौरव अधिक आवडलें. तेव्हां येशू ओरडत बोलला, जो मजवर विश्वासतो तो केवळ मजवर नव्हे परंतु ज्याने मला पाठविलें त्याजवर विश्वासतो; आणि जो मला पाहतो तो ज्याने मला पाठविलें त्याला पाहतो. जो कोणी मजवर विश्वासतो त्याने अंधारांत न राहावें ह्मणून मी उजेड जगांत आलों आहें; आणि जर कोणी माझ्या गोष्टी ऐकून न विश्वासतो तरीं मी त्याचा न्याय ठरवीत नाहीं, कारण कीं मी जगाचा न्याय ठरवावा म्हणून नव्हे, परंतु जगाला तारावें ह्मणून आलों. जो मला अव्हेरितो आणि माझ्या गोष्टी घेत नाहीं, त्याचा न्याय ठरविणारा असा त्याला आहे, ज्या जी गोष्ट म्हटली ती शेवटील दिवशीं त्याचा न्याय ठरवील. कां कीं मी आपल्या आपण बोललों नाहीं, परंतु ज्या काय सांगावें आणि काय बोलावें, हें बाप ज्याने मला पाठविलें त्याने मला आज्ञा दिल्ही. आणि त्याची आज्ञा सर्वकालिक जीवन आहे हें मला कळलें, यास्तव मी जीं बोलतों तीं जसें बापाने मला सांगितलें तसें बोलतों.

आणि दुसऱ्या दिवशीं ते बेथानीपासून बाहेर येत असतां त्याला भूक लागली. तेव्हां दुरून अंजिराचें

त्यावर पानें होतीं त्याला पाहून कदाचित् आपल्याला त्यावर कांहीं मिळेल म्हणून आला. परंतु त्याजवळ येऊन पानांवांचून कांहीं त्याला सांपडलें नाहीं; अंजिरांचा समय तरीं झाला नव्हता. तेव्हां येशू यावर बोलतां त्याला ह्मणाला आतांपासून सर्वकाळापर्यंत कोणी तुजपासून फळ न खावें. आणि त्याच्या शिष्यांनी ऐकिलें, मग ते यरूशालेमास येतात, आणि येशू देवळांत येऊन जे देवळांत विकीत आणि विकत घेत होते त्यांस बाहेर घालवूं लागला. आणि नाणावटोचे चौरंग व खबुतरें विकणाऱ्यांच्या बैठकी यांस त्यानें उलथें केलें, आणि कोणी देवळांमधून भांडें न्यावें म्हणून दिल्हें नाहीं. आणि तो उपदेशितां त्यांस बोलला, माझें घर अवघ्या राष्ट्रांसाठीं प्रार्थनेचें घर ह्मटलें जाईल, असें लिहिलें नाहीं कीं काय? परंतु तुह्मी त्याला लुटाऱ्यांचो गुहा केली आहे.

आणि तो देवळांत प्रतिदिवशीं उपदेशीत होता, तेव्हां मुख्य उपाध्ये व पंडित आणि लोकांतील श्रेष्ठ जे हे त्याला घात करावयास ह्मटले. परंतु आपण काय करावें हें त्यांस सांपडलें नाहीं, कारण कीं सर्व लोक त्याचें ऐकत असतां लागून राहिला. नंतर सांज झाल्यावर तो नगरांतून बाहेर गेला; आणि सकाळीं ते जवळून जात असतां तें अंजिराचें झाड मुळांपासून वाळलेलें त्यांनी पाहिलें. तेव्हां

पेमच आठवून त्याला म्हणतो, माझ्या गुरु, पाहा अंजि रझाड ज्याला त्वां शाप दिल्हा तें वाळलें आहे. मग येशू उत्तर देतां त्यांस म्हणतो, देवावर्षी विश्वास राखा, कारण मी तुम्हांस खचीत सांगतों कीं जो जो ह्या डोंगराला म्हणेल, तूं ढळला हो व समुद्रांत टाकला जा, आणि आपल्या हृदयीं संशय न धरील, परंतु जें आपण म्हणतो तें होतात, असा विश्वास धरील तर जें जें म्हणेल तें तें त्याला होईल. ह्यासाठीं मी तुम्हांस म्हणतों, जसर्वी जितकीं तुम्ही प्रार्थना करीत मागतां तितकीं पावतां, म्हणून विश्वास धरा, मग तुम्हांस होतील. आणि जेव्हां तुम्ही प्रार्थना करीत उभे राहतां, तेव्हां जर तुम्हांस कोणाच्या विरुद्ध कांहीं आहे तर तें यासाठीं सोडा कीं, तुमचा बाप जो आकाशांमध्यें याने तुमचीं पातकें तुम्हांस सोडावीं; परंतु जर तुम्ही न सोडितां तर तुमचा बाप जो आकाशांमध्यें तोहि तुमचीं पातकें सोडणार नाहीं.

## अध्याय ४२.

मग ते फिरून यरुशालेमांत येतात; नंतर तो देवळांत लोकांस उपदेशीत आणि शुभवर्त्तमान सांगत असतां, मुख्य उपाध्ये व पंडित व पुरातन हे त्याजवळ येतात आणि त्याला म्हणतात, तूं कोणत्या अधिकाराने हीं करितोस? आणि तों हीं करावीं म्हणून हा अधिकार तुला कोणी दिल्हा?

तेव्हां येशू उत्तर देतां त्यांस बोलला, मीहि तुह्मांस एक गोष्ठ विचारीन आणि तुह्मी मला उत्तर द्या, मग मी कोणत्या अधिकाराने हीं करितों हें तुह्मांस सांगेन, योहा नाचा बाप्तिस्मा हा आकाशापासून किंवा माणसांपासून झाला तुह्मी मला उत्तर द्या? तेव्हां ते आपणांमध्यें विचार करून बोलले, जर आह्मी आकाशापासून असें बोलूं, तर तो ह्मणेल, तुह्मी तर कशामुळें त्याजवर विश्वास न ठेविला? अथवा माणसांपासून जर आह्मी ह्मणूं, तर ते लोकांस भ्याले कारण योहान्न निश्चयें भविष्यभाषी होता असें सर्वांनीहि त्याला मानिलें होतें. तेव्हां ते उत्तर देतां येशूला ह्मणतात, आह्मांस कळलें नाहीं, नंतर येशू उत्तर देतां त्यांस ह्मणतो, मीहि कोणत्या अधिकाराने हीं करितों हें तुह्मांस सांगत नाहीं.

आणि तो त्यांस दाखल्यांकडून बोलूं लागला, कोणी एक माणसाला दोन पुत्र होते, आणि तो पहिल्याजवळ येऊन बोलला, मुला, आज तूं माझ्या द्राक्षमळ्यांत जाऊन काम कर. तेव्हां तो उत्तर देतां बोलला, माझी इच्छा नाहीं; तथापि तो मागून पश्चात्ताप पावून गेला. नंतर दुसऱ्याजवळ येऊन त्याने तसेंच म्हटलें; तेव्हां तो उत्तर देतां बोलला, प्रभू, मी जातों, तथापि तो गेला नाहीं. ह्या दोघांतून कोणत्याने बापाची इच्छा

पाळिली? ते त्याला बोलतात, पहिल्याने पाळिली. येशू त्यांस ह्मणतो, मी तुह्मास खचीत सांगतों कीं जकातदार आणि कळवांतिणी तुमच्या अगोदर देवाच्या राज्यांत जातात. यास्तव कीं योहान्न नीतिमत्ताच्या मार्गाने तुह्मा जवळ आला, तथापि तुह्मी त्याजवर विश्वास ठेविला नाहीं; परंतु जकातदार आणि कळवांतिणी ह्यांनी त्याज वर विश्वास ठेविला, तथापि तुह्मी हें पाहून त्याजवर विश्वास ठेवण्यासाठीं पश्चात्ताप बाळगिला नाहीं.

तुह्मी अणखी एक दृष्टांत ऐका, कोणी माणूस जो गृहपति होता, त्याने द्राक्षमळा लाविला, आणि कुंपण त्या भोंवतें घातलें, आणि त्यामध्यें द्राक्षरसाचें कुंड खणून केलें, आणि माळा बांधिला आणि त्या शेतकऱ्यांस सोपून परदेशास गेला. मग वेळेस शेतकऱ्यांनी त्याला द्राक्ष मळ्याचें कांहीं फळ द्यावें ह्मणून त्याने त्यांकडे चाकर पाठ विला. तेव्हां शेतकऱ्यांनी त्याला झोडून रिकामें बाहेर लाविलें. मग त्याने अणखी दुसऱ्या चाकराला पाठविलें, आणि त्यालाहि त्यांनी झोडतां व अपमान करितां रिकामें बाहेर लाविलें. मग त्याने अणखी तिसऱ्याला पाठविलें, आणि त्यांनी त्यालाहि घायाळ करून बाहेर घातलें. नंतर द्राक्षमळ्याचा धनी बोलला, मी काय करूं? माझ्या आवडत्या पुत्राला पाठवीन, निश्चयें त्याला पाहून भीड

मागतील. परंतु शेतकरी त्याला पाहून आपणांमीं विचार करून बोलले, हा वतनदार आहे, या, आपल्यांस वतन व्हावें ह्मणून याला जिवें मारूं; नंतर त्यांनी त्याला द्राक्ष मळ्याच्या बाहेर काढून जिवें मारिलें. तर द्राक्षमळ्याचा धनी त्यांस काय करील? तो येईल व त्या शेतकऱ्यांचा नाश करील आणि द्राक्षमळा दुसऱ्यांस देईल; तेव्हां ते ऐकून बोलले, असें नसावें. मग तो त्यांकडे न्याहाळून बोलला, तर जें लिहिलें हें काय आहे? बांधणाऱ्यांनी जो धोंडा अव्हेरिला तोच कोंपऱ्याचा शिरोभाग झाला आहे; हें प्रभुकडून घडलें आणि आमच्या दृष्टीस चमत्कारिक आहे, हें शास्त्र तुम्ही कधी न वाचिलें काय? यास्तव मी तुम्हास सांगतों कीं देवाचें राज्य तुह्मापासून घेतलें जाईल आणि जी प्रजा त्याची फळें देईल तिला दिलें जाईल; आणि जो ह्या धोंड्यावर पडतो तो ठेंचला जाईल, परंतु ज्या कोणावर हा पडेल त्याला भूगा करील. तेव्हां मुख्य उपाध्यानी व पंडितांनी जाणलें कीं आपणांवर त्याने हा दाखला सांगितला, यास्तव हे त्याच घटकेस आपले हात त्यावर टाकावयास झटले, परंतु लोकांला भ्याले.

तेव्हां येशू उत्तर देतां दाखल्यांनी पुन: त्यांस ह्मणाला कीं, आकाशांचें राज्य कोणीएक राजासारखें दाखविलें

आतें, जो त्यानें आपल्या पुत्रासाठीं लग्न केलें, आणि लग्ना साठीं ज्यांस आमंत्रण केलें होतें, त्यांस बोलावयास त्याने आपल्या चाकरांस पाठविलें; परंतु त्यानी यावयास मानिलें नाहीं. पुनः त्याने दुसऱ्या चाकरांस पाठवितांना म्हटलें, ज्यांस आमंत्रण केलें होतें त्यांस सांगा, पाहा, म्या आपलें जेवण सिद्ध केलें आहे, माझे बैल आणि पुष्ट पशू मारिले आहेत, आणि अवघीं सिद्ध आहेत, यास्तव तुह्मी या. परंतु तें उपेक्षा करून कोणी आपल्या शेताला आणि कोणी आपल्या व्यापाराकडे असे गेले, आणि जे राहिले त्यानी त्याच्या चाकरांस धरून गांजिलें आणि जिवें मारिलें. तेव्हां राजा ऐकून रागें भरला आणि आपली सैन्यें पाठवून त्या घातकांचा त्याने नाश केला, आणि त्यांचें नगर जाळिलें. मग तो आपल्या चाकरांस ह्मणतो, लग्न सिद्ध आहे खरें, परंतु ज्यांस आमंत्रण केलें होतें ते योग्य नाहींत; यास्तव मार्गाच्या चवाठ्यांवर जा, आणि जितके तुह्मास सांपडतील तितक्यांस लग्नास बोलावा. आणि ते चाकर मार्गांत बाहेर गेले, आणि जे वाईट किंवा बरे जितके त्यांस सांपडले त्या सर्वांस त्यानी एकवट केलें, मग बसणाऱ्यांकडून लग्नाची भरती झाली. तेव्हां राजाने बसणाऱ्यांस पाहावयास आंत येऊन तेथें लग्नाचें वस्त्र घातलेला नाहीं असा एका माणसाला पाहिलें. तेव्हां

त्याला बोलतो, हे सख्या, लग्नाचें वस्त्र न घेतां तूं एथे कसा आंत आलास? तेव्हां तो कुंठित झाला. तेव्हां राजाने चाकरांस म्हटलें, त्याचे पाय व हात बांधून त्याला न्या आणि बाहेरील अंधारांत टाका, तेथे रडणें आणि दांतांचें कडकडविणें होईल; यास्तव कीं बहुत बोलाविलेले परंतु थोडके निवडलेले आहेत.

## अध्याय ४२.

तेव्हां फारिसी जाऊन त्याला बोलण्यामध्यें पाशांत कसें पाडावें असा एक मताने विचार केला; आणि त्याने आपल्या शिष्यांस हेरोदाचे जे त्यांसुद्धां त्याकडे यासाठीं पाठविलें कीं, आपण त्याला सुभेदाराच्या सत्तेंत व अधिकारांत स्वाधीन करावयासाठीं त्याच्या बोलण्यांत धरावें. तेव्हां त्यांनी त्याला विचारिलें कीं, हे गुरू, आह्मास कळतें कीं तूं खरा आहेस आणि देवाचा मार्ग खरेपणाने शिकवितोस आणि कोणाविषयीं तुला काळजी नाहीं, कां कीं माणसांच्या तोंडाकडे तूं पाहत नाहीस; यास्तव तुला कसें दिसतें, हें आह्मास सांग, कैसरास पट्टी देणें हें योग्य आहे किंवा नाहीं? परंतु येशू त्यांचें वाईटपण जाणून बोलला, अहो ढोंगी, माझी परीक्षा कां पाहतां? पट्टीचा पैका मला दाखवा. तेव्हां त्यांनी त्याजवळ पावली आणिली. तेव्हां तो त्यांस म्हणतो, ही आकृति व पत्ता

कोणाची ? ते त्याला ह्मणतात, काइसाराची. त्यावर तो त्यांस ह्मणतो, तर जीं काइसाराचीं तीं काइसाराला, आणि जीं देवाचीं तीं देवाला द्या. तेव्हां ते लोकांसमक्ष त्याच्या बोलण्यांत त्यास धरावयास समर्थ न झाले, आणि त्याच्या उत्तरावरून आश्चर्य करितां उगेच राहिले, आणि त्याला सोडून तेथून गेले.

त्याच दिवशीं साद्दुकी जे मरणानंतर पुनरुठणें होणार नाहीं असें ह्मणतात, ते त्याजवळ आले, आणि त्यांनी त्यास पुसून म्हटलें, हे गुरू, मोश्याने सांगितलें कीं, जर कोणी आपल्यास लेंकरें नसतां मरेल, तर त्याच्या भावाने त्याच्या बायकोशीं लग्न करावें आणि आपल्या भावा साठीं संतति उत्पन्न करावी. तर आह्मामध्यें सात भाऊ होते, आणि पहिला लग्न करून मेला, आणि त्याला संतान नसतां त्याने आपली बायको आपल्या भावासाठीं ठेविली. दुसराहि आणि तिसरा सातव्यापर्यंत तसेंच मेले, आणि सर्वांच्या मागून बायकोहि मेली, यास्तव पुनरुठ ण्यांत ती त्या सातांतील कोणाची बायको होईल ? कां कीं त्या सर्वांचीहि ती होती. तेव्हां येशूने उत्तर देतां त्यांस ह्मटलें, तुह्मी लेखांस आणि देवाच्या शक्तीस न जाणून चुकतां ; ह्या जगाचीं संतानें वह्राडून घेतात आणि वह्राडून जातात. परंतु त्या जगाला व मेलेल्यांपासून पुनरुठण्याला

मिळवावयास जे योग्य मोजिले जातील ते वऱ्हाडून घेत नाहींत आणि वऱ्हाडून जातहि नाहींत; कारण कीं ते पुढें मरतहि शकत नाहींत, ते दूतांसमान आहेत म्हणून, आणि पुनरुठण्याचे पुत्र असतां देवाचे पुत्र आहेत. आणि मेलेले लोक उठतात त्यांविषयीं असें मोशाच्या ग्रंथांतील वाक्य तुम्ही वाचलें नाहीं कीं काय? तें असें कीं देवाने त्याला झुडपांतून असें म्हटलें कीं, मी आब्राहामाचा देव आणि इसहाकाचा देव आणि याकोबाचा देव आहें. तो मेलेल्या लोकांचा देव नव्हे तर जीवंत लोकांचा देव आहे या कारणास्तव तुह्मी फार भ्रांत झालां आहां.

तेव्हां त्याने सादुकी कुंठित केले, हें परूशी ऐकून एकवट मिळाले. तेव्हां त्यांमधील एक शास्त्री त्याची परीक्षा पाहतां त्याला विचारितांना बोलला, हे गुरु, सर्व आज्ञांतील पहिली आज्ञा कोणती? तेव्हां येशूने त्याला उत्तर केलें कीं, सर्व आज्ञांतील पहिली आज्ञा अशी ही आहे कीं हे इस्राएला तूं ऐक प्रभु आमचा देव आहे आणि प्रभु एकच आहे. आणि प्रभु जो तुझा देव आहे, त्यावर तूं आपल्या सर्व अंतःकरणाने आणि आपल्या सर्व जिवाने आणि आपल्या सर्व बुद्धीने आणि आपल्या सर्व सामर्थ्याने प्रीति कर, अशी ही पहिली आज्ञा आहे. आणि दुसरी तिच्यासारिखी आहे, ती अशी कीं, तूं जसा

आपल्यावर प्रीति करितोस तशी आपल्या शेजाऱ्यावर प्रीति कर; ह्या दोन आज्ञा तें संपूर्ण मरण व भविष्यवादी आप्लबून आहेत. तेव्हां तो मनुष्य त्याला बोलला कीं, हे गुरू बरें तूं खरेपणानें बोललास कारण कीं एक देव आहे आणि त्याशिवाय दुसरा नाहीं. आणि सर्व अंतःकरणानें आणि सर्व मनानें आणि सर्व जिवानें आणि सर्व सामर्थ्यानें त्यावर प्रीति करणें आणि जशी आपल्यावर प्रीति करणें तशी शेजाऱ्यावर करणें हें संपूर्ण होम आणि यज्ञ यांपेक्षां अधिक आहे, आणि त्यानें ज्ञानेकरून उत्तर केलें तें येशूनें पाहून त्याला म्हटलें कीं, तूं देवाच्या राज्यापासून दूर नाहींस.

आणि फारिशी मिळाले असतां येशू त्यांस विचारितां बोलला, ख्रीस्ताविषयीं तुम्हांस कसें दिसतें? तो कोणाचा पुत्र आहे? ते त्याला म्हणतात, दाविदाचा. तो त्यांस म्हणतो, तर दावीद आत्म्यानें त्याला प्रभु म्हणून कसें बोलतो, प्रभूनें माझ्या प्रभूला म्हटलें, मी तुझ्या वैऱ्यांस तुझ्या पायांचें आसन करीन तोंपर्यंत तूं माझ्या उजव्याकडे बैस. यास्तव जर दावीद त्याला प्रभु म्हणतो, तर तो त्याचा पुत्र कसा आहे? तेव्हां कोणाच्यानें त्याला एक शब्दाचें उत्तर देववलें नाहीं, आणि त्या दिवसापासून कोणी त्याला आणखी विचारायास धजला नाहीं

मिळवावयास जे योग्य मोजिले जातील ते वऱ्हाडून नेत नाहींत आणि वऱ्हाडून जातहि नाहींत; कारण कीं ते पुढें मरतहि सकत नाहींत, ते दूतांसमान आहेत म्हणून, आणि पुनरुठण्याचे पुत्र असतां देवाचे पुत्र आहेत. आणि मेलेले लोक उठतात त्यांविषयीं असें मोशाच्या ग्रंथांतील वाक्य तुम्ही वाचलें नाहीं कीं काय? तें असें कीं देवाने त्याला झुडपांतून असें म्हटलें कीं, मी आब्राहामाचा देव आणि इसाकाचा देव आणि याकोबाचा देव आहें. तो मेलेल्या लोकांचा देव नव्हे तर जीवंत लोकांचा देव आहे ह्या कारणास्तव तुम्ही फार भ्रांत झाला आहां.

तेव्हां त्याने साडुकी कुंठित केले, हें फारिशी ऐकून एकवट मिळाले. तेव्हां त्यांमधील एक शास्त्री त्याची परीक्षा पाहतां त्याला विचारितांना बोलला, हे गुरु, सर्व आज्ञांतील पहिली आज्ञा कोणती? तेव्हां येशूने त्याला उत्तर केलें कीं, सर्व आज्ञांतील पहिली आज्ञा अशी ही आहे कीं हे इस्राएला तूं ऐक प्रभु आमचा देव आहे आणि प्रभु एकच आहे. आणि प्रभु जो तुझा देव आहे, त्यावर तूं आपल्या सर्व अंतःकरणाने आणि आपल्या सर्व जिवाने आणि आपल्या सर्व बुद्धीने आणि आपल्या सर्व सामर्थ्याने प्रीति कर, अशी ही पहिली आज्ञा आहे. आणि दुसरी तिच्यासारिखी आहे, ती अशी कीं, तूं जसो

आपल्यावर प्रीति करितोस तशी आपल्या शेजाऱ्यावर प्रीति कर; ह्या दोन आज्ञा तें संपूर्ण शास्त्र व भविष्यवादी आकळून आहेत. तेव्हां तो शास्त्री त्याला बोलला कीं, हे गुरु बरें तूं खरेपणाने बोललास कारण कीं एक देव आहे आणि त्याशिवाय दुसरा नाहीं. आणि सर्व अंतःकरणाने आणि सर्व मनाने आणि सर्व जिवाने आणि सर्व सामर्थ्याने त्यावर प्रीति करणें आणि जशी आपल्यावर प्रीति करतो तशी शेजाऱ्या वर करणें हें संपूर्ण होम आणि यज्ञ यांपेक्षां अधिक आहे, आणि त्याने ज्ञानेकरून उत्तर केलें हें येशूने पाहून त्याला म्हटलें कीं, तूं देवाच्या राज्यापासून दूर नाहींस.

आणि फारिशी मिळाले असतां येशू त्यांस विचारितां बोलला, ख्रीस्ताविषयीं तुम्हास काय दिसतें? तो कोणाचा पुत्र आहे? ते त्याला म्हणतात, दाविदाचा. तो त्यांस म्हणतो, तर दावीद आत्म्याने त्याला प्रभु म्हणून कसें बोलतो, प्रभूने माझ्या प्रभूला म्हटलें, मी तुझ्या वैऱ्यांस तुझ्या पायांचें आसन करीन तोंपर्यंत तूं माझ्या उजव्याकडे बैस. म्हणून जर दावीद त्याला प्रभु म्हणतो, तर तो त्याचा पुत्र कसा आहे? तेव्हां कोणाच्याने त्याला एक शब्दाचें उत्तर देववलें नाहीं, आणि त्या दिवसापासून कोणी त्याला आणखी विचारायास धजला नाहीं

## अध्याय ४४.

तेव्हां येशू समुदायांस आणि आपल्या शिष्यांस बोलला कीं, पंडित व फारिशी मोशाच्या आसनावर बसले आहेत; यास्तव जें जें ते तुह्मास पाळावयास सांगत असतील, तीं अवघीं पाळा आणि करा, परंतु त्यांच्या कामांप्रमाणें करूं नका, कारण कीं ते बोलतात पण करीत नाहींत. अणखी ते भारी आणि वागवावयास अवघड असीं ओझीं बांधितात आणि माणसांच्या खांद्यांवर ठेवितात, परंतु ते आपल्या बोटाने त्यांस हालवावयास इच्छीत नाहींत. आणि माणसानी पाहावें ह्मणून ते आपलीं अवघीं कामें करितात, आणि आपल्या धर्माच्या खुणा विस्तीर्ण करितात, आणि आपल्या वस्त्रांचे कांठ मोठे करितात. अणखी जेवणांमध्यें मुख्य ओठंगणें आणि सभांमध्यें मुख्य आसनें आणि पेंठांमध्यें नमने घेणें आणि माणसानी, स्वामी, स्वामी, असें ह्मटलें जाणें, हीं त्यांस आवडतात. परंतु तुह्मी स्वामी ह्मटले जाऊं नका, यास्तव कीं एक जो खीस्त तो तुमचा स्वामी आहे, आणि तुह्मी सर्व भाऊ आहां. आणि पृथ्वीवर तुम्ही कोणाला आपला बाप ह्मणूं नका, यास्तव कीं एक जो आकाशामध्यें तो तुमचा बाप आहे. आणि तुह्मी स्वामी ह्मटले जाऊं नका, कारण कीं एक जो खीस्त तो तुमचा स्वामी आहे. परंतु जो

तुम्हामधील थोर तो तुमचा सेवक होईल, आणि जो कोणी आपणाला उंच करील तो नीच केला जाईल. आणि जो कोणी आपणाला नीच करील तो, उंच केला जाईल. अहो पंडित व फारिशी ढोंगी, तुम्हास हायहाय कां कीं तुम्ही विधवांचीं घरें खाऊन टाकितां, आणि मिषानें फार वेळांच्या प्रार्थना करितां, ह्यावरून तुम्ही अधिक दंड पावाल. आणि अहो पंडित व फारिशी ढोंगी तुम्हास हायहाय, कां कीं तुम्ही माणसांस आकाशांचें राज्य बंद करितां; यास्तव कीं तुम्ही आपण आंत जात नाहीं आणि जे आंत जात आहेत त्यांस आंत जाऊं देत नाहीं. अहो पंडित व फारिशी ढोंगी, तुम्हास हायहाय, कां कीं तुम्ही एक शिष्य मिळवावयासाठीं समुद्राला आणि कोरडवटीला घिरट्या घालितां, आणि जेव्हां तो शिष्य झाला आहे, तेव्हां त्यास तुमच्या दुप्पटीहून अधिक नरकाचा पुत्र करितां. अहो आंधळे वाटाडे, तुम्हास हाय हाय, जे तुम्ही म्हणतां, जर कोणी देवळावरून शपथ वाहातो तर तें कांहीं नाहीं, परंतु जर कोणी देवळांतील सोन्यावरून शपथ वाहातो तो ऋणी आहे. अहो मूर्ख आणि आंधळे, कारण कीं कोणतें मोठें, सोनें? किंवा जें देऊळ सोन्याला पवित्र करितें, तें? आणि जर कोणी वेदीवरून शपथ वाहातो तर ती कांहीं नाहीं,

परंतु तिजवर जें अर्पण त्यावरून जो कोणी शपथ वाहातो तो ऋणी होतो. अहो मूर्ख आणि आंधळे, कां कीं कोणतें मोठें, अर्पण? किंवा जी वेदी अर्पणाला पवित्र करिते ती? म्हणून जो वेदीवरून शपथ वाहातो, तो तिजवरून आणि जें तिजवर अवघें त्यांवरून शपथ वाहातो. आणि जो देवळावरून शपथ वाहातो, तो त्यावरून आणि त्यांतील राहणारा त्यावरून शपथ वाहातो. आणि जो आकाशांवरून शपथ वाहातो, तो देवाच्या राज्यासनावरून आणि त्याजवरील बसणारा त्यावरून शपथ वाहातो. अहो पंडित व फारिशी ढोंगी, तुम्हांस हाय हाय, कां कीं पुदिना व शोपा जिरे यांतून तुम्ही दाहावा भाग देतां; परंतु शास्त्रांतील जीं अधिक भारी, न्याय व दया व विश्वास, हीं तुम्ही सोडिलीं, हीं करावीं पाहिजेत होतीं आणि तीं सोडावयाचीं नव्हतीं. अहो आंधळे वाटाडे, जे तुम्ही मुर्कुटाला गाळितां, परंतु उंटाला गिळितां. अहो पंडित व फारिशी ढोंगी, तुम्हांस हायहाय याकरितां कीं वाटी व ताट यांस बाहेरून शुद्ध करितां, परंतु तीं आंत अपहाराने व अनियमाने भरलीं आहेत. अरे आंधळ्या फारिशा, वाटी व ताट यांस आंतून प्रथम शुद्ध कर, यासाठीं कीं त्यांचें बाहेरलहि शुद्ध व्हावें. अहो पंडित व फारिशी ढोंगी, तुम्हांस हायहाय, कां कीं तीं

चुना लावलेल्या थडग्यां बाहेरून सुंदर दिसतात खरें, परंतु आंतून मेलेल्यांच्या हाडांनीं व प्रत्येक अशुद्धपणानें भरलीं आहेत, त्यांसारिखे तुह्मी आहां. तसेंच तुह्मी बाहेरून माणसांस नीतिमान दिसतां खरे, परंतु आंतून ढोंगानें आणि अनियमानें भरले आहां. अहो पंडित व फारिशी ढोंगी, तुह्मांस हायहाय कां कीं तुह्मी भविष्यभाष्यांचीं थडगीं बांधितां आणि नीतिमानांचीं थडगीं शोभिवंत करितां; व म्हणतां, जर आह्मी आपल्या पितरांच्या दिवसांत असतों, तर त्यांचे भविष्यभाष्यांच्या रक्ताविषयीं भागीदार झालों नसतों; ह्याप्रमाणें तुह्मी आपल्यांविषयीं साक्ष देतां कीं, तुह्मी भविष्यभाष्यांच्या वधणाऱ्यांचे पुत्र आहां, तुह्मीहि आपल्या पितरांचें परिमाण पूर्ण करा. अहो साप, फुरस्यांचे उपजहो, नरकाच्या दंडापासून तुह्मी कसे चुकवाल? पाहा, मी ह्याकरितां तुह्माजवळ भविष्यभाष्यांस व ज्ञान्यांस व पंडितांस पाठवितों. आणि त्यांतील कित्येकांस तुह्मी जिवें माराल, आणि वधस्तंभीं घाल, आणि त्यांतील कित्येकांस तुमच्या सभांमध्यें फटके माराल, आणि नगरीनगरीं त्यांच्या पाठीस लागाल. ह्याप्रमाणें नीतिमान् हाबेल ह्याच्या रक्तापासून बरख्या ह्याचा पुत्र जखार्या ज्याला वेदीच्या व देवळाच्यामध्यें तुह्मी वधिलें, त्याच्या रक्तापर्यंत सर्व नीतिमंत रक्त जें पृथ्वीवर पाडिलें,

तें तुह्मावर यावें; मी तुह्मास खचीत सांगतों ह्या पिढीवर तीं अवघीं येतील. हे यरुशालेमा, यरुशालेमा, भविष्यभाष्यांस वधविणाऱ्या, आणि आपल्याजवळ पाठविलेले त्यांस धोंड्यानें मारणाऱ्या, जसें कोंबडी आपल्या पिलांस पांखाखालीं एकवट करिती, त्याप्रकारें तुझ्या लेंकरांस एकवट करावयास म्या कितीदां इच्छिलें आहे परंतु तुह्मी मानिलें नाहीं. पाहा, तुमची वस्ती तुह्मास ओसाड सोडली आहे, कारण कीं मी तुह्मास सांगतों, प्रभूच्या नामानें जो येतो तो धन्यवादित असें ह्मणाल, तेथपर्यंत तुह्मी आतां पासून मला पाहणार नव्हांस.

आणि येशूनें भांडारासमोर बसून लोक भांडारांत पैसा कसा टाकितो हें पाहिलें, आणि बहुत धनवानांनी फार टाकिलें; तेव्हां एक दरिद्री विधवेनें येऊन दोन दमड्या टाकिल्या ह्मणजे नासरी. मग तो आपल्या शिष्यांस जवळ बोलावून त्यांस ह्मणतो, मी तुह्मास खचीत सांगतों कीं ज्या सर्वांनी भांडारांत टाकिलें त्यांपेक्षां ह्या दरिद्री विधवेनें अधिक टाकिलें आहे; कारण कीं त्या सर्वांनी आपल्या भरपूरांतून टाकिलें आहे; परंतु हिनें आपल्या आबाळी पासून जितकीं आपलीं होतीं तीं आपलें सगळें उपजीवन टाकिलें आहे.

## अध्याय ४५.

मग तो देवळांतून जात असतां, त्याच्या शिष्यांतील एक त्याला बोलतो, हे गुरू, कशाचे धोंडे आणि कशाचीं रचणीं, पाहा. तेव्हां येशू उत्तर देतां, त्याला बोलला, तूं हीं मोठीं रचणीं पाहतोस कीं काय? असे दिवस येतील कीं त्यांत खालीं न पाडलेला असा धोंड्यावर धोंडा राहणार नाहीं. मग तो देवळाच्यासमोर जाईताच्या झाडांच्या डोंगरावर बसला असतां पेत्र आणि याकोब आणि योहान आणि आंद्रियास ह्यांनी त्याला एकांतीं विचारिलें कीं, हीं कार्यें केव्हां होतील आणि ज्या काळीं हीं सर्व कार्यें पूर्ण व्हावयाचीं आहेत त्या काळाची खूण कोणती हें आह्मास सांग. तेव्हां येशू त्यांस असें उत्तर करूं लागला कीं, कोणीएकाने तुम्हास न फसवावें ह्याविषयीं तुह्मी सावध राहा. कारण कीं मी ख्रीस्त आहें, असे बहुत माझ्या नामाने येऊन बोलतील, आणि बहुतांस फसविनील, आणि तो काळ जवळ आला आहे यास्तव तुह्मी त्यांच्यामागें जाऊं नका. आणि जेव्हां तुह्मी लढायांविषयीं आणि दंग्याविषयीं ऐकाल तेव्हां घाबरूं नका, कारण कीं हीं पहिल्याने झालीं पाहिजेत, परंतु तेव्हांच शेवट नाहीं. नंतर तो त्यांस बोलला कीं, राष्ट्रावर राष्ट्र आणि राज्यावर राज्य उठेल, आणि जागोजागीं मोठे भूमिकंप व दुकाळ व मऱ्या होतील, अणखी

आकाशांतून भयकारक व मोठे साक्षात्कार होतील; हीं क्लेशांचे प्रारंभ आहेत. परंतु ह्या सर्वांच्या अगोदर माझ्या नावासाठीं ते आपले हात तुह्मावर टाकितील, आणि तुह्मास राजे व अधिकारी यांच्यासमोर नेण्यावर सभा व बंदिशाळा यांत स्वाधीन करावयास पाठलाग करितील. तथापि हें तुमच्या साक्षीसाठीं प्राप्त होईल, यास्तव तुह्मी आपल्या हृदयांत ठेवा कीं उत्तर देण्यास पूर्वीं चिंतन न करावें; कां तर मी तुह्मास तोंड देईन आणि असें ज्ञान कीं त्याला तुमचे सर्व विरोधक उलटें ह्मणूं अथवा अडवूं शकणार नाहींत. आणि तेव्हां बहुत अडखळविले जातील; तेव्हां भाऊ भावाला आणि बाप लेंकराला मरणासाठीं परस्वाधीन करील, आणि लेंकरें आईबापांविरुद्ध उठ तील, आणि त्यांस जिवें मारवितील. आणि माझ्या नावासाठीं तुह्मी सर्वांकडून द्वेषलेले असत जाल, परंतु तुमच्या मस्तकाचा केंसहि नाश पावणारच नाहीं. आणि बहुत खोटे भविष्यभाषी उठतील आणि बहुतांस फसवितील, आणि अनियम वाढल्यामे बहुतांची प्रीति थंड होईल, परंतु जो शेवटपर्यंत टिकेल तोच रक्षिला जाईल. आणि अवघ्या राष्ट्रांस प्रमाण व्हावें ह्यासाठीं राज्याचें हें शुभवर्त्तमान संपूर्ण देशांत गाजविलें जाईल आणि तेव्हां शेवट होईल. यास्तव जें नाशक अमंगळपण दानीयेल भविष्यभाष्याच्याद्वारें

सांगितलें, तें पवित्र स्थानांत उभें राहतां जेव्हां तुम्ही पाहाल, वाचणारा ध्यानांत आणो, तेव्हां जे यहूद्यांत असतील, ते डोंगरावर पळोत. जो गच्चीवर असेल, तो आपल्या घरांतून कांहीं घेण्याकरितां न उतरो; आणि जो शेतांत असेल, तो आपलीं वस्त्रें घेण्याकरितां माघारा न फिरो; कां तर सर्व जीं लिहिलीं तीं पूर्ण होण्यास हे न्यायसूड घेण्याचे दिवस आहेत. तेव्हां त्या दिवसांत ज्या पोटाशीं आहेत आणि ज्या स्तन पाजितात त्यांस हायहाय. परंतु तुमचें पळणें हिंवाळ्यांत अथवा शाब्बाथांत न व्हावें ह्मणून प्रार्थना करा, कारण कीं जी उत्पत्ति देवानें उत्पन्न केली तिच्या प्रारंभापासून आतांपर्यंत जसें संकट झालें नाहीं, आणि यानंतर होणारच नाहीं, तसें ते दिवस होतील. आणि ते तरवारीच्या धारेनें पडतील आणि पाडाव केले असून सर्व प्रजांमध्यें नेले जातील; आणि परप्रजांचे काळ भर तील तोंपर्यंत यरूशालेम परप्रजांकडून तुडविलें जाईल. आणि ते दिवस न आंखडल्यास, कोणीच जण निभावणार नसता, परंतु निवडलेले जे त्यांच्यासाठीं ते दिवस आंखडले जातील. तेव्हां जर कोणी तुह्मांस ह्मणेल, पाहा, ख्रीस्त एथे आहे, किंवा तेथे आहे तर तुम्ही विश्वास धरूं नका, कारण कीं खोटे ख्रीस्त आणि खोटे भविष्यभाषी उठतील; आणि मोठीं चिन्हें व साक्षात्कार असे देतील कीं जर साधेल

तर निवडलेल्यांसहि ठकवितील. पाहा, म्या पूर्वीं तुह्माष सांगितलें आहे, यास्तव जर ते तुह्माष ह्मणतील, पाहा तो रानांत आहे, तर तुह्मी बाहेर जाऊं नका; पाहा तो एकांतांत आहे तर विश्वास धरूं नका. कारण कीं जशी वीज पूर्वेपासून येती आणि पश्चिमेपर्यंत प्रकाशती तशीच माणसाच्या पुत्राचें येणें होईल, यास्तव कीं जेथे प्रेत असेल तेथे राजगीध एकवट होतील. आणि तेव्हांच त्या दिवसांतील संकटामुळें सूर्य अंधकारमय केला जाईल आणि चंद्र आपला प्रकाश देणार नाहीं, आणि तारे आकाशांतून पडतील, आणि आकाशांतील सेना हालविली जाईल. आणि भूमिवर पेंचानें प्रजांचा संकोच होईल, जल जाण्यामुळें समुद्र गर्जतां, भयानें आणि जगावरी जें येणार त्यांची वाट पाहण्यानें माणसें जीव जातां, असें होतील, कां तर आकाशांतलीं सामर्थ्यें हालविलीं जातील. आणि तेव्हां मनुष्याच्या पुत्राचें चिन्ह आकाशामध्यें दिसेल, आणि तेव्हां देशाच्या सर्व जाती रडून पेटतील, आणि मनुष्याच्या पुत्राला पराक्रमानें व मोठ्या गौरवानें आकाशाच्या मेघांवर येतां पाहतील. आणि तो आपल्या दूतांस करण्याच्या मोठ्या आवाजानें पाठवील, आणि ते चार दिशांहून आकाशांच्या शेवटांपासून त्यांच्या दुसऱ्या शेवटां पर्यंत त्याच्या निवडलेल्यांस एकवट करितील. आणि

तीं होऊं लागत असतां तुम्ही उभे राहा आणि आपलीं डोकीं वर करा, यास्तव कीं तुमची सुटका जवळ येत आहे.

आतां अंजिराच्या झाडावरून दाखला घ्या; जेव्हां त्याची डाहाळी कोंवळीच आहे आणि पानांस उपजविती, तेव्हां उन्हाळा जवळ आहे, असें तुम्ही जाणतां. ह्याप्रमाणे जेव्हां तुम्ही हीं अवघीं पाहतां, तेव्हां देवाचें राज्य जवळ दारांशीच आहे, असें जाणा. मी तुम्हास खचीत म्हणतों, हीं सर्व पूर्ण होतात तोंपर्यंत ह्या पिढीची गति होणार नाहीं; आकाश व पृथ्वी जातील परंतु माझ्या गोष्टी जाणार नाहींत. तथापि त्या दिवसाविषयीं आणि त्या घटकेविषयीं कोणाला कळलें नाहीं. आकाशांतील दूतांसहि नाहीं, पुत्रासहि नाहीं, केवळ बापाला. आणि नोहाचे दिवस जसे होते तसेंहि माणसाच्या पुत्राचें येणें होईल. यास्तव कीं जसें जलप्रलयापूर्वींच्या दिवसांत नोहा नावेंत गेला, त्या दिवसापर्यंत ते जेवीत व पीत होते, लग्नकरून घेत व लग्नकरून देत होते, आणि जलप्रलयाने येऊन सर्वांस हरण केलें तोंपर्यंत ते समजले नाहींत, तसेंच माणसाच्या पुत्राचें येणें होईल. त्या वेळेस शेतांत दोघे होतील, एक घेतला जाईल आणि एक ठेविला जाईल. आणि तुमचीं हृदयें गुंगी व मद्य

तर निवडलेल्यांसहि ठकवितील. पाहा, म्या पूर्वीं तुह्मास सांगितलें आहे, यास्तव जर ते तुह्मास ह्मणतील, पाहा तो रानांत आहे, तर तुह्मी बाहेर जाऊं नका; पाहा तो एकांतांत आहे तर विश्वास धरूं नका. कारण कीं जशी वीज पूर्वेपासून येती आणि पश्चिमेपर्यंत प्रकाशती तशीच माणसाच्या पुत्राचें येणें होईल, यास्तव कीं जेथे प्रेत असेल तेथे राजगीध एकवट होतील. आणि तेव्हांच त्या दिवसांतील संकटासुद्धां सूर्य अंधकारमय केला जाईल आणि चंद्र आपला प्रकाश देणार नाहीं, आणि तारे आकाशांतून पडतील, आणि आकाशांतील सेना हालविली जाईल. आणि भूमिवर पेंचानें प्रजांचा संकोच होईल, जललाटासुद्धां समुद्र गर्जतां, भयानें आणि वसतीवटीवर जें येणार त्यांची वाट पाहण्यानें माणसें जीव जातां, असें होतील, कां तर आकाशांतलीं सामर्थ्यें हालविलीं जातील. आणि तेव्हां मनुष्याच्या पुत्राचें चिन्ह आकाशामध्यें दिसेल, आणि तेव्हां देशाच्या सर्व जाती रडून घेतील, आणि मनुष्याच्या पुत्राला पराक्रमानें व मोठ्या गौरवानें आकाशाच्या मेघांवर येतां पाहतील. आणि तो आपल्या दूतांस करण्याच्या मोठ्या आवाजानें पाठवील, आणि ते चार दिशांहून आकाशाच्या शेवटांपासून त्याच्या दुसऱ्या शेवटांपर्यंत त्याच्या निवडिलेल्यांस एकवट करितील. आणि

हीं होऊं लागत असतां तुह्मी उभे राहा आणि आपलीं शिरें वर करा, यास्तव कीं तुमची सुटका जवळ येत आहे.

आतां अंजिराच्या झाडावरून दाखला घ्या; जेव्हां त्याची डाहाळी कोंवळीच आहे आणि पानांस उपजविती, तेव्हां उन्हाळा जवळ आहे, असें तुह्मी जाणतां. त्याप्रमाणे जेव्हां तुह्मी हीं अवघीं पाहतां, तेव्हां देवाचें राज्य जवळ दारांशीच आहे, असें जाणा. मी तुह्मास खचीत ह्मणतों, हीं सर्व पूर्ण होतात तोंपर्यंत ह्या पिढीची गति होणार नाहीं; आकाश व पृथ्वी जातील परंतु माझ्या गोष्टी जाणार नाहींत. तथापि त्या दिवसाविषयीं आणि त्या घटकेविषयीं कोणाला कळतें नाहीं. आकाशांतील दूतांसहि नाहीं, पुत्रासहि नाहीं, केवळ बापाला. आणि नोहाचे दिवस जसे होते तसेंहि माणसाच्या पुत्राचें येणें होईल. यास्तव कीं जसें जलप्रलयापूर्वींच्या दिवसांत नोहा नावेंत गेला, त्या दिवसापर्यंत ते जेवीत व पीत होते, लग्नकरून घेत व लग्नकरून देत होते, आणि जलप्रलयाने येऊन सर्वांस हरण केलें तोंपर्यंत ते समजले नाहींत, तसेंच माणसाच्या पुत्राचें येणें होईल. त्या वेळेस शेतांत दोघे होतील, एक घेतला जाईल आणि एक ठेविला जाईल. आणि तुमचीं हृदयें गुंगी व मस्त

पान व संसारिक चिंतनें यांकडून कधीं जड न व्हावीं, आणि तो दिवस अकस्मात् तुह्मावर न यावा, ह्मणून आपणांत सावध व्हा, कारण कीं तो फांसासारिखा संपूर्ण भूमीच्या पाठीवरल्या सर्व राहणाऱ्यांवर येईल.

अध्याय ४६.

यास्तव तुह्मी जागे व्हा, कां कीं कोणत्या वार्णी तुमचा प्रभु येतो, हें तुह्मास कळलें नाहीं; परंतु हें तुह्मी जाणा कीं कोणत्या प्रहरीं चोर येतो, हें जर गृहपतीला कळलें असतें तर तो जागा राहिला असता आणि त्यानें आपलें घर फोडूं दिलें नसतें. ह्याकरितां तुह्मीहि सिद्ध व्हा, कां कीं ज्या तासीं तुह्मास वाटत नाहीं त्या तासीं मनुष्याचा पुत्र येतो. असें आहे कीं प्रवासकरी माणसानें आपलें घर सोडलें आणि आपल्या चाकरांस अधिकार व एकएकाला आपलें काम दिलें आणि द्वारपाळानें जागें राहावें ह्मणून त्याला आज्ञा दिली. तर ज्या चाकराला त्याच्या धन्यानें आपल्या परिवाराला वेळेस अन्न द्यावयास ठेविला, तो विश्वासू आणि बुद्धिमंत चाकर कोण आहे? जो चाकर असेंच करितां आपल्या धन्याला येऊन सांपडेल, तो धन्य आहे; मी तुह्मास खचीत सांगतों कीं त्याला तो आपल्या सर्व संपत्तीवर ठेवील. परंतु जर तो दुष्ट चाकर आपल्या मनांत ह्मणेल, माझा धनी येण्यास उशीर करितो,

आणि दुसऱ्या चाकरांस मारूं आणि झिंगलेल्यांबराबर खाऊं व पिऊं लागेल, तर ज्या दिवशीं तो वाट पाहत नाहीं त्या दिवशीं आणि जो तास तो जाणत नाहीं, त्या तासीं त्या चाकराचा धनी येईल आणि त्याला कापून विभागील आणि ढोंग्यांबराबर त्याला वांटा देईल, तेथे रडणें व दांतांचें कडकडविणें होईल. ह्मणून तुम्ही जागे राहा कारण कीं घराचा धनी केव्हां येईल सायंकाळीं किंवा मध्यरात्रीं किंवा कोंबडे आरडतात त्या वेळेस किंवा सकाळीं येईल हें तुम्हास कळत नाहीं. तुह्मी जागे राहिलां नाहीं तर तो अकस्मात् येऊन तुह्मी झोंपेंत आहां असें पाहील. आणि तुम्ही जागे राहा ह्मणून जें मी सांगतों हें मी सर्व लोकांस सांगतों.

तेव्हां दाहा कुमारींची उपमा आकाशांच्या राज्याला दिल्ही जाईल, ज्या त्या आपल्या मशाली घेऊन वराच्या भेटीसाठीं बाहेर गेल्या, आणि त्यांमधील पांच बुद्धीमंत व पांच मूर्ख होत्या. ज्या मूर्ख त्यांनी आपल्या मशाली घेऊन आपणांबराबर तेल घेतलें नाहीं, परंतु बुद्धिमंतीनी आपल्या मशालीबराबर आपल्या भांड्यांत तेल घेतलें, आणि वर उशीर करीत असतां, त्या सर्वांस डुकल्या आल्या आणि झोंप लागली. तेव्हां मध्यरात्रीं हाक झाली, पाहा, वर येतो आहे, त्याच्या भेटीस बाहेर चला, मग त्या सर्व

कुमारी उठल्या आणि त्यांनी आपल्या मशाली नीट केल्या. तेव्हां मूर्खांनी बुद्धिमंतींस ह्मटलें, तुमच्या तेलांतून आह्मांस द्या, कां कीं आमच्या मशाली विझाल्या आहेत. परंतु बुद्धिमंत कुमारी उत्तर देतां बोलल्या, कदाचित् आह्मांस आणि तुह्मांस न पुरेल, तर त्यापेक्षां विकणाऱ्यांजवळ जा आणि आपणांकरितां विकत घ्या. मग त्या विकत घ्यावयास गेल्या असतां वर आला, आणि ज्या सिद्ध होत्या त्या त्याच्याबराबर लग्नास आंत गेल्या, मग द्वार लाविलें गेलें. नंतर त्या दुसऱ्या कुमारी मागून येऊन ह्मणतात, हे प्रभू प्रभू, आह्मासाठीं उघड; परंतु त्यानें उत्तर देतां ह्मटलें, मी तुह्मांस खचीत सांगतों त्या तुह्माला ओळखितें नाहीं. यास्तव तुह्मी जागे व्हा, कां कीं दिवस आणि घटकाहि तीं तुह्मांस कळलीं नाहींत.

कारण कीं ह्या प्रकारें आहे, प्रवासास जात्या माणसानें आपल्या चाकरांस बोलाविलें आणि आपल्या संपत्ति त्यांस सोपिल्या. आणि त्यानें एकाला तर पांच मण पैका, आणि एकाला दोन, आणि एकाला एक; प्रत्येकाला त्याच्या शक्तीप्रमाणें असें दिलें, आणि तो तेव्हांच प्रवासास गेला, मग ज्यानें पांच मण पैका घेतला त्यानें जाऊन त्यांकडून व्यापार केला आणि दुसरे पांच मण मिळविले, तसेंच ज्यानें दोन घेतले त्यानेंहि दुसरे दोन मिळविले. परंतु

ज्याने एक घेतला त्याने जाऊन भूमींत खणिलें आणि आपल्या धन्याचें रुपें लपविलें. आणि बहुत काळानंतर त्या चाकरांचा धनी येतो आणि त्यांचा हिशेब घेतो ; तेव्हां ज्याने पांच मण पैका घेतला तो जवळ आल्यावर अणखी पांच मण सादर करून बोलला, हे प्रभू त्वां मला पांच मण पैका सोंपिला, पाहा म्या त्यांवर अणखी पांच मण मिळविले आहेत. तेव्हां त्याचा धनी बोलला, बरें, हे उत्तम आणि विश्वासू चाकरा; तूं थोडक्यांवर विश्वासू झालास, मी तुला बहुतांवर ठेवीन, तूं आपल्या धन्याचें सुख भोगावयास आंत ये. आणि ज्याने दोन मण पैका घेतला तोहि जवळ येऊन बोलला, हे प्रभू त्वां मला दोन मण सोंपिले, पाहा म्या त्यांवर अणखी दोन मण मिळविले आहेत. तेव्हां धनी त्याला बोलला, बरें, हे उत्तम आणि विश्वासू चाकर, तूं थोडक्यांवर विश्वासू-झालास, मी तुला बहुतांवर ठेवीन, तूं आपल्या धन्याचें सुख भोगावयास आंत ये. मग ज्याने एक मण पैका घेतला तो जवळ येऊन बोलला, हे प्रभू जेथे त्वां पेरिलें नाहीं तेथे कापणारा, आणि जेथे विखरिलें नाहीं तेथून गोळा करणारा आहेस, असा कठोर माणूस म्या तुला जाणिलें; आणि म्या भितांना जाऊन भूमींत तुझा मण पैका लपविला, पाहा जें तुझें तें तुला दिलें आहे. तेव्हां

त्याचा धनी उत्तर देतां त्याला बोलला, दुष्टा आणि आळशी चाकरा, जेथें म्या पेरिलें नाहीं तेथून मी कापितों आणि जेथें म्या विखरिलें नाहीं तेथून गोळा करितों, हें तुला कळलें होतें; तर त्वां माझें रुपें सावकारांजवळ ठेविलें पाहिजे होतें, मग म्या येऊन जें माझें तें व्याजा सुद्धां घेतलें असतें. यास्तव तो मण पैका त्यापासून घ्या आणि ज्याला दाहा मण आहेत त्याला द्या; कां कीं ज्या कोणाला आहे त्याला दिल्हें जाईल, आणि त्याला अधिक होत जाईल, परंतु ज्याला नाहीं त्यापासून जें त्याचें आहे तें घेतलें जाईल, आणि त्या निरुपयोगी चाकराला बाहेरील अंधारांत टाका, तेथें रडणें आणि दांतांचें करकरविणें होईल.

## अध्याय ४७.

आणि जेव्हां मनुष्याचा पुत्र आपल्या गौरवानें येईल आणि त्याबराबर सर्व पवित्र दूत येतील, तेव्हां तो आपल्या गौरवाच्या राजासनावर बसेल, आणि त्याच्यासमोर अवघीं राष्ट्रें एकवट केलीं जातील, आणि ज्या प्रकारें मेंढक्या मेंढरांपासून मेंढ्रांस वेगळें करितो, त्याप्रकारें तो त्यांस एकमेकापासून वेगळें करील; तेव्हां मेंढ्रांस तर आपल्या उजव्याकडे आणि मेंढरांस डाव्याकडे ठेवील. तेव्हां राजा आपल्या उजव्याकडल्यांस म्हणेल, अहो माझ्या बापाचें

आशीर्वादित, तुह्मी या जें राज्य जगाच्या मांडण्यापासून तुह्माकरितां सिद्ध केलेलें त्याचें वतन घ्या. कारण कीं मी भुकेला होतों, तेव्हां तुह्मी मला खावयास दिलें; मी तान्हेला होतों, तेव्हां तुह्मी मला पाजिलें; मी विदेशी होतों, तेव्हां तुह्मी मला अंगीकारून घेतलें; उघडा होतों, तेव्हां तुह्मी मला पांघरविलें; मी रोगी होतों, तेव्हां तुह्मी माझी भेट घेतली; बंदिशाळेंत होतों, तेव्हां तुह्मी माझ्याजवळ आलां. नंतर नीतिमान् त्याला उत्तर देतां ह्मणतील, हे प्रभू, आह्मी केव्हां तुला भुकेला पाहिला आणि पोसिलें? किंवा तान्हेला पाहिला आणि पाजिलें? आणि केव्हां तुला विदेशी पाहिला आणि अंगीकारून घेतलें? अथवा उघडा पाहिला आणि पांघरविलें? आणि तुला रोगी अथवा बंदिशाळेंत केव्हां पाहिला आणि तुझ्याजवळ आलों? मग राजा उत्तर देतां त्यांस ह्मणेल, मी तुह्मास खचीत सांगतों कीं ह्या माझ्या भावांतील फारच जे लाहान त्यांतून एकाला जित क्यावरून तुह्मी असें केलें तितक्यावरून मला केलें आहे. मग डाव्याकडल्यांसहि तो बोलेल, अहो शापग्रस्तहो, जो सर्वकाळाचा अग्नि सैतानासाठीं आणि त्याच्या दूतांसाठीं सिद्ध केलेला, त्यांत मजपासून जा. कारण कीं मी भुकेला होतों, परंतु तुह्मी मला खावयास दिलें नाहीं;

मी तान्हेला होतों, परंतु तुम्ही मला पाजिलें नाहीं; मी विदेशी होतों, परंतु तुम्ही मला अंगीकारिलें नाहीं; उघडा होतों, परंतु तुम्ही मला पांघरविलें नाहीं; रोगी आणि बंदिशाळेंत होतों; परंतु तुम्ही माझी भेट घेतली नाहीं. मंतर तेहि त्याला उत्तर देतां म्हणतील, हे प्रभू, आम्ही तुला केव्हां भुकेला, अथवा तान्हेला, अथवा विदेशी, अथवा उघडा, अथवा रोगी, अथवा बंदिशाळेंत पाहिलें, आणि तुझी सेवा केली नाहीं? तेव्हां तो त्यांस उत्तर देतां म्हणेल, मी तुम्हांस खचीत सांगतों, जितक्यांवरून तुम्ही ह्या फारच लाहानांतील एकाला हें केलें नाहीं, तितक्यांवरून मलाहि केलें नाहीं. आणि हे सर्वकाळाच्या शासनांत जातील, परंतु नीतिमान् सर्वकाळाच्या जीवनांत जातील. तेव्हां दिवसांत तो देवळांत उपदेशीत होता, आणि रात्रीस बाहेर जाऊन जैतांच्या म्हटलेल्या डोंगरावर राहिला; आणि मोठ्या सकाळीं त्याचें ऐकावयास सर्व लोक त्याजवळ देवळांत आले.

आणि येशूनें ह्या सर्व गोष्टी संपविल्या, मग असें झालें कीं त्यानें आपल्या शिष्यांस म्हटलें, तुम्हांस कळतें कीं दोन दिवसांनंतर वल्हांडण सण होत आहे आणि मनुष्याचा पुत्र वधस्तंभीं दिल्हा जाण्याकरितां परस्वाधीन केला जाता.

तेव्हां कायाफा ह्मटलेला जो मुख्य उपाध्या त्याच्या वाड्यांत मुख्य उपाध्या व पंडित आणि लोकांचे वडिल एकवट झाले, आणि त्यांनी येशूला कपटाने धरावें व जिवें मारावें, ह्मणून एकवट विचार मांडिला; परंतु लोकांमध्यें गडबड न व्हावी ह्मणून सणांत नसावें, असें त्यांनी ह्मटलें.

तेव्हां येशू बेथानींत शिमोन जो कोढी त्याच्या घरीं असतां, त्यांनी तेथें त्याच्यासाठीं जेवण केलें. तेव्हां मार्था सेवा करीत होती, परंतु लाजारस त्याच्या संगतीं बसणा त्यांतील एक होता. मारयेने तर फार मोलवान् खरा नरद याचें सुगंध तेल शेरभर घेऊन येशूच्या पायांस चर्चिलें, आणि आपल्या केंसांनी त्याचे पाय पुसले; तेव्हां सुगंध तेलाच्या वासाने घर भरलें. परंतु त्याचे शिष्य पाहून जळफळले, यास्तव त्यांतील एक शिमोनाचा पुत्र यहूदा इस्कारयोंत जो त्याला परस्वाधीन करणार होता, तो ह्मणतो, हें सुगंध तेल तीनशें पावल्यांस कशासाठीं विकून दरिद्र्यांस न दिल्हें? तथापि त्याला दरिद्र्यांविषयीं चिंता होती यासाठीं असें ह्मटलें हें नव्हे, परंतु तो चोर होता आणि त्याच्याजवळ कसणी होती, आणि तींत जें ठेविलें तें तो वाहात होता यास्तव यावर येशू बोलला, तिला असूं दे तिने माझ्या उत्तरकार्याच्या दिवसासाठीं हें राखिलें आहे. दरिद्री तर सर्वदा तुह्माजवळ आहेत परंतु मी

सर्वदा तुह्माजवळ नाहीं; हिच्याने जें होववलें तें हिने केलें आहे, उत्तरकार्यासाठीं माझ्या शरिराचें लेपणें पूर्वीं धरिलें आहे. मी तुह्मास खचीत ह्मणतों, सगळ्या पृथ्वींत जेथे जेथे हें शुभवर्तमान गाजविलें जाईल, तेथे तेथे हिने जें केलें हेंहि हिच्या आठवणीसाठीं सांगितलें जाईल.

नंतर यहूदा जो आडनावाने इस्कारयोते म्हटलेला, तो ते बारा यांच्या गणतींतील असतां त्यांत सैतान शिरला. मग तो बाहेर गेला असतां मुख्य उपाध्ये व सरदार यांच्या स्वाधीन त्याला कसें करावें, याविषयीं त्यांसीं बोलला, मला काय देणार ह्मणजे मी त्याला तुमच्या स्वाधीन करीन? मग त्यानी त्यासीं तीस रुपये ठरविले. तेव्हां त्याने पत्करिलें आणि समुदायाविरहित त्याला त्यांच्या स्वाधीन करण्याची संधि शोधिली.

## अध्याय ४८.

आणि बेखमीर भाकरीच्या प्रथम दिवसीं त्यांत वल्हांडण सणबळ मारली पाहिजे होती; मग शिष्य येशूजवळ येऊन त्याला बोलले, तुजसाठीं वल्हांडणाच्या जेवणास आह्मी कोठे सिद्ध करावें ह्मणून इच्छितोस? आणि पेत्रस व योहान यांस तो पाठवीत असतां बोलला, तुह्मी नगरांत जा मग पाण्याची घागर भरून घेऊन आणारा असा एक माणूस तुह्मास भेटेल त्याच्या मागें तुह्मी जा. आणि तो ज्या

कोणत्या घरांत जाईल त्या घराच्या धन्याला तुह्मी असें ह्मणा कीं, गुरु असें ह्मणतो कीं, म्या आपल्या शिष्यांसह वर्तमान उल्लंघनसणसंबंधी भोजन करावें असी उतरावयाची जागा कोठें आहे. मग तो तुह्मास साहित्यासुद्धां सिद्ध असी एक मोठी माडी दाखवील, तेथें तुह्मी आह्माकरितां भोजन सिद्ध करा. नंतर त्याचे शिष्य निघून नगरांत आले आणि जसें ह्याने त्यांस सांगितलें होतें तसें त्यांस प्राप्त झालें, आणि त्यांनी उल्लंघनसणसंबंधी भोजन सिद्ध केलें.

तेव्हां सायंकाळ झाल्यावर येशू त्या बारांबराबर जेवायास बसला; तेव्हां ह्या जगांतून पलिकडे बापाजवळ जावें ह्मणून आपली वेळ आली, हें वल्हांडणाच्या सणापूर्वीं त्याला कळलें असतां, त्याने जगांतल्या आपल्यांवर प्रीति करून शेवटापर्यंत त्यांवर प्रीति केली. तेव्हां तो त्यांस बोलला, माझ्या सोसण्यापूर्वीं ह्या वल्हांडणाचें तुह्मांबराबर जेवायास म्या आसावण्याने इच्छिलें आहे; कारण मीं तुह्मास सांगतों कीं देवाच्या राज्यांत हा पूर्ण केला होईल तोंपर्यंत याचें मी अणखी जेवणारच नाहीं. आणि जेवण होत असतां, आपल्यांतील कोण श्रेष्ठ होऊं दिसतो असी त्यांमध्यें कटकट झाली. आणि बापाने अवघीं येशूच्या हातीं दिल्हीं, हें आणि तो देवापासून आला व देवाजवळ

जातो, हें त्याला कळलें असतां, तो जेवणावरून उठून आपलीं वस्त्रें ठेवितो. मग त्याने फडका घेऊन आपणाला वेष्टिलें, नंतर तो गंगाळांत पाणी घालून शिष्यांचे पाय धुवूं व ज्या फडक्याने वेष्टिला होता त्याकडून पुसूं लागला. तर शिमोनपेत्रसाजवळ येतो, मग हा त्याला ह्मणतो, हे प्रभू, तूं माझे पाय धुतोस? येशूने उत्तर देण्याने त्याला बोलला, जें मी करितों तें आतां तुला कळलें नाहीं, परंतु यानंतर तूं जाणसील. पेत्रस त्याला ह्मणतो, कधींहि माझे पाय तूं धुणार नाहींस. येशूने त्याला उत्तर दिलें, जर मी तुला धुणार नाहीं तर माझ्यासहित तुला वांटा नाहीं. शिमोनपेत्रस त्याला म्हणतो, हे प्रभू, माझे पाय केवळ नव्हे परंतु हात व डोकेंहि. येशू त्याला म्हणतो, ज्याची आंघोळ झाली, त्याला पाय धुण्याहून अणखी अगत्य नाहीं, तो सर्वांगी निर्मळ आहे. आणि तुह्मी निर्मळ आहां, परंतु सर्व नाहीं; कारण कीं त्याचा परस्वाधीन करणारा त्याला कळला यास्तव तो बोलला, तुम्ही सर्व निर्मळ नाहीं. त्याने तर त्यांचे पाय धुतले आणि मग आपलीं वस्त्रें घेऊन फिरून जेवायास बसतां त्यांस म्हटलें, म्या तुह्मास काय केलें तें तुम्ही समजतां? परप्रजांचे राजे त्यांवर धनीपणा करितात, आणि जे त्यांवर अधिकार करितात

ते सुकर्मी ह्मटले आहेत. परंतु तुम्ही त्याप्रमाणें होऊं नका, वेगळें, तुह्मामध्यें जो श्रेष्ठ तो धाकट्यासारिखा, आणि जो चालविणारा तो सेवकासारिखा होवो. तुम्ही मला गुरू व प्रभु अशी हाक मारितां, आणि ठीक ह्मणतां कारण कीं मी तसा आहें; यास्तव जो प्रभु व गुरू त्या म्या जर तुमचे पाय धुतले, तर तुह्मीहि एकमेकांचे पाय धुण्यास बांधले आहां, कारण कीं जसें म्या तुह्मास केलें तसें तुम्हीहि करावें ह्मणून म्या तुम्हास उदाहरण दिलें आहे. मी तुह्मास खचीत सांगतों, चाकर आपल्या प्रभुपेक्षां थोर नाहीं; हीं जर तुह्मास कळलीं तर तुह्मी हीं केल्यास धन्य आहां.

आणि जे माझें सत्व पारखण्यांत माझ्या संगतीं राहिले ते तुह्मी आहां; आणि जसें माझ्या बापानें मला राज्य नेमून दिलें, तसें मी तुह्मास नेमून देतों कीं तुह्मी माझ्या राज्या मध्यें माझ्या अडणीवरून खावें व प्यावें आणि इस्राएलाच्या बारा वंशांचा न्याय ठरवितां सिंहासनांवर बसाल. तुम्हा सगळ्यांविषयीं मी बोलत नाहीं, ज्यांस म्या निवडिलें ते मला कळले, परंतु यासाठीं कीं हा धर्मलेख पूर्ण व्हावा, माझ्याजवळ जो भाकर खातो त्यानें माझ्याविरुद्ध आपली टांच उचलिली आहे. हें झाल्यापूर्वीं मी आतां तुम्हास यासाठीं सांगतों कीं, जेव्हां होत असतें तेव्हां तुम्ही विश्वा

सावें कीं मी तो आहें. मी तुम्हास खचीत खचीत सांगतों कीं ज्या कोणाला मी पाठवितों त्याला जो अंगीकारितो तो मला अंगीकारितो आणि जो मला अंगीकारितो तो माझ्या पाठविणाऱ्याला अंगीकारितो.

## अध्याय ४९.

येशू हें बोलून तितक्यांत सावखसाने शिमोनाचा यहूदा ईस्कारयोतें याच्या हृदयांत त्याला परस्वाधीन करावयास घातलें असतां, आत्म्यांत घाबरला आणि प्रमाण पुरवितांना बोलला, मी तुम्हास खचीत खचीत सांगतों कीं तुम्हामधील एक मला परस्वाधीन करील. यास्तव तो कोणाविषयीं बोलतो याचा संशय शिष्यांस असतां, त्यांनी एकमेकांस पाहिलें. तेव्हां ते फार खिन्न होऊन त्यांतून प्रत्येक त्याला म्हणूं लागले, हे प्रभू, तो मी आहें कीं काय? तेव्हां त्याच्या शिष्यांमधील एक ज्यावर येशूने प्रीति केली, तो येशूच्या उरासीं टेंकत होता; यास्तव ज्याविषयीं तो बोलतो तो कोण असेल हें पुसावें, म्हणून शिमोनपेत्रसाने त्याला खुणाविलें. तेव्हां तो येशूच्या उरासीं टेंकत असतां त्याला म्हणतो, हे प्रभू, तो कोण आहे? येशूने उत्तर दिलें कीं, मी तुकडा बुचकळून ज्याला देईन तोच तो आहे. मनुष्याच्या पुत्राविषयीं जसें लिहिलें आहे तसें तो जातो खरें, परंतु ज्या माणसाने मनुष्याचा पुत्र परस्वाधीन केला जातो

त्याला हाय हाय; जर तो माणूस जन्मला नसता तर तें त्याला बरें होतें. मग तुकडा बुचकळून शिमोनाचा यहूदा इस्कारियोते याला दिल्हा, आणि तुकड्यामागून शैतान त्यांत शिरला; यास्तव येशू त्याला ह्मणतो, जें तूं करितोस तें लवकर कर. तेव्हां त्याने कशास्तव असें सांगितलें, हें बसणाऱ्यांमधील कोणी समजला नाहीं, कारण कीं यहूदा जवळ कसणी होती; यास्तव सणासाठीं आह्मास ज्यांचें अगत्य आहे तीं विकत घे, किंवा दरिद्र्यांस कांहीं द्यावें, ह्मणून येशू त्यास सांगतो, असें कित्येकांस वाटलें; तर तुकडा घेऊन तो तेव्हांच बाहेर गेला आणि रात्र होती.

यावर तो बाहेर गेल्यानंतर येशू ह्मणतो, आतां माणसाचा पुत्र गौरविला आणि त्याकडून देव गौरविला आहे; जर देव त्याकडून गौरविला आतो तर देव स्वतां त्यालाहि गौरवील, आणि तो त्याला वेगें गौरवील. अहो धाकटीं मुलें, मी आतांपासून थोडा वेळ तुमच्या संगतीं आहें; तुह्मी मला शोधाल आणि जसें म्या यहूद्यांस सांगितलें कीं, जेथे मी जातों तेथे तुह्मी येऊं न शकतां, तसें तुह्मासहि आतां सांगतों. तुह्मास नवी आज्ञा देतों कीं तुह्मी एकमेकांवर प्रीति करा, कीं जशी म्या तुह्मावर प्रीति केली तशी तुह्मीहि एकमेकांवर प्रीति करा; तुमची जर

नवा करारार्चे माझें रक्त, जें बहुतांकरितां पापांच्या क्षमेसाठीं ओतिलें, तें हें आहे. मी तुम्हास खचीत ह्मणतों कीं जेव्हां मी आपल्या बापाच्या राज्यांत तुह्मावरावर तो नवा पिईन त्या दिवसापर्यंत द्राक्षवेलाचा हा उपज आतांपासून पिणार नाहींच; तेव्हां ते सर्व त्यांतून प्याले.

मग येशू बोलला, तुमचें हृदय न घाबरो, तुम्ही देवावर विश्वास ठेवा, मजवरहि विश्वास ठेवा; माझ्या बापाच्या घरांत बहुत वासस्थानें आहेत, आणि जर नसतीं तर म्या तुह्मास सांगितलें असतें. मी तुम्हासाठीं जागा सिद्ध करावयास जातों, आणि जर मी जातों व तुह्मासाठीं जागा सिद्ध करितों तर मी फिरून येतों, आणि जेथें मी आहें तेथें तुम्हीहि व्हावें ह्मणून आपल्याजवळ तुम्हास घेईन आणि मी कोठे जातों हें तुह्मास कळलें, वाटहि तुह्मास कळली. थोमा त्याला ह्मणतो, हे प्रभू, तूं कोठे जातोस हें आम्हास कळलें नाहीं, मग वाट आह्मास कशी कळू येती? येशू त्याला ह्मणतो, मी वाट व सत्यता व जीवन आहें, मजकडून आल्यावांचून कोणी बापापाशीं येत नाहीं. जर तुम्ही मला जाणलें असतें, तर माझ्या बापाला जाणलें असतें, आणि आतांपासून तुम्ही त्याला जाणतां आणि त्याला पाहिलें आहे. फिलीप्पस त्याला ह्मणतो, हे प्रभू, बाप आह्मास दाखीव ह्मणजे आह्मास पुरें. येशू

त्याला ह्मणतो, हे फिलोप्पसा, मी इतका काळ तुम्हा जवळ असतांना त्वां मला न जाणलें काय? ज्याने मला पाहिलें त्याने बापाला पाहिलें आहे, मग बाप आह्मास दाखीव हें तूं कसें ह्मणतोस? मी बापांत व बाप माझ्यांत आहे याचा विश्वास न धरितोस काय? मी ज्या गोष्टी तुह्मास सांगतों त्या आपल्या आपण न बोलतों, परंतु बाप जो माझ्यांत राहतो तो त्या क्रिया करितो, मी बापांत आणि माझ्यांत बाप, असा मजवर विश्वास ठेवा; नाहीं तर त्या क्रियांवरून मजवर विश्वास ठेवा. तुम्हास खचीत खचीत सांगतों, मी ज्या क्रिया करितों त्या मजवर विश्वासणारा तोहि करील आणि त्यांहून मोठ्या करील यास्तव कीं मी बापाकडे जातों. जें कांहीं माझ्या नावानें मागाल तें यासाठीं करीन कीं बाप पुत्राकडून गौरविला जावा. जर माझ्या नावाने कांहीं मागाल तर मी करीन, जर तुह्मी मजवर प्रीति करितां तर माझ्या आज्ञा पाळा, मग मी बापाला विनंती करीन आणि तो तुह्मास दुसरा संबोधक तुह्माजवळ सर्वकाळपर्यंत राहावयास देईल. हा सत्यतेचा आत्मा आहे, याला जग घेऊं न शकतें, कां कीं तें त्याला पाहत नाहीं आणि त्याला जाणत नाहीं; परंतु तुम्ही त्याला जाणतां, कां तर तो तुम्हाजवळ राहतो आणि तुह्मामध्यें होईल. मी तुह्मास अनाथ

घेडणार नाहीं, तुह्माजवळ येतों; आतांपासून थोडक्या काळाने जग मला भणखी पाहत नाहीं परंतु तुह्मी मला पाहतां. मी वांचतों यास्तव तुह्मीहि वांचाल ; त्या दिवशीं तुह्मी जाणाल कीं मी आपल्या बापामध्यें आणि तुह्मी मजमध्यें आणि मी तुह्मामध्यें आहें. जो माझ्या आज्ञा पावतो व त्यांस पाळितो, तोच मजवर प्रीति करणारा आहे, आणि जो मजवर प्रीति करितो तो माझ्या बापा कडून प्रीति पावेल मीहि त्यावर प्रीति करीन आणि आप णाला त्याजवळ प्रगट करीन.

यहूदा जो इस्कारयोते नव्हे तो त्याला ह्मणतो, हे प्रभू, काय झालें ह्मणून तूं आपणाला आह्माजवळ प्रगट करणार आहेस परंतु जगाजवळ नाहींस? येशू उत्तर देण्याने त्याला बोलला, जर कोणी मजवर प्रीति करितो तर तो माझी गोष्ट पाळील; मग माझा बाप त्याजवर प्रीति करील आणि आम्ही त्याकडे येऊं व त्याजवळ वस्ती करूं. जो मजवर प्रीति करीत नाहीं तो माझ्या गोष्टी पाळीत नाहीं; आणि जी गोष्ट तुह्मी ऐकतां ती माझी नव्हे परंतु बाप ज्याने मला पाठविलें त्याची. मी तुम्हाजवळ राहतांना हीं तुह्मास बोललों आहें, परंतु संबोधक जो पवित्र आत्मा ज्याला बाप माझ्या नावाने पाठवील तो तुम्हास सर्व शिकवील, आणि जीं म्या तुम्हास सांगितलीं

त्या सर्वांची आठवण तुम्हास देईल. मी तुम्हाशीं शांति ठेवितों, माझी शांति तुह्मास देतों, जसें जग देतें तसें मी तुम्हास देत नाहीं. तुमचें हृदय न घाबरो आणि न कचो; म्या जें तुह्मास ह्मटलें तें तुह्मी ऐकिलें कीं मी जातों, मग तुह्माकडे येतों. जर तुम्ही मजवर प्रीति केली असती, तर मी बापाकडे जातों हें ह्मटल्यावरून तुह्मी आनंद केला असतां, कां तर माझा बाप मजपेक्षां थोर आहे. आणि जेव्हां हें होत असतें तेव्हां तुह्मी विश्वास धरावा ह्मणून ह्माच्याअगोदर म्या आतां तुम्हास सांगितलें आहे. आतां पासून मी तुम्हाशीं बहुत बोलणार नाहीं, कारण कीं या जगाचा अधिकारी येतो आणि मजकडे त्याचें कांहीं नाहीं; परंतु तें यासाठीं कीं जगानें असें जाणावें मी बापा वर प्रीति करितों, आणि जशी बापानें मला आज्ञा दिल्ही तसेंच करितों, उठा, आपण एथून जाऊं.

मग येशूनें आपल्या शिष्यांस सांगितलें कीं, मी खरा द्राक्षवेल आहें आणि माझा बाप शेतकरी आहे; मज मध्यें प्रत्येक फांटा जो फळ देत नाहीं त्याला तो काढितो, आणि प्रत्येक जो फळ देतो त्यानें अधिक फळ द्यावें ह्मणून तो त्याला शुद्ध करितो. जी गोष्ट म्या तुह्मास सांगितली तिजकडून तुह्मी आतां शुद्ध आहां. मजमध्यें राहा, मग मी तुम्हामध्यें राहीन, जसा फांटा वेलांत राहिल्यावांचून

आपल्या आपण फळ द्यावयास शक्तिमान् नाहीं, तसें तुह्मीहि मजमध्यें राहिल्यावांचून शक्तिमान् नाहीं. मी वेल आहें, तुह्मी फांटे आहां; जो मजमध्यें राहतो मीहि त्यामध्यें असतां तोच बहुत फळ देतो, कां तर मजवांचून तुह्मी कांहीं करूं न शकतां. जर कोणी मजमध्यें न राहतो तर तो फांट्यासारिखा बाहेर टाकिला जातो आणि वाळतो; मग त्यांस गोळा करितात आणि अग्नीमध्यें टाकितात, असें ते जाळले जातात. जर तुह्मी मजमध्यें राहतां आणि माझ्या गोष्टी तुह्मामध्यें राहतात, तर जें जें तुह्मी इच्छितां तें तें मागाल आणि तुह्मास प्राप्त होईल, यांत माझा बाप गौरविला जातो कीं तुह्मी बहुत फळ द्यावें, मग माझे शिष्य व्हाल. जसी बापानें मजवर प्रीति केली तसी म्याहि तुह्मावर प्रीति केली आहे; माझ्या प्रीतींत राहा. जर माझ्या आज्ञा पाळाल तर जसा म्या आपल्या बापाच्या आज्ञा पाळिल्या आणि त्याच्या प्रीतींत राहतों, तसें माझ्या प्रीतींत राहा. तुह्मावर माझा आनंद राहावा आणि तुमचा आनंद पूर्ण व्हावा, म्हणून म्या तुम्हास हीं सांगितलीं आहेत. माझी आज्ञा ही आहे कीं, जसी म्या तुह्मावर प्रीति केली त्याप्रमाणे तुह्मी एकमेकांवर प्रीति करा. कोणाची याहून मोठी प्रीति नाहीं कीं कोणी आपल्या मित्रांकरितां आपला प्राण द्यावा; मी तुह्मास

जितक्या आज्ञा देतों त्याप्रमाणें जर तुम्ही करितां तर माझे मित्र आहां. आतांपासून मी तुम्हास चाकर म्हणत नाहीं, कां तर जें आपला प्रभु करितो तें चाकराला ठाऊक नाहीं, परंतु म्या तुम्हास मित्र म्हटलें, कां कीं जें जें म्या आपल्या बापापासून ऐकिलें तें तुम्हास कळविलें आहेत. तुम्ही मला निवडिलें नाहीं परंतु म्या यासाठीं तुम्हास निवडिलें आणि तुम्हास नेमिलें कीं तुम्ही निघून बहुत फळ द्यावें आणि तुमचें फळ राहावें; यासाठीं कीं तुम्ही जें कांहीं माझ्या नावानें बापापासीं मागाल तें त्यानें तुम्हास द्यावें. तुम्ही एकमेकांवर प्रीति धरावी म्हणून मी तुम्हास ह्या आज्ञा देतों; जरी जग तुम्हास द्वेषितें तरी त्यापूर्वीं त्यानें मला द्वेषिलें आहे, हें तुम्ही जाणतां. जर तुम्ही जगाचे असतां तर जगानें आपलें जें यावर प्रीति केली असती, परंतु याकारणें कीं तुम्ही जगाचे नव्हां, पण म्या तुम्हास जगांतून निवडिलें आहे, ह्यासाठीं जग तुमचा द्वेष करितें. चाकर आपल्या प्रभुहून थोर नव्हे, अशी जी गोष्ट म्या तुम्हास सांगितली तिची आठवण करा. जर ते माझ्या पाठीस लागले तर तुमच्याहि पाठीस लागतील; जर त्यांनी माझी गोष्ट पाळिली तर तुमचीहि पाळितील. परंतु ज्यानें मला पाठविलें तो त्यांस कळला नाहीं, यास्तव ते माझ्या नावाकरितां तीं सर्व तुम्हास करितील. जर मी

आलों नसतों आणि त्यांस बोललों नसतों, तर त्यांस पाप नसतें, परंतु आतां त्यांस आपल्या पापांविषयीं निमित्त नाहीं. जो मला द्वेषितो तो माझ्या बापालाहि द्वेषितो; जीं कामें कोणी दुसऱ्यानें केलीं नाहींत, तीं जर म्या त्यांमध्यें केलीं नसतीं तर त्यांस पाप नसतें, परंतु आतां त्यांनी मला व माझ्या बापालाहि पाहिलें आणि द्वेषिलें आहे. तथापि हें यासाठीं कीं त्यांच्या शास्त्रांत लिहिलेली गोष्ट कीं, त्यांनी उगाच माझा द्वेष केला, ही पूर्ण व्हावी. परंतु ज्या संबोधकाला मी बापापासून तुह्माजवळ पाठवीन तो सत्यतेचा आत्मा जो बापापासून निघतो, तो जेव्हां येईल तेव्हां तोच मजविषयीं साक्ष देईल; आणि तुह्मी पहिल्यापासून माझ्याजवळ आहां, यास्तव तुह्मीहि साक्ष द्याल.

तुह्मी न अडखळावें ह्मणून मी तुह्मास हीं बोललों; ते तुह्मास सभेबाहेर करितील, अणखी अशी वेळ येत आहे कीं जो कोणी तुमचा जीव घेतो तो देवाला सेवा अर्पितो असें त्याला वाटेल. आणि ते बापाला व मलाहि जाणत नाहींत, यास्तव हीं तुह्मास करितील. परंतु मी यासाठीं तुह्मास हीं बोललों कीं जेव्हां ती वेळ येईल, तेव्हां तुह्मी हीं आठवावीं कीं म्या तुह्मास सांगितलीं. आणि मी तुह्माजवळ होतों याकरितां म्या तुह्मास पहिल्यापासून

हीं सांगितलीं नाहींत, परंतु आतां ज्याने मला पाठविलें त्याजवळ मी जातों, आणि कोठे जातोस असें तुह्मामधील कोणी मला पुसत नाहीं. तथापि म्या तुम्हास हीं सांगितलीं यावरून तुमचें हृदय खेदाने भरलें आहे, परंतु जें खरें तें मी तुह्मास सांगतों. म्या जावें हें तुम्हास उपयोगी आहे, कारण कीं जर मी जात नाहीं तर संबोधक तुह्माजवळ येणार नाहीं; परंतु जर मी जातों तर त्याला तुह्माकडे पाठवीन. आणि तो येऊन पापाविषयीं व पुण्याविषयीं व न्याय ठरविण्याविषयीं जगाच्या पदरीं घालील; पापाविषयीं तर यासाठीं कीं ते मजवर विश्वास ठेवीत नाहींत, आणि पुण्याविषयीं यासाठीं कीं मी बापाजवळ जातों आणि पुढें तुह्मी मला न पाहाल, आणि न्याय ठरविण्याविषयीं यासाठीं कीं ह्या जगाच्या अधिकाऱ्याचा न्याय ठरविला जातो. अद्याप मला तुह्मासीं बहुत सांगावयाचीं आहेत, परंतु आतां तुमच्याने तीं सोसवत नाहींत. तथापि जो सत्य तेचा आत्मा तोच जेव्हां येईल तेव्हां तो तुह्मास वाटेने सर्व सत्यतेंत नेईल; कारण कीं तो आपल्या आपण बोलणार नाहीं, परंतु जितकीं ऐकेल तितकीं बोलेल, आणि जीं होणार तीं तुह्मास निवेदील. जें माझें त्यांतून तो घेईल आणि तुम्हास निवेदील, यास्तव माझें गौरव करील. जीं जीं बापाचीं आहेत तीं सर्व माझीं आहेत,

तुला अगत्य नाहीं, यावरून आम्ही विश्वास धरितों कीं तूं देवापासून निघालास. येशूनें त्यांस असें उत्तर दिलें, आतां तुम्ही विश्वास धरितां कीं काय? पाहा, अशी वेळ येती आणि आतां आलीच कीं प्रत्येक तुम्ही आपल्या आपल्या कडे पांगले जाल आणि मला एकलें सोडाल; तथापि बाप माझ्याजवळ आहे, यास्तव मी एकला नाहीं. मज मधून तुमचें समाधान व्हावें म्हणून हीं तुम्हास बोललों आहें, जगामधून तुम्हास संकट होईल, परंतु धीर धरा, म्या जगाला जिंकलें आहे.

येशू हीं बोलला मग आपली दृष्टि वर्ती आकाशा कडे लावून म्हणाला, हे बापा, घटका आली, तुझ्या पुत्राचें गौरव यासाठीं कर कीं तुझा पुत्रहि तुझें गौरव करील. जसा त्वां त्याला सर्व मानवजातीवर अधिकार दिल्हा त्या अर्थी त्याने सर्वकाळ जीवन द्यावें; आणि हें सर्व कालिक जीवन आहे कीं, जो केवळ खरा देव त्या तुला, आणि ज्या येशू ख्रीस्ताला त्वां पाठविलें, त्याला त्यांनी जाणावें. पृथ्वीवर म्या तुझें गौरव केलें आहे; त्वां जें काम मला करावयास दिलें तें म्या संपविलें आहे, आणि हे बापा, जग होण्यापूर्वीं तुझ्याजवळ जें गौरव माझें होतें, त्याकडून तूं आतां आपणाजवळ माझें गौरव कर. जगांतून जी माणसें त्वां मला दिलीं त्यांस म्या

तुझें नाव हाकविलें आहे; तुझीं होतीं आणि त्वां तीं मला दिल्हीं आणि त्यानी तुझी गोष्ट पाळिली आहे. आतां तीं समजलीं कीं जितकीं त्वां मला दिल्हीं तीं सर्वें तुझ्या जवळील आहेत, कां तर ज्या गोष्टी त्वां मला दिल्ह्या त्या म्या त्यांस दिल्ह्या आहेत आणि त्यानी घेतल्या. आणि मी तुझ्या जवळून निघालों असें त्यानी खरें जाणलें आणि त्वां मला पाठविलें, हा विश्वास त्यानी धरिला आहे. त्यांच्यासाठीं मी विनंती करितों, मी जगासाठीं विनंती करीत नाहीं, परंतु जीं त्वां मला दिल्हीं त्यांसाठीं, कां तर तीं तुझीं आहेत. आणि जीं माझीं तीं सर्व तुझीं, व तुझीं तीं माझीं आहेत, आणि त्यांकडून माझें गौरव केलें आहे. आणि आतांपासून मी जगांत नाहीं, परंतु हे जगांत आहेत, आणि मी तुजकडे येतों; हे पवित्र बापा, त्वां जे मला दिल्हे, ते आम्हासारिखे एक व्हावयास तुझ्या नावानें त्यांस राख. जोंपर्यंत मी जगांत त्यांच्याजवळ होतों तोंपर्यंत म्या त्यांस तुझ्या नावानें राखिलें; त्वां जे मला दिल्हे त्यांस म्या पाळिलें आहे, आणि त्यांमधील कोणी नाश न पावला, जो नाशाचा पुत्र तो मात्र, कारण कीं धर्मलेख पूर्ण व्हावा. परंतु आतां मी तुजकडे येतों आणि त्यांमध्यें माझा आनंद पूर्ण होऊन [illegible] त्यांस व्हावें म्हणून मी जगांत हीं बोलतों, [illegible]

तुझी गोष्ट त्यांस दिल्ही आहे आणि जगाने यामुळें त्यांस देखिलें कीं जसा मी जगाचा नाहीं तसे ते जगाचे नाहींत. त्वां त्यांस जगांतून काढावें ह्मणून मी न मागतों, परंतु असें कीं त्वां त्यांस त्या दुष्टापासून राखावें. जसा मी जगाचा नाहीं तसे ते जगाचे नाहींत, तूं आपल्या सत्यतेने त्यांस पवित्र कर; तुझी जी गोष्ट ती सत्यता आहे. जसें त्वां मला जगांत पाठविलें तसें म्याहि त्यांस जगांत पाठविलें आहे, आणि तेहि सत्यतेने पवित्र व्हावे ह्मणून मी त्यांच्या साठीं आपणाला पवित्र करितों. मी ह्यांच्यासाठीं केवळ नव्हे, परंतु ह्यांच्या गोष्टींवरून जे मजवर विश्वास ठेवितील, त्यांच्यासाठींहि मागतों कीं ते सर्व एक व्हावे. हे बापा, असें कीं जसें तूं मजमध्यें व मी तुजमध्यें तसें तेहि आह्मामध्यें एक व्हावे यासाठीं कीं त्वां मला पाठविलें, असा जगाने विश्वास धरावा. आणि त्वां जें गौरव मला दिल्हें तें म्या त्यांस यासाठीं दिल्हें कीं जसें आह्मी एक आहों, तसें त्यानी एक व्हावें, मी त्यांमध्यें आणि तूं मजमध्यें, असें कीं त्यानी एकरूप सिद्ध केले जावें, आणि असें कीं जगाने जाणावें कीं त्वां मला पाठविलें; आणि जसी मजवर प्रीति केली तसी त्यांवर प्रीति केली आहे. हे बापा, मी असें इच्छितों कीं जेथे मी आहें तेथे त्वां जे मला दिल्हे त्यानीहि मजपाशीं यासाठीं व्हावें कीं माझें

गौरव जें त्वां मला दिलें त्याचा त्यानी पाहावें; कां तर जगाचा पाया घातल्यापूर्वी त्वां मजवर प्रीति केली. हे यथार्थिक बापा, जगाने तर तुला जाणलें नाहीं परंतु म्या तुला जाणलें आहे, आणि त्वां मला पाठविलें असें त्यानी जाणलें आहे. आणि म्या तुझें नाव त्यांस कळविलें आहे आणि कळवीन, यासाठीं कीं ज्या प्रीतिने त्वां मजवर प्रीति केली ती त्यांमध्यें व्हावी आणि म्या त्यामध्यें व्हावें.

## अध्याय ५१.

नंतर ते स्तुति गाऊन केंद्रोन ओहोळाच्या पलिकडे जाईतझाडांच्या डोंगरास बाहेर गेले; तेव्हां येशू त्यांस राबर गेथसेमाने म्हटलेल्या जागेस येतो, तेथे मळा होता त्यांत तो आणि त्याचे शिष्य गेले. नंतर शिष्यांस ह्मणतो, मी तेथे जाऊन प्रार्थना करीं तोंपर्यंत तुम्ही एथे बसा. मग तो पेत्रसाला आणि जेबेदीच्या दोन पुत्रांस जवळ घेऊन खिन्न आणि कासावीस होऊं लागला. तेव्हां तो त्यांस ह्मणतो, माझा जीव मरायाजोगा एवढा फार खिन्न आहे, तुम्ही एथे राहा आणि मजबराबर जागे असा. मग तो किंचित् पुढें जाऊन पालथा पडून प्रार्थना करितांना बोलला, हे माझ्या बापा, जर साधेल तर हा प्याला मजपासून जावो, तथापि मी इच्छितों तसें नको, परंतु

तूं इच्छितोस तसें होवो. मग तो प्रार्थनेंतून उठून आपल्या शिष्यांजवळ येऊन त्यांस दुःखास्तव नीज घेतां पावला,

मग तो शिष्यांजवळ येता आणि ते झोंपेंत आहेत असें त्याला सांपडतें; तेव्हां तो पेत्राला ह्मणतो, असेंच एक घटकाहि माझ्याजवळ राहावयाचें तुह्मी शकत नाहीं काय? तुह्मी परीक्षेंत न यावें म्हणून जागे राहा आणि प्रार्थना करा, आत्मा मान्य, खरें; परंतु मांस अशक्त आहे. फिरून तो दुसऱ्याने जाऊन प्रार्थना करून बोलला, हे माझ्या बापा, हा प्याला म्या प्याल्यावांचून मजपासून जावत नाहीं, तर तुझी इच्छा होवो. मग त्याने येऊन ते झोंपेंत आहेत असें दुसऱ्याने सांपडतें, यास्तव कीं त्यांचे डोळे जड झाले होते आणि त्याला काय उत्तर द्यावें हें ते न समजले. नंतर त्याने त्यांस सोडून फिरून जाऊन तिसऱ्याने तीच गोष्ट बोलत प्रार्थना केली; तेव्हां आकाशां तून दूत त्याला सबळ करितां दिसला. तेव्हां प्रयासांत होऊन त्याने अधिक आग्रहाने प्रार्थना केली आणि त्याचा घाम रक्ताचीं जळमटें भूमीवर पडतां त्यांसारिखा झाला. तेव्हां तो आपल्या शिष्यांजवळ येतो आणि त्यांस ह्मणतो, अणखी निजा आणि विसांवा घ्या, पाहा घटका जवळ आली आहे आणि मनुष्याचा पुत्र पाप्यांच्या हातांत दिल्हा

आतो. उठा, आपण जावें, पाहा, जो मला परस्वाधीन करितो तो जवळ आला आहे.

आणि असें तो बोलतो आहे, पाहा त्या बारांमधील एक जो यहूदा तो आला, आणि त्यासुद्धां मुख्य उपाध्ये व लोकांचे वडील ह्यांपासून मोठा समुदाय तरवारी व सोटे घेऊन आला. यास्तव येशू सर्व जीं आपणावर येत होतीं तीं जाणत असतां बाहेर जाऊन त्यांस बोलला, तुह्मी कोणाला शोधितां? त्यानी त्याला उत्तर दिल्हें कीं, येशू जो नाजोरेकर त्याला. येशू त्यांस बोलतो, मी तोच आहें. आणि यहूदा जो त्याचा परस्वाधीन करणारा, तोहि त्यांसहित उभा होता. तर मी तोच आहे, हें तो त्यांस बोलतांच, ते मागें सरकून भूमीवर पडले. यास्तव त्याने त्यांस फिरून पुसलें, तुह्मी कोणाला शोधितां? तेव्हां ते बोलले, येशू जो नाजोरी त्याला. येशूने उत्तर दिल्हें कीं, मी तोच आहें, हें म्या तुह्मास सांगितलें आहे, यास्तव जर तुह्मी मला शोधितां तर यांस जाऊं द्या. तेव्हां जो त्याला परस्वाधीन करणारा तो त्यांस ह्मूण ठरवून बोलला, ज्याला मी चुंबन देईन तोच तो आहे त्याला धरा; आणि तेव्हांच त्याने येशूच्याजवळ येऊन ह्मटलें, हे स्वामी, सुखरूप ऐस, आणि त्याला चुंबन दिल्हें. तेव्हां येशूने त्याला ह्मटलें, हे यहूदा, तूं चुंब

मानें माणसाच्या पुत्राला परस्वाधीन करितोस कीं काय? यावर पतक व हजारांचा सरदार व यहूद्यांतील हस्तक यानी येशूला धरिलें आणि त्याला बांधिलें.

आणि त्याकडले जे ते काय होणार हें जाणून त्याला बोलले, हे प्रभू, आह्मी तरवारीनें मारूं कीं काय? यावर शिमोनपेत्रसाजवळ तरवार असतां त्यानें ती उपसली आणि मुख्य उपाध्याच्या चाकराला हाणल्यानें त्याचा उजवा कान कापून टाकिला, आणि त्या चाकराचें नाव मालख होतें. यास्तव येशू पेत्रसाला बोलला, तुझी तरवार म्यानांत घाल, यास्तव कीं सव जे तरवार धरितात ते तरवारीनें नाश पावतील. मी आपल्या बापाजवळ आतां मागेन तर तो दूतांच्या बारा सैन्यगणाहून अधिक माझ्याजवळ ठेवील, असा मी शक्तिमान् नाहीं असें तुला वाटतें कीं काय? तर ज्या लेखांमध्यें असें झालें पाहिजे, हें लिहिलें आहे, ते कसे पूर्ण होतील? आणि त्याच्या कानाला शिवून त्याला बरें केलें. तेव्हां येशू आपणावर जे मुख्य उपाध्ये आणि देवळाचे सरदार आणि पुरातन आले त्यांस बोलला, तुह्मी जसें लुटाऱ्यावर तसें तरवारी व सोटे घेऊन बाहेर आलां कीं काय? मी प्रति दिवशीं तुमच्यासंगतीं देवळांत असतां तुह्मी मजवर हात लांबविले नव्हते, परंतु ही तुमची घटका आणि

अंधाराचा अमल आहे. तेव्हां सर्व शिष्य त्याला सोडून पळाले, तथापि कोणीएक नग्न तरुण पुरुष होता तो आंगावर तागाचा बारीक शेला पांघरून त्याच्या मागें जात होता परंतु शिपायांनी त्याला धरिलें. मग तो तो शेला टाकून त्यांपासून नग्नच पळाला.

मग त्याला हान्नानाच्याजवळ पहिलें नेलें, कारण कीं कायाफा जो त्या वर्षांत मुख्य उपाध्या होता, त्याचा तो सासरा होता, आणि ह्या कायाफानें यहूद्यांस बोध केला कीं, लोकांकरितां एक माणसानें मरावें हें उपयोगी आहे, तो हा होता. त्यावर हान्नानानें तो बांधलेला असतां कायाफा जो मुख्य उपाध्या त्याजवळ पाठविला. तेव्हां शिमोनपेत्रस व दुसरा शिष्य येशूच्या मागें चालले, आणि तोच शिष्य मुख्य उपाध्याला माहीत असतांना येशूच्यासंगतीं मुख्य उपाध्याच्या वाड्यांत गेला, परंतु पेत्रस दरवाज्याशीं बाहेर उभा राहिला. यास्तव तो दुसरा शिष्य जो मुख्य उपाध्याला माहीत होता, तो बाहेर आला आणि द्वारपाळीला बोलून पेत्रसाला आंत नेलें. तेव्हां हींव होतें, यास्तव चाकर व सेवक कोळशांचा विस्तव करून उभे असतां शेकत होते, आणि पेत्रस आंत जाऊन परिणाम पाहावयास चाकरांबरोबर बसला. तेव्हां पेत्रस खालीं वाड्यांत असतां ती तरुणी द्वारपाळी पेत्रसाला

ऐकतां पाहून त्याला म्हाहाकून बोलती, त्या माणसाच्या शिष्यांतील तूंहि आहेस कीं नाहींस? परंतु तो नका रितां बोलला, मला माहीत नाहीं, आणि तूं काय म्हण तोस हें मी समजत नाहीं; मग तो आंगणांत बाहेर गेला आणि कोंबडा आरवला. मग ती दासी दुसरेदां त्याला पाहून जवळ उभ्या राहणाऱ्यांस बोलूं लागली कीं, हाय त्यांमधील आहे; तेव्हां त्याने फिरून नकारिलें. आणि सुमारें एक घोरा इच्या अंतराने जवळ उभे राह णारे पेत्रसाला अणखी बोलले, तूं त्यांमधील आहेस खरें, कारण तूं गालीली आहेस आणि तुझी बोलीहि तशी आहे. तेव्हां तो शापूं आणि शपथ वाहूं लागला कीं, ज्याविषयीं तुह्मी ह्मणतां हा माणूस मला माहीत नाहीं. आणि तो तेथपर्यंत बोलत असतां कोंबडा दुसऱ्याने आर वला; मग प्रभूने मुरडून पेत्रसावर दृष्टि लाविली. तेव्हां येशूने पेत्रसाला जी गोष्ट ह्मटली होती कीं, कोंबडा दोनदां आरवण्यापूर्वी तूं मला तीनदां नकारून टाकशील, ही वाचा आठवली; तेव्हां तो बाहेर जाऊन कडूपणाने रडला.

## अध्याय ५२.

तेव्हां मुख्य उपाध्याने येशूला याच्या शिष्यांविषयीं आणि याच्या उपदेशाविषयीं विचारिलें. येशूने त्याला उत्तर दिलें कीं, मी जगास उघडें बोललों; सभेंत व

देवळांत जेथें यहूदी सर्वदा मिळतात तेथें त्या सर्वकाळ शिकविलें आहे, आणि गुप्तांत कांहीं म्हटलें नाहीं, मला कां विचारितोस? मी ऐकणाऱ्यांस काय बोललों तें त्यांस विचार; पाहा मीं बोललों तीं त्यांस ठाऊक आहेत. आणि तो हीं बोलत असतां हलकांतील एक जवळ उभा असतां येशूला चपडाक देऊन बोलला, तूं मुख्य उपाध्याला असें उत्तर करितोस काय? येशूनें त्याला उत्तर दिल्हें कीं, जर मी वाईट बोललों तर त्या वाईटाविषयींची साक्ष दे, परंतु जर बरें, तर मला कां मारितोस? आणि दिवस उगवला असतां लोकांचा पुरातनवर्ग मुख्य उपाध्येहि आणि पंडित मिळाले, मग त्यांनीं त्याला आपल्या न्यायसभेंत नेलें. तेव्हां मुख्य याजकांनीं आणि सर्व न्यायसभेच्या लोकांनीं येशूला जिवें माराव्याकरितां त्याला विपरीत असी साक्ष मिळावयाचा शोध केला परंतु त्यांस मिळाली नाहीं. कारण कीं बहुत लोकांनीं त्याला विपरीत असी खोटी साक्ष दिल्ही परंतु ती साक्ष कार्यापुरती झाली नाहीं. तेव्हां कित्येक लोक उठून त्याला विपरीत असी खोटी साक्ष देऊं लागले कीं, आम्ही त्याला असें बोलतांना ऐकिलें कीं हें हाताने बांधलेलें देवालय मी मोडून टाकीन आणि तीन दिवसांमध्यें हाताने बांधल्याशिवाय असें दुसरें सिद्ध करीन. परंतु हीहि त्यांनीं दिल्हेली साक्ष

साक्षीपुरती झाली नाहीं. तेव्हां प्रमुख याजकाने मध्यें उभा राहून येशूला असें विचारिलें कीं, तूं कांहीं उत्तर करीत नाहींस कीं काय? हे तुझा विपरीत असी साक्ष कसी देतात? तथापि तो उगाच राहिला आणि त्याने कांहीं एक उत्तर केलें नाहीं. फिरून मुख्य उपाध्याने त्याला विचारितांना त्याला म्हणतो, जीवंत देवाची मी तुला शपथ घालितों कीं, तूं जो ख्रीस्त तो देवाचा पुत्र आहेस कीं नाहींस हें मां आम्हास सांगावें. येशू त्याला म्हणतो, मी आहें, आणि तुम्ही मनुष्याच्या पुत्राला सामर्थ्याच्या उजवेकडे बसलेला आणि आकाशाच्या ढगां मध्यें येतां पाहाल. तेव्हां ते सर्व बोलले, तर तूं देवाचा पुत्र आहेस काय? मग तो त्यांस बोलला, तुम्ही म्हणतां तसा मी आहें. तेव्हां मुख्य उपाध्या आपलीं वस्त्रें फाडून बोलला कीं, त्याने दुर्भाषण केलें आहे; आम्हास अणखी साक्ष्यांचें अगत्य काय? पाहा, तुम्ही आतां त्याचें दुर्भाषण ऐकिलें आहे, तुम्हास कसें वाटतें? तेव्हां त्यांनी उत्तर देतां म्हटलें, हा मरावयास दोषी. तेव्हां जीं माणसें येशूला राखीत होतीं, त्यांनी त्याची थट्टा करून फटके मारिले. मग कितीयेक त्याजवर थुंकूं आणि त्याचें तोंड झांकूं आणि त्याला बुक्के मारूं आणि त्याला बोलूं लागले, अरे ख्रीस्ता, आम्हास भविष्य सांग, तुला कोणी मारिलें?

नंतर सकाळ झाल्यावर सर्व मुख्य उपाध्ये आणि लोकांचे वडील ह्यांनी येशूला वधावें, ह्मणून त्याविरुद्ध एकत्र होऊन विचार मांडिला. आणि त्यांनी त्याला बांधून कायाफाजवळून कचेरींत आणिलें, आणि पंतयस पिलात नामें जो सुभेदार त्याच्या स्वाधीन त्याला केलें. आणि त्यांस विटाळ न व्हावा परंतु वल्हांडणाचें जेवावें ह्मणून ते कचेरींत न गेले; यास्तव पिलातस त्यांच्याजवळ बाहेर येऊन बोलला, तुह्मी ह्या माणसावर काय आरोप लावितां? तेव्हां ते उत्तर देण्याने त्याला बोलले, जर तो वाईट करणारा नसता तर आह्मी त्याला तुह्मा स्वाधीन केलें नसतें. यावर पिलातस त्यांस बोलला, तुह्मी त्याला घ्या आणि तुमच्या शास्त्राप्रमाणे त्याचा न्याय ठरवा. यावर यहूदी त्याला बोलले, कोणाचा जीव घेणें, हें आम त्याने होत नाहीं. नंतर त्यावर दोष ठेवूं लागून ह्मटलें, हा राष्ट्राला विपरीत चालवितां आणि आपण ख्रीस्त राजा आहें, असें ह्मणून कादूसाराला करभार देणें मना करितां आह्मास सांपडला आहे. यास्तव पिलातस फिरून कचेरींत गेला आणि येशूला बोलावून त्याला ह्मणाला, तूं यहूद्यांचा राजा आहेस कीं काय? येशूने त्याला उत्तर दिलें, तीं तूं स्वतां हें बोलतोस कीं काय? किंवा दुसऱ्याने तुला मजविषयीं सांगितलें? पिलातसाने उत्तर दिलें

कीं, मी यहूदी आहें कीं काय? तुझे देशस्थ आणि मुख्य उपाध्ये यांनी तुला माझ्या स्वाधीन केलें आहे. त्वां काय केलें? येशूनें उत्तर दिल्हें कीं, माझें राज्य या जगाचें नाहीं. जर माझें राज्य ह्या जगाचें असतें तर मी यहूद्यांच्या स्वाधीन केला न जावा ह्मणून माझे इस्तक झुंजले असते, परंतु आतां माझें राज्य एथील नाहीं. तेव्हां पिलातस त्याला बोलला, तर तूं राजा आहेस कीं काय? येशूनें उत्तर दिल्हें, तूं ह्मणतोस तेंच मी राजा आहें; मी ह्यासाठीं जन्मलों आणि ह्यासाठीं जगांत आलों कीं म्या खरेपणाविषयीं साक्ष द्यावी, प्रत्येक जो खरेप णाचा आहे तो माझी वाणी ऐकतो. पिलातस त्याला ह्मणतो, खरेपण काय आहे? आणि तो हें बोलून फिरून यहूद्यांजवळ बाहेर गेला, मग त्यांस ह्मणतो, याकडे कांहीं अपराध मला सांपडत नाहीं. मग ते बळरूप धरून बोलले कीं, तो गालीलापासून आरंभ करून एथपर्यंत संपूर्ण यहूदावरून शिकवितां जनाला चिथावून उठवितो.

तेव्हां पिलातसानें गालीलाविषयीं ऐकून विचारिलें, हा माणूस गालीली आहे कीं काय? आणि तो हेरो दाच्या अधिकारांतील आहे हें जाणल्यावर, हेरोद स्वतांहि त्यादिवसांत यरुशालेमामध्यें असतां त्याकडे ह्याला फिरून पाठविलें. मग हेरोद येशूला पाहून फार संतोष

पावला, कारण कीं त्याविषयीं बऊत ऐकल्यावरून त्याला पाहावयास फार वेळ इच्छीत होता, आणि त्याकडून कांहीं चमत्कार घडतां पाहावयास आशा धरिली. तेव्हां त्याला बऊत गोष्टींविषयीं विचारिलें, परंतु ह्याने त्याला कांहीं उत्तर दिल्हें नाहीं. तेव्हां मुख्य उपाध्ये व पंडित यांनी उभे राहून ताठाने त्याजवर दोष ठेविले, आणि हेरोदाने आपल्या सैनिकांसुद्धां त्याचा धिःकार केल्यावर व थट्टा केल्यावर त्याला तेजस्वी वस्त्रें लेववून फिरून त्याला पिलातसाजवळ पाठविलें. अणखी त्याच दिवशीं पिलातस आणि हेरोद हे परस्परें मित्र झाले, कां तर अगोदर ते एकमेकांशीं वैरयुक्त असत होते.

## अध्याय ५३.

मग पिलातसाने मुख्य उपाध्यांस व अधिकाऱ्यांस व जनाला एकच बोलावूंन त्यांस सांगितलें, तुह्मी ह्या माणसाला जनास विपरीत चालविणाऱ्यासारिखा माझ्याजवळ आणिलें, आणि पाहा, म्या तुह्मासमोर त्याचा निवाडा केल्यावर ज्यांविषयीं तुह्मी त्याजवर दोष ठेवितां त्यांविषयीं या माणसाकडे कांहीं अपराध मला सांपडला नाहीं. अणखी हेरोदालाहि नाहीं, कां तर त्याकडे म्या तुह्मास पाठविलें, आणि पाहा त्याला मरणाचें योग्य कांहीं केलें नाहीं, यास्तव त्याला शिक्षा देऊन सोडीन. आतां

सणांत एक बंदिवान् ज्याला लोकानी इच्छिलें त्याला त्यांज वळ सोडावें, ही सुभेदाराची रीत होती; आणि ज्यानी फितुरांत हत्या केली त्या फितुरकऱ्यांसहित बांधलेला बाराब्बा जो ह्मटला तो होता. तेव्हां लोक मोठ्याने हाक देतां आपणांजवळ जसें त्याने सर्वकाळ केलें होतें, त्याप्रमाणे मागूं लागले. मग पिलातसाने त्यांस उत्तर दिलें, म्या तुह्मासाठीं कोणास सोडावें ह्मणून इच्छितां? बाराब्बास, किंवा येशू जो ख्रीस्त ह्मटलेला त्याला? कां तर त्यानी हेव्याने त्याला परस्वाधीन केलें, हें तो समजला होता. आणि तो न्यायासनावर बसला असतां त्याची बायको त्याजकडे पाठवून बोलली, तुजमीं आणि त्या नीति मानामीं कांहीं नसावें, कां कीं आज म्या स्वप्नांत त्याज विषयीं बहुत सोसिलीं आहेत. तथापि समुदायानी बारा ब्बाला मागावें आणि येशूचा घात करावा म्हणून मुख्य उपाध्या व वडील ह्मानी त्यांस समजाविलें. तेव्हां सुभेदार उत्तर देतां त्यांस बोलला, ह्मा दोघांढून कोणत्याला म्या तुह्माजवळ सोडावें म्हणून इच्छितां? आणि ते बोलले, बाराब्बाला. पिलातस त्यांस ह्मणतो, तर येशू जो ख्रीस्त ह्मटलेला त्याला म्या काय करावें? ते त्यावर जोर करून बोलले, त्याला वधस्तंभीं दे, वधस्तंभीं दे. मग तो तिसऱ्याने त्यांस बोलला, कमाला? त्याने काय वाईट

केलें? त्याकडे मरणाचा कांहीं अपराध मला सांपडला नाहीं, यास्तव त्याला शिक्षा देऊन सोडीन. परंतु ते फार अधिक ओरडले, त्याला वधस्तंभीं दे.

यास्तव त्यानंतर पिलातसाने येशूला धरून फटके मारिले, तेव्हां त्याच्या सैनिकांनी येशूला माड्यांत नेऊन त्याजवळ संपूर्ण जमात एकवट केली. आणि त्यांनी त्याचें वस्त्र काढून त्याला किर्मिजी झगा लेवविला, आणि कांट्यांचा मुगूट गुंफून त्याच्या डोक्यावर ठेविला आणि त्याच्या उजव्या हातांत वेत दिला, आणि त्याच्या समोर गुडघे टेंकून त्याची थट्टा करितां बोलले, हे यहूद्यांच्या राजा, सुखरूप ऐस; आणि त्यांनी त्याजवर थुंकून वेत घेतला, आणि त्याच्या डोक्यावर मारिलें. यावर पिलातस फिरून बाहेर जाऊन त्यांस ह्मणतो, त्याकडे कांहीं अपराध मला मिळत नाहीं, हें तुह्मास कळावें ह्मणून मी त्याला तुह्माजवळ बाहेर आणितों, पाहा. यास्तव येशू कांट्यांचा मुगूट आणि जांभळें वस्त्र वाहात असतां बाहेर आला; मग तो त्यांस ह्मणतो, हा माणूस पाहा. यास्तव जेव्हां मुख्य उपाध्यांनी व चाकरांनी त्याला पाहिलें तेव्हां ओरडत ह्मटलें, स्तंभीं मार, स्तंभीं मार. पिलातस त्यांस ह्मणतो, तुह्मीच त्याला घेऊन स्तंभीं मारा, कारण कीं मला त्याकडे अपराध सांपडत

नाहीं. यहूद्यांनी त्याला उत्तर दिलें कीं, आम्हांस शास्त्र आहे आणि आमच्या शास्त्राप्रमाणें त्याला मरावें लागतें, कां तर त्यानें आपणाला देवाचा पुत्र म्हणविलें. यास्तव पिलातसानें ही गोष्ट ऐकल्यावर अधिकच भय धरिलें, मग तो फिरून कचेरींत जाऊन येशूला म्हणतो, तूं कोठला आहेस? परंतु येशूनें त्याला उत्तर न दिलें. यास्तव पिलातस त्याला म्हणतो, तूं मजशीं बोलत नाहींस काय? तुला खांबीं मारावयाचा अधिकार मला आहे आणि तुला सोडावयाचा अधिकार मला आहे, हें तुला कळलें नाहीं कीं काय? येशूनें उत्तर दिलें कीं, वरून तुला दिल्यावांचून तुला मजवर कांहीं अधिकार नसतां यासाठीं ज्यानें मला तुझ्याआधीन केलें त्याचें अधिक पाप आहे. तेव्हांपासून पिलातसानें त्याला सोडावयास यत्न केला, परंतु यहूदी ओरडत बोलले, जर तूं ह्याला सोडितोस तर काइसाराचा मित्र नाहींस; प्रत्येक जो आपणाला राजा म्हणवितो तो काइसाराविरुद्ध बोलतो. यावरून पिलातसानें ही गोष्ट ऐकून येशूला बाहेर आणिलें, आणि चिरेबंदी व इब्रीरूपें गाब्बाथा म्हटलेला जागा, तेथें न्यायासनावर तो बसला. तेव्हां वल्हांडण सणासाठीं सिद्ध करणें आणि सुमारें दुपार होती; तेव्हां तो यहूद्यांस म्हणतो, तुमचा राजा पाहा; परंतु ते ओरडले, ह्याला

दूर कर, खांबीं मार. पिलातस त्यांस ह्मणतो, मी तुमच्या राजाला खांबीं मारूं कीं काय? मुख्य उपाध्यांनी उत्तर दिलें कीं, कायसारावांचून आमचा राजा नाहीं. तेव्हां आपलें कांहींच चालत नाहीं परंतु अधिकच गडबड होत आहे, हें पिलातसानें पाहून पाणी घेऊन समुदा याच्यापुढें आपले हात धुऊन बोलला, ह्या नीतिमानाच्या रक्ताविषयीं मी निर्दोषी आहें, तुह्मी पाहा. आणि सगळे लोक उत्तर देतां बोलले, त्याचें रक्त आम्हावर आणि आमच्या लेंकरांवर असो. आणि दंगा व हत्या यांसाठीं बंदिशाळेंत घातलेला जो त्यांनी मागितला होता, त्याला त्यानें त्यांच्यासाठीं सोडिलें, परंतु येशूला त्यांच्या इच्छेप्रमाणे स्वाधीन केलें. आणि त्यांनी त्याजवर थुंकून वेळू घेतला आणि त्याच्या डोक्यावर मारिलें, मग जेव्हां त्यांनीं त्याची थट्टा केली, तेव्हां झगा त्याजवरून काढिला आणि त्याचीं वस्त्रें त्याला लेववितीं वधस्तंभीं खावयास त्याला नेलें.

तेव्हां तो अन्यायी ठरविला गेला, असें यहूदा जो त्याला परस्वाधीन करणारा त्यानें पाहून पश्चात्ताप बाळगीत असतां मुख्य उपाध्या आणि वडील ह्यांच्याजवळ ते तीस रुपये परत देऊन म्हटलें, निर्दोषी रक्त परस्वाधीन केल्यानें म्या पाप केलें आहे. तेव्हां ते बोलले, तें आह्मास

काय? तें तूं जाण; मग तो रुपये देवळांत टाकून निघाला आणि त्याने जाऊन आपल्यास गळफांस घेतला. तेव्हां मुख्य उपाध्ये ते रुपये घेऊन बोलले, हें रक्ताचें मोल आहे, ह्यास्तव त्यांस दानांत ठेवायास योग्य नाहीं. मग त्यांनी एकवट विचार केल्यावर परदेशांस पुरण्यासाठीं त्यांवर कुंभाराचें शेत विकत घेतलें; ह्यास्तव तें शेत आज पर्यंत रक्ताचें शेत म्हटलें आहे. इर्मया भविष्यभाष्याद्वारें जें ह्मटलें तें तेव्हां पूर्ण झालें कीं, मग ज्याचें मोल ठरविलें, ज्याचें मोल इस्राएलाच्या पुत्रांनी ठरविलें गेलें, त्याचें मोल ते तीस रुपये त्यांनी घेतले, आणि जसें प्रभूने मला नेमिलें तसें कुंभाराच्या शेतासाठीं दिल्हे.

आणि ते त्याला नेत होते, तेव्हां शिमोन कोणी कुरेन्याचा बाहेरस्थानापासून येत असतां त्याने वधस्तंभ येशू मागें वाहावा ह्मणून त्याला त्यांनी धरून त्याजवर ठेविला. आणि जनाचा व स्त्रियांचा मोठा भरणा त्याच्या मागें चालिला, ह्या त्याविषयीं बडवून घेतांना शोक करीत होत्या. तेव्हां येशू त्यांकडे मुरडून बोलला, अहो यरूशालेमातील कन्या, मजविषयीं रडूं नका, परंतु तुह्मी आपणांविषयीं आणि आपल्या लेंकरांविषयीं रडा, कां तर पाहा, असे दिवस येतात कीं त्यांत बोलतील, ज्या वांझा, जीं पोटें

प्रसवलीं नाहींत, आणि ज्या स्तनांनी पाजिलें नाहीं, तीं धन्य आहेत. तेव्हां ते डोंगरांस बोलूं लागतील, आम्हावर पडा, टेंकड्यांसहि आम्हास झांका; कां तर ओल्या झाडाला जर हीं करितात तर वाळल्याला काय होईल? आणि त्याच्या संगतीं दुसरेहि दोन दुष्कर्मी ठार मारण्यास नेले होते, आणि गलगथा म्हटलेली जागा जी कवटची जागा म्हट लेली आहे, तेथे येऊन पित्तावरावर मिसळलेली आंब त्याला प्यावयास दिल्ही, परंतु चाखून त्याने प्यावयास न मानिलें.

तेव्हां सैनिकांनी येशूला वधस्तंभीं मारिल्यानंतर त्यांनी त्याचीं वस्त्रें घेतलीं आणि प्रत्येक सैनिकासाठीं विभाग असे चार विभाग केले, आणि आंगरखा घेतला. तेव्हां आंगरखा शिवणीवांचून वरपासून अगदी विणला होता, यास्तव ते एकमेकांस बोलले, हा न फाडूं परंतु कोणाचा होईल असें याविषयीं पण करूं. हें अशास्तव कीं जो धर्मलेख म्हणतो कीं, त्यांनी आपणांमध्यें माझीं वस्त्रें वांटलीं आणि माझ्या पांघरूणावर पण घातला, तो पूर्ण व्हावा. सैनिकांनी तर हीं केलीं होतीं, आणि पिलातसाने पत्राहि लिहून वधस्तंभावर लाविला, आणि असा लिहिला होता, येशू नाझोरी यहूद्यांचा राजा. तर जेथे येशू वधस्तंभीं मारिला होता तें ठिकाण नगराजवळ होतें, आणि तो इब्रीत व हेल्लाणींत

व रोमींत लिहिला होता, यास्तव बहुत यहूद्यांनी वाचिला. यावर यहूद्यांचे मुख्य उपाध्ये पिलातसाला बोलले कीं, यहूद्यांचा राजा, असें लिहूं नको, परंतु असें कीं, त्यानेच म्हटलें मी यहूद्यांचा राजा आहें. पिलातसाने उत्तर दिलें, म्या जें लिहिलें, तें लिहिलें. आणि तिसरी प्रहर होती, तेव्हां त्यांनी त्याला वधस्तंभीं दिलें. तेव्हां ते ह्याबराबर दोन लुटाऱ्यांस, एकाला उजव्याकडे आणि एकाला त्याच्या डाव्याकडे वधस्तंभीं देतात. असें जो लेख ह्मणतो कीं, तो नीतिभंग्यांबराबर मोजला गेला, हा पूर्ण झाला. तेव्हां येशू बोलला, हे बापा, ते काय करितात, हें त्यांस कळत नाहीं, यास्तव त्यांस सूट दे. आणि जन पाहत उभें राहिलें, आणि त्याच्या जवळून वागणारे आपलीं डोकीं डोलवितां त्याला निंदितांना बोलले, अरे देऊळ मोडणाऱ्या आणि तीन दिवसांत बांधणाऱ्या, तूं आपणास तार, जर देवाचा पुत्र आहेस तर वधस्तंभापासून उतर. आणि त्याप्रमाणे मुख्य उपाध्येहि हे पंडित व वडील ह्यांसुद्धां याची थट्टा करीत असतां बोलले, त्याने दुसऱ्यांस तारिलें, आपणाला तारावयास तो शक्तिमान् नाहीं; जर तो इस्राएलाचा राजा आहे तर आतां वधस्तंभापासून उतरो, ह्मणजे आह्मी त्यावर विश्वास धरूं. त्याने देवावर विश्वास ठेविला,

जर तो त्याला इच्छितो तर त्याला आतां सोडवो, कां तर तो बोलला कीं, मी देवाचा पुत्र आहें. आणि सैनिकांनीहि त्याची थट्टा केली, जवळ येऊन त्याला आंब वादर केली आणि ह्मटलें, जर तूं यहूद्यांचा राजा आहेस तर आपणाला तार. आणि जे दुष्कर्मी टांगले, यांतील एक त्याची निंदा करीत बोलला, जर तूं ख्रीस्त आहेस तर आपणाला आणि आम्हास तार. परंतु दुसरा उत्तर देतां त्याला निषेधीत बोलला, तूं ह्याच दंडांत आहेस तर देवाला भीतच नाहींस काय? आणि आह्मी न्यायानें खरें, कारण कीं आम्ही जीं केलीं त्यांचीं योग्य तीं पावतों, परंतु ह्यानें कांहीं असंगत केलें नाहीं. मग तो येशूला बोलला, हे प्रभू, तूं आपल्या राज्यांत येसील तेव्हां माझी आठवण कर. नंतर येशू त्याला बोलला, मी तुला खचीत सांगतों, तूं आज माझ्या संगतीं स्वर्गांत होसील.

तेव्हां येशूच्या वधस्तंभाजवळ त्याची आई आणि ह्मच्या आची स्त्री मारया जी त्याची मावशी ती आणि मारया माग्दा लीण ह्या उभ्या राहत होत्या. यास्तव येशू आईला आणि ज्या शिष्यावर आपण प्रीति केली त्याला जवळ उभा राहतां पाहून आपल्या आईला ह्मणतो, हे स्त्री, पाहा, तुझा पुत्र, नंतर त्या शिष्याला ह्मणतो, पाहा तुझी

आई; तेव्हां त्या घटिकेपासून त्या शिष्याने तिला आपल्या मध्यें घेतले.

तेव्हां साहाव्या तासापासून नवव्या तासापर्यंत सर्व देशावर अंधार झाला, आणि नवव्या तासीं येशू मोठ्या शब्दाने ओरडतां बोलला, एली, एली, लामा शबाख्थानी म्हणजे माझ्या देवा, माझ्या देवा, त्वां मला कां टाकिलें? तेव्हां तेथे उभ्या राहणाऱ्यांतील कित्येक ऐकून बोलले, हा एलीयास बोलाविती. यानंतर अवघीं कित्यांस समाप्त झालीं, हें येशू पाहून धर्मलेख पूर्ण व्हावयास म्हणतो, मला तहान लागली आहे. तर तेथे आंबीनें भरलेलें भांडें ठेविलें होतें, आणि तेव्हांच त्यांतील एकाने धांवून आणि बादल घेऊन, मग आंबीनें भरून व बोरू वर ठेवून त्याला पाजिलें. परंतु वरकड बोलले, असूं दे, एलीया येऊन त्याला तारतो कीं काय, हें पाहूं. यास्तव येशूने आंब घेतल्यानंतर म्हटलें, पूर्ण झालें आहे; मग दुसरेहीं मोठ्या शब्दाने तो ओरडून बोलला, हे बापा, तुझ्या हातांत माझा आत्मा सोपितों; मग त्याणें हीं बोलून मस्तक लववून प्राण सोडिला.

## अध्याय ५४.

तेव्हां पाहा, देवळाचा पडदा वरपासून खालींपर्यंत फाटून दोन भाग झाले, आणि भूमि कांपली आणि

खडक फुटले गेले आणि थडगीं उघडलीं गेलीं, आणि निजलेल्या पविचांचीं बहुत शरिरें त्याच्या उठण्यानंतर उठविलीं गेलीं, आणि ते थडग्यांतून बाहेर निघून पविच नगरांत आले आणि बहुतांजवळ प्रगट झाले होते. तेव्हां शतपति आणि जे त्याच्या संगातें येशूची राखण करीत होते, त्यांनी भूमिकंप आणि जीं झालीं तीं पाहून फार भिऊन ह्मटलें, हा देवाचा पुत्र होता, खरें. आणि सर्व समुदाय जे त्या पाहण्यावर एकवट झाले, ते जीं घडलीं तीं पाहून आपल्या उरांवर मारून माघारें गेले. आणि जे त्याचे सर्व ओळखी ते आणि ज्या स्त्रिया त्याची सेवा करीत त्याच्यामागें गालीलापासून आल्या, ह्मणजे मारया माग्दालीण आणि मारया जी याकोबाची व योसे ह्यांची आई ती, आणि जेबेदीच्या पुत्रांची आई त्या आणि बहुत दुसऱ्याहि पाहतां दूर उभ्या राहिल्या.

यावर सिद्ध करण्याची वेळ होती, ह्मणजी तो शाब्बाथ मोठा दिवस होता, यास्तव शाब्बाथांत त्यांच्या कुडी वध स्तंभावर न राहाव्या ह्मणून त्यांचे पाय मोडावे आणि त्यांस न्यावें, असें यहूद्यांनी पिलातसाजवळ मागितलें. यास्तव सैनिकांनी येऊन त्यासहित वधस्तंभीं मारलेल्या पहिल्याचे व दुसऱ्याचे पाय मोडिले खरें, परंतु येशूजवळ येऊन त्याला मितक्यांत मेलेला पाहिला, आणि त्याचे पाय

मोडिले नाहींत. तथापि शिपायांतील एकाने त्याची कूस भाल्याकडून भोसकिली, आणि तेव्हांच रक्त व पाणी बाहेर आलें. तेव्हां ज्याने पाहिलें त्याने साक्ष दिल्ही आणि त्याची साक्ष खरी आहे, आणि तुम्ही विश्वास धरावा याकरितां तो खरें बोलतो, हें त्याला कळलें आहे. तर हीं याकरितां झालीं कीं हा धर्मलेख पूर्ण व्हावा, त्याचें हाड मोडिलें जाणार नाहीं; आणि फिरून दुसरा धर्मलेख ह्मणतो, ज्याला त्यांनी भोसकिलें त्याकडे दृष्टि लावितील.

तेव्हां तितक्यांत संध्याकाळ झाला असतां, यहूद्यांचें नगर हारिमाथाई यांतून माणूस नांवें योसेफ, सभासद उत्तम व पुण्यवान् माणूस होता; हा त्यांच्या विचाराला व कामाला सम्मत देत नव्हता, आणि हा आपणहि देवाच्या राज्याची वाट पाहत होता. ह्याने पिलातसाच्या जवळ येऊन येशूचें शरीर मागितलें; तेव्हां तो इतक्यांत मेला याविषयीं पिलातसाने आश्चर्य केलें, मग शतपतीला बोलावून त्याला पुसलें कीं, तो कांहीं पूर्वीं मेला कीं काय? तेव्हां हें शतपतीकडून जाणल्यावर त्याने शरीर योसेफाला दिल्हें, यास्तव त्याने येऊन येशूची कूड काढिली. आणि निकदेमसहि जो पहिल्याने रात्रीं येशू जवळ आला, तो बोळ व अगरु यांची मिसळ सुमारें शंभर

घेर येऊन आला. यास्तव त्यांनी येशूचें कुड घेतलें, आणि यहूद्यांच्या उत्तरकार्याच्या रीतिप्रमाणें सुवासिकां सुद्धां आळशीच्या वस्त्रांनी त्याला गुंडाळिलें. तेव्हां जेथें तो वधस्तंभीं मारिला होता त्या ठिकाणीं मळा होता आणि त्या मळ्यांत नवें थडगें जें खडकांत खोदिलें होतें, आणि ज्यांत कोणीहि तोंपर्यंत ठेविलें नाहीं, असें होतें; यास्तव यहूद्यांच्या सिद्धकरण्यामुळें त्यांनी येशूला तेथे ठेविलें, कां तर तें थडगें जवळ होतें.

आणि बायकाहि ज्या गालीलापासून त्याच्यासंगतीं आल्या होत्या त्यांनी म्हणजे मागें जाऊन थडगें आणि त्याचें शरीर कसें ठेविलें हें पाहिलें. मग माघारें जाऊन सुगंधद्रव्यें व उट्या हीं सिद्ध केलीं; तथापि शाब्बाथांत आज्ञेप्रमाणें निवांत राहिल्या खरें, आणि दुसऱ्या दिवशीं म्हणजे सणास सिद्धकरण्यानंतर जो दिवस त्यांत मुख्य उपाध्ये आणि फारिशी पिलातसाजवळ मिळून बोलले, हे प्रभू, तो ठकविणारा जीवंत असतांना बोलला कीं, तीन दिवसांनंतर मी उठेन, असें आम्ही स्मरतों. यासाठीं तीन दिवसांपर्यंत थडग्याचा बंदोबस्त करावयास आज्ञा दे, नाहींतर कदाचित् त्याचे शिष्य रात्रीं येऊन त्याला चोरतील आणि लोकांस म्हणतील, तो मेलेल्यांमधून उठला आहे, मग शेवटील ठकविणें पहिल्यापेक्षां वाईट

होईल. तेव्हां पिलात त्यांस बोलला, तुम्हास पाहरा आहे, तुह्मी जा आणि आपल्या समजुतीप्रमाणे बंदोबस्त करा. मग त्यांनी जाऊन धोंड्यावर शिक्का छापून पाहऱ्या करून कबऱ्याचा बंदोबस्त केला. नंतर शाब्बाथ होऊन गेल्यावर मारया माग्दालीन व मारया जी याकोबाची आई व सालोमे यांनी येऊन त्याला लेपन करावें ह्मणून सुगंध द्रव्यें विकत घेतलीं.

आणि शाब्बाथाच्या प्रथमवारीं मोठ्या सकाळीं सूर्य उगवतां कबऱ्याकडे येतात, आणि पाहा मोठा भूमिकंप झाला, याजकरितां कीं प्रभूचा दूत आकाशांतून उतरल्यावर जवळ येऊन द्वारावरून धोंडा लोटला आणि त्यावर बसला. त्याचें दिसणें विजेसारिखें होतें आणि त्याचें वस्त्र बर्फासारिखें पांढरें होतें; तेव्हां त्याच्या भयाकडून पाहरेकरी कांपले आणि मेल्यांसारिखे झाले. तेव्हां त्या आपआपल्यांमध्यें असें बोलल्या कीं, आमच्याकरितां प्रेतस्थानाच्या तोंडापासून धोंडा एकीकडे कोण लोटील? कारण तो फार मोठा होता, परंतु दृष्टि देऊन पाहिलें, तों त्यांस असें दिसलें कीं धोंडा एकीकडे लोटलेलाच आहे. मग प्रेतस्थानांत जाऊन त्यांनी उजव्या बाजूस बसलेला आणि पांढरा झगा घातलेला असा तरुण पुरुष पाहिला, मग त्या घाबरल्या. तेव्हां तो त्यांस ह्मणाला कीं, तुम्ही घाबरूं नका, येशू

नाजारेकर जो वधस्तंभीं दिल्हा होता त्याचा शोध तुह्मी करितां; तो उठून गेला एथे नाहीं, ह्या जग्यांत त्यांनी त्याला ठेविलें तो हो आता तुह्मी पाहा. परंतु तुह्मी एथून माघाऱ्या जा, त्याच्या शिष्यांस आणि पेत्रसालाहि सांगा कीं, तो तुह्मापुढें गालीलांत जाणार आहे. तेथें त्यानें तुह्माला सांगितल्याप्रमाणें तो तुमच्या दृष्टीस पडेल. तेव्हां त्या बायका भयानें आणि फार आनंदानें व्याप्त होऊन थडग्यापासून लवकर निघून त्याच्या शिष्यांस वर्तमान सांगावयास धांवत गेल्या. यास्तव मारया माग्दालीन धांवून शिमोन पेत्रसाजवळ आणि ह्या दुसऱ्या शिष्यावर येशूनें प्रीति केली त्याजवळ येती, आणि त्यांस ह्मणती कीं, त्यांनी प्रभूला थडग्यांतून नेलें आणि त्याला कोठें ठेविलें, हें आह्मास कळलें नाहीं.

यावर पेत्रस आणि तो दुसरा शिष्य निघून थडग्यास जात होते; तेव्हां ते दोघे संगतीं धांवले आणि तो दुसरा शिष्य पेत्रसापेक्षां लवकर धांवून थडग्यास प्रथम आला, आणि ओणवा होऊन त्यानें आळशीचीं वस्त्रें ठेविलेलीं पाहिलीं; तथापि आंत गेला नाहीं. शिमोन पेत्रस तर त्याच्यामागें चालत येतो, मग थडग्यांत गेला, आणि आळशीचीं वस्त्रें ठेविलेलीं आणि जो रुमाल त्याच्या डोक्याला होती तो प्रेतवस्त्रांसुद्धां ठेविला नव्हता, परंतु वेगळी एका

ठिकाणीं पडी केलेली पाहिली. मग यावरून दुसरा शिष्य जो थडग्याजवळ प्रथम आला तोहि आंत गेला, आणि त्याने पाहिलें व विश्वास धरिला; कारण कीं त्याला मेले त्यांतून पुन्हा उठणें लागतें, हा धर्मलेख तोंपर्यंतहि ते समजले नव्हते.

तेव्हां ते शिष्य फिरून आपल्यांकडे गेले, परंतु मारथा बाहेर थडग्याजवळ रडत उभी राहिली; यास्तव ती रडत असतां थडग्यांत डोकावीत होती. तेव्हां जेथे येशूची कूड राहिली होती, तेथे पांढरीं वस्त्रें ल्यालेले दोन दूत, एक मस्तकजाग्यापाशीं आणि एक पायजाग्यापाशीं बसलेले, तिने पाहिले. मग ते तिला ह्मणतात, हे स्त्री, तूं कां रडतीस? ती त्यांस ह्मणती, यासाठीं कीं त्यांनी माझ्या प्रभूला नेलें आणि त्याला कोठे ठेविलें असेल हें मला कळलें नाहीं. मग ती हीं बोलून पाठमोरी फिरली, आणि उभ्या राहिलेल्या येशूला पाहती, परंतु येशू आहे असें ती न समजली. येशू तिला ह्मणतो, हे स्त्री, तूं कां रडतीस? कोणाला शोधितीस? तो माळी आहे, असें तिला वाटून ती त्याला ह्मणती, हे दादा जर त्वां त्याला एथून नेलें तर त्याला कोठे ठेविलें, हें मला सांग, मग मी त्याला नेईन. येशू तिला ह्मणतो, हे मारथे, ती मुरडून त्याला ह्मणती, राब्बूनी, ह्मणजे हे गुरु. येशू

तिला ह्मणतो, माझ्या बापाजवळ चढणें आजून मला झालें नाहीं, यास्तव मला शिवूं नको, परंतु माझ्या भावां जवळ जाऊन त्यांस सांग, जो माझा बाप व तुमचा बाप, आणि माझा देव व तुमचा देव, त्याजवळ चढतों. नंतर त्या वर्त्तमान त्याच्या शिष्यांस सांगावयास जात असतां तेव्हां पाहा, येशू त्यांस भेटून बोलला, सुखरूप असा; आणि त्यांनी जवळ येऊन त्याचे पाय धरिले आणि त्याचें भजन केलें. तेव्हां येशू त्यांस ह्मणतो, भिऊं नका, जा, माझ्या भावांस सांगा कीं त्यांनी गालीलांत जावें आणि ते तेथें मला पाहतील.

आणि त्या जात असतां, पाहा, पाहऱ्यांतून कित्येक जणांनी नगरांत जाऊन जें अवघें झालें तें मुख्य उपाध्यांस सांगितलें. तेव्हां हे वडिलांसुद्धां एकवट झाल्यावर आणि मनसोबा केल्यावर शिपायांस फार पैका देऊन बोलले, तुह्मी असें सांगा कीं, आह्मी झोपेंत असतां त्याच्या शिष्यांनी रात्रीं येऊन त्याला चोरून नेलें. आणि हें जर सुभेदाराच्या कानीं येईल तर आह्मी त्याला समजावूं आणि तुह्मांस निर्भय करूं. मग त्यांनी पैका घेऊन जसें त्यांस शिकविलें तसें केलें, आणि आजपर्यंत हीच गोष्ट यहूदीलोकांस गाजविली जाती.

अध्याय २४.

आणि पाहा त्याच दिवशीं त्यांमधील दोघे एकागांवास जात होते; तें यरुशालेमाहून पावणेचार कोस लांब आहे, त्याचें नाव एम्माउस. आणि ते ह्या अवघ्या वृत्तांतांविषयीं परस्परें संभाषण करीत होते; तेव्हां ते संभाषण करीत व विचारीत असतांना असें झालें कीं येशू आपण जवळ येऊन त्यांच्या संगतीं चालला, परंतु त्यांनी त्याला न ओळखावें म्हणून त्यांचे डोळे धरिले होते. तेव्हां तो त्यांस बोलला, तुम्ही चालतां म्लानमुखी असतां, तुम्ही एकमेकांशीं ज्या गोष्टी परस्परें काढितां त्या काय? मग एक ज्याचें नाव क्लेयपास तो उत्तर देतां त्याला बोलला, काय, तूं यरुशालेमांत एकला प्रवास करितोस, आणि त्यांत ह्या दिवसीं जी घडलीं तीं तुला न कळलीं? आणि तो त्यांस बोलला, कोणतीं? तेव्हां ते त्याला बोलले, नाजोरी येशूविषयींचीं तीं; तो माणूस भविष्यभाषी, देवाच्या व अवघ्या लोकांच्या देखतां करण्यांत व बोलण्यांत सामर्थ्यवान् होता. आणि असें कीं आमच्या मुख्य उपाध्यांनी व अधिकाऱ्यांनी त्याला मरणाच्या दंडासाठीं परस्वाधीन केलें, तसें त्याला वध स्तंभीं दिलें; परंतु आम्ही आशा धरीत होतों कीं जो इस्राएलाची खंडणी भरणार, तो हाच आहे. अणखी ह्या अवघ्यांसंगतीं हीं घडलीं यापासून आज तिसरा दिवस

चालत आहे, खरें. अणखीहि आमच्यांतील कित्येक स्त्रियांनी आम्हांस विस्मित केलें, त्या मोठ्या सकाळीं थडग्याजवळ असतां आणि त्याचें शरीर न पाहतां येऊन बोलल्या, क्या दूतांनी म्हटलें कीं, तो जीवंत आहे, त्यांचा देखावाहि आपण पाहिला आहे. आणि आमच्या बरोबरच्यांतून कित्येक निघून थडग्याकडे गेले, मग जसें स्त्रियांनी सांगितलें तसेंच त्यांसहि सांपडलें, परंतु त्यांनी त्याला पाहिलें नाहीं. मग तो आपण त्यांस बोलला, अहो भविष्यभाष्यांनी अवघीं जीं सांगितलीं त्यांवर विश्वास धरण्यास अबुद्धिमंत व मंद यमंराहो ख्रीस्ताने हीं सोसावीं आणि आपल्या गौरवांत जावें, हें पाहिजे नव्हतें कीं काय? मग त्याने मोश्याच्या व सर्व भविष्यभाष्यांच्या यांपासून आरंभ करून सर्व लेखांतील आपणाविषयीं जीं तीं त्यांस समजाविलीं. नंतर ज्या गांवास ते जात होते त्याजवळ आले; तेव्हां तो पुढें जावयाचारिखा करीत होता, परंतु ते त्याजवळ बळ धरून बोलले, आमच्या संगतीं राहा, कारण कीं सांज लगत आहे अथा दिवस उतरला. नंतर तो त्यांच्या बरोबर राहावयास आंत गेला, मग तो त्यांसहित जेवायास बसतांना असें झालें, त्याने भाकर घेऊन स्तुति केली आणि मोडून त्यांस दिल्ही. तेव्हां त्यांचे डोळे उघडले गेले आणि त्यांनी त्याला ओळखिलें, मग तो त्यांस अदृश्य

झाला. नंतर ते एकमेकांशीं बोलले, जेव्हां तो वाटेंत आह्माशीं बोलत होता आणि आह्मासाठीं लेख उघडे करी त होता, तेव्हां आह्मामध्यें आमचें हृदय प्रज्वलित नव्हतें कीं काय? मग त्याच घटकेस ते उठून यरुशालेमास मा घारें गेले; आणि त्यांस ते अकरा व त्यांच्या संगतींचे जे तें एकवटलेले सांपडले आणि सांगत होते कीं, प्रभू उठला आहे खरें, आणि शिमोनाला दिसला आहे. मग ह्मांनी वाटें तलीं जीं तीं आणि तो भाकर मोडण्याने त्यांस कसा कळला गेला, हें साद्यंत सांगितलें.

आणि ते हीं सांगत असतां येशू स्वतां त्यांच्यामध्यें उभा राहिला आणि त्यांस ह्मणतो, तुमचें कल्याण असो; परंतु ते घाबरले आणि भयाभीत होऊन आपण आत्मा पाहिला, असें त्यांस भासलें. मग तो त्यांस बोलला, तुह्मी कां थरा रले आहां? आणि तुमच्या हृदयांत विचार कशामुळें उठ तात? माझे हात आणि माझे पाय यांस पाहा, कांकीं मी स्वतां आहें. मला चांचपा आणि पाहा, कांकीं जसीं मला मांस व हाडें आहेत ह्मणून तुह्मी पाहतां, तसीं आ त्म्याला नाहींत; आणि हें बोलतां त्याने आपले हात आ णि पाय त्यांस दाखविले. तेव्हां ते तेथपर्यंत आनंदा मुळें विश्वासत नसतां आणि आश्चर्य करितां, तो त्यांस बोलला, तुह्माजवळ एथे कांहीं भक्ष्य आहे कीं काय?

मग त्यांनी त्याला भाजलेल्या माशाचा आणि मधाच्या मोहोळांतला तुकडा दिल्हा, आणि त्याने घेऊन त्यांच्या देखतां खाल्लें. यावर येशू फिरून त्यांस बोलला, तुम्हांस स्वस्थपण असो, जसें बापाने मला पाठविलें तसें मीहि तुम्हांस पाठवितों. आणि तो हें बोलून त्यांवर फुंकून त्यांस म्हणतो, तुम्ही पवित्र आत्मा घ्या ; तुम्ही ज्या कोणाचीं पापें सोडितां तीं त्यांस सोडलीं जातात, आणि ज्या कोणाचीं तुम्ही धरितां तीं धरिलीं जातात.

परंतु जेव्हां येशू आला तेव्हां बारा शिष्यांतील एक जो थोमा दीदूमस म्हटलेला तो त्यांसहित नव्हता, यास्तव दुसरे शिष्य त्याला बोलले, आम्ही प्रभूला पाहिलें आहे. तेव्हां तो त्यांस बोलला, म्या त्याच्या हातांस खिळ्यांची खूण पाहिल्यावांचून, आणि खिळ्यांच्या खुणेंत बोट घातल्यावांचून आणि त्याच्या कुशींत माझा हात घातल्यावांचून मी विश्वासणारच नाहीं. मग आठ दिवसांनंतर त्याचे शिष्य फिरून आंत होते आणि त्यांसहित थोमा होता; तेव्हां दारें बंद केलीं असतां येशू येऊन मध्यें उभा असतांना बोलला, तुम्हांस स्वस्थपण असो. नंतर थोमाला म्हणतो, तुझें बोट इकडे करून माझे हात पाहा, आणि तुझा हात लांबवून माझ्या कुशींत घाल, मग अविश्वासी होऊं नको परंतु विश्वासी हो. तेव्हां थोमाने उत्तर देण्यांत

त्याला असें ह्मटलें, माझा प्रभू माझा देवच. येशू त्याला ह्मणतो, हे थोमा, त्वां मला पाहिलें यास्तव विश्वास केला, जे न पाहून विश्वासतात ते धन्य. आणि त्याने त्याच्या अविश्वासाचा व हृदयकठोणपणाचा बद्दा लाविला, कारण कीं ज्यानी त्याला उठलेला पाहिला त्यांवर त्यानी विश्वास धरिला नाहीं,

तेव्हां अकरा शिष्य गालीलांत डोंगरावर जेथे येशूने त्यांस नेमिलें तेथे गेले, आणि त्यानी त्याला पाहून त्याचें भजन केलें, परंतु कित्येकानी संशय धरिला. तेव्हां येशू जवळ येऊन त्यांस बोलला कीं, आकाशांत आणि पृथ्वीवर सर्व अधिकार मला दिल्हेला आहे.

यानंतर तिबरयासाच्या समुद्राजवळ येशूने आपणाला शिष्यांसीं फिरून दाखविलें. तेव्हां असें दाखविलें कीं शिमोनपेत्रस व थोमा जो दीदुमस ह्मटलेला, व नथानेल जो गालीलांतील कान्याचा, व जेबेदीचे पुत्र व त्याच्या शिष्यांतील दुसरे दोघ, हे एकवट होते. शिमोनपेत्रस त्यांस म्हणतो, मी मासे धरावयाला जातों; ते त्याला ह्मणतात आह्मीहि तुह्मासंगतीं येतों. तेव्हांच ते निघून तारवावर चढले, आणि त्या रात्रीं त्यानी कांहीं धरिलें नाहीं. मग इतक्यांत सकाळ झाली असतां येशू समुद्राच्या तिरीं उभा होता, तथापि तो येशू आहे असें शिष्य न समजले.

यावर येशू त्यांस म्हणतो, अहो मुलें तुम्हास कांहीं भक्ष्य आहे कीं काय? त्यांनी त्याला उत्तर दिलें कीं, नाहीं. तेव्हां तो त्यांस बोलला, तुह्मी तारवाच्या उजव्या अंगीं जाळें टाका, मग तुह्मी पावाल. यास्तव त्यांनी टाकिलें, आणि मग माशांच्या बोळक्यामुळें ते ओढावयास न शकले; यास्तव ज्या शिष्यावर येशूनें प्रीति केली होती, तो पेत्र साला ह्मणतो, प्रभु आहे. यास्तव शिमोनपेत्रसानें प्रभु आहे, हें ऐकून बाहेरलें पांघरूण लेवून आंवळलें, कारण कीं तो उघडा होता, मग समुद्रांत उडी घातली. नंतर दुसरे शिष्य होडक्यानें आले, कारण कीं कांठापासून सुमारें दोनशें हात याहून दूर नव्हते, तेव्हां त्यांनी माशांचें जाळें ओढिलें. यावर कांठीं उतरले असतां, कोळशांचा विस्तव घातलेला आणि त्यावर मासळी घातलेली आणि भाकर हीं पाहिलीं. येशू त्यांस म्हणतो, तुम्ही आतां धरलेल्या मासळ्यांतून आणा. शिमोनपेत्रस चढला आणि एकशें त्रेपन्न मोठ्या माशांनी भरलेलें जाळें, हें त्यांनी कांठास ओढिलें; तेव्हां तितके असतां जाळें फाटलें नाहीं येशू त्यांस ह्मणतो, या, जेवा; आणि तो प्रभु आहे हें त्यांस कळलें असतां तूं कोण आहेस? हें त्याला पुसावयास शिष्यांतील कोणी धजला नाहीं. यावर येशू येतो आणि भाकर घेऊन त्यांस देतो, आणि तसें मासळ्याहि; येशू मेलें

असें खीस्ताने सोसावें आणि तिसऱ्या दिवशीं मेलेल्यांतून फिरून उठावें, हें पाहिजे होतें. आणि यरुशालेमापासून आरंभ करून सर्व राष्ट्रांस पश्चात्ताप व पापांची क्षमा त्याच्या नावावर गाजिली पाहिजे, आणि ह्याचे साक्षी तुह्मी आहां. तुह्मी जाऊन सर्व राष्ट्रांस शिष्य करा, बापाच्या व पुत्राच्या व पवित्र आत्म्याच्या नामाने त्यांस बाप्तिस्मा देत जा; ह्मा ज्या ज्या सर्व आज्ञा तुह्मास दिल्या, त्या पाळावयास शिकवीत जा. जो विश्वास धरील आणि बाप्तिस्मा घेईल तो तारिला जाईल, परंतु जो विश्वास न धरील तो दंडी ठरविला जाईल; आणि पाहा मी आपल्या बापाचें वचनफळ तुह्मावर पाठवितों. आणि जे विश्वासतात त्यांसंगातें ह्या खुणा मागें जातील; माझ्या नावाने ते भुतांस घालवितील, नव्या भाषा बोलतील, साप उचलतील आणि कांहीं मृत्युकारक जर पितील तर त्यांस बाधणार नाहीं, रोग्यांवर हात ठेवितील आणि ते बरे होतील. परंतु तुम्ही वरल्यांतील सामर्थ्य ल्यालेले व्हाल, तोंपर्यंत यरुशालेमनगरांत वस्ती करा; आणि पाहा, जगाच्या समाप्तीपर्यंत सर्व दिवसांत मी तुम्हाबराबर आहे, आमेन.

तर खरें, प्रभु त्यांशीं बोलल्यानंतर तो त्यांस बेथन्यापावेतों बाहेर घेऊन गेला, आणि आपले हात वर करून

त्यांस आशीर्वाद दिल्हा. आणि तो त्यांस आशीर्वाद देतांना ऐसें झालें वर आकाशांत घेतला गेला आणि देवाच्या उजव्याकडे बसला. तेव्हां ते त्याची भक्ति करीत मोठ्या आनंदाने यरुशालेमास माघारें गेले, आणि देवाला स्तवितां व धन्य ह्मणतां सर्वदा देवळांत असत होते. मग त्यानी निघून सर्व ठिकाणीं गाजविलें, प्रभु त्यांसंगातें काम करीत आणि गोष्टीवर अनुसरत्या साक्षात्कारांकडून शिक्षा स्थापीत करीत गेला.

तर येशूने आपल्या शिष्यांच्या समक्ष बहुत दुसरेहि चमत्कार जे ह्या पुस्तकांत लिहिले नाहींत ते केले खरें; जर प्रत्येक लिहिले, तरीं हें जग लिहिलेल्या पुस्तकांचें धारण करणार नाहीं, असें मला वाटतें. परंतु येशू तो खीस्त तो देवाचा पुत्र आहे, असा विश्वास तुह्मी धरावा, अणखी विश्वास धरून त्याच्या नावाकडून तुह्मास जीवन व्हावें ह्मणून हीं लिहिलीं आहेत, आमेन.

---

## येशू ख्रीस्त आकाशावर चढून गेल्यानंतर त्याचा धर्म कसें प्रसरिला आणि त्या वेळापासून आज पर्यंत कसें चालत आला आहे यांविषयीं गोष्ट.

मागें सांगितल्याप्रमाणे येशू ख्रीस्त आकाशांवर चढून गेल्यानंतर त्याचे शिष्य त्याची आज्ञा मानून माघारें यरूशाले मांत गेले, आणि सामर्थ्य पावण्याविषयीं जें वचन त्याने त्यांस दिलें होतें त्या वचनाची वाट ते पाहत राहिले. मग दाहा दिवस गेल्यावर ते शिष्य आणि कोणी दुसरीं भक्तिमान् माणसें एका घरामध्यें देवाची प्रार्थना करायास जमलीं असतां मोठ्या वाहत्या वाऱ्यासारिखा आकाशांतून नाद अकस्मात् झाला, आणि त्याने सर्व घर जेथें ते बसले होते तें भरलें. तेव्हां पवित्र आत्म्याची प्रेरणा त्या मनुष्यांच्या मनांत आली आणि तिजकडून ते निराळ्या निराळ्या देशांतल्या भाषा बोलूं लागले. तेव्हांपासून त्या शिष्यांनी उपदेश व चमत्कार केले आणि त्यांस प्रेषित असें नाम झालें. प्रथम प्रेषितांनी यरूशालेमलोकांस उपदेश करून सांगितलें कीं, येशू ख्रीस्त ज्याला तुह्मी वध स्तंभावर वधिलें तोच जगाचा तारणारा आहे. तुह्मी त्याला वधिलें खरें, परंतु तो जीवंत होऊन मेलेल्यांम धून उठला व आकाशांत जाऊन सर्व सृष्टीवर अधिकारी

झाला आहे. त्याला वधण्याने तुम्ही फार पाप केलें खरें, परंतु जर पश्चात्ताप करून त्याजवर तुम्ही विश्वास ठेवाल तर तुमच्या पापाची क्षमा तो करील.

ही गोष्ट ऐकून लोक आपल्या अपराधांविषयीं विचार करूं लागले, आणि जो मनुष्यांचा तारणारा त्याला अव्हेरण्यांत आपण बहुत पातकी झालों, असें समजून त्यांनी आपलें पाप देवाजवळ कबूल केलें आणि येशू ख्रीस्तावर विश्वास ठेवून प्रेषितांच्या हातून बाप्तिस्मा घेतला. असें एका दिवसांत तीन हजार माणसें ख्रीस्ताच्या धर्मांत आलीं.

यानंतर थोडे दिवसानी पेत्रस व योहान नामक दोन प्रेषित देवळाजवळ प्रार्थना करावयास जात असतां एका पांगळ्या माणसाने त्यांपाशीं भीक मागितली. मग पेत्रस बोलला, येशू ख्रीस्ताच्या नावाने तूं उठ आणि चाल. तेव्हां तो माणूस बरा होऊन उठला आणि देवाची स्तुति करीत त्या प्रेषितांसहित देवळांत गेला. असा चमत्कार पाहून बहुत समुदाय मिळाले असतां पेत्रसाने त्यांस उपदेश केला, आणि समाप्ति केल्यावर सुमारें पांचहजार माणसें आपल्या पापांचें स्मरण करून पश्चात्ताप पावलीं, आणि येशू ख्रीस्तावर विश्वास ठेवून त्यांनी बाप्तिस्मा घेतला. हें पाहून अधिकारी प्रेषितांच्या पाठीस लागले आणि त्यांस मना करीत बोलले कीं, ही गोष्ट तुह्मी लोकांस

सांगूं नका. तेव्हां प्रेषितानी उत्तर दिलें कीं, आह्मास देवाची आज्ञा अवश्य मानावी लागती. मग अधिकाऱ्यानी प्रेषितांतील एकाला जिवें मारिलें व दुसऱ्यांस फटके मारून त्यांचे हाल फार केले. तथापि ते येशू ख्रीस्ताची गोष्ट सांगत गेले आणि त्यांच्या मंडळींत बहुत लोक मिळाले. मग जसी येशू ख्रीस्ताने आज्ञा त्यांस पूर्वीं केली तसें प्रेषित निराळ्या निराळ्या देशांत शुभवर्त्तमान सांगावयास जाऊं लागले. अगोदर बहुत यहूदीलोक निराळ्या निराळ्या देशांत जाऊन वस्ती करीत होते, आणि प्रेषितानी प्रथम त्यांची भेट करून त्यांस शुभवर्त्तमान सांगितलें; मग अन्य धर्माच्या लोकांजवळ जाऊन त्यांसहि सांगितलें. जसे चमत्कार येशू ख्रीस्ताने पूर्वीं केले तसे प्रेषितांच्या हातून घडले. असे घडलेले चमत्कार पाहून बहुत लोकानी त्यांचा उपदेश ऐकिल्यावर विश्वास धरून बाप्तिस्मा घेतला. अशा सर्व लोकांस ख्रिस्ती असें नाम झालें.

त्या प्रेषितानी लोकांस उपदेश करून असें सांगितलें कीं, सर्व मनुष्यें पापेंकरून देवापासून भ्रष्ट झालीं आहेत, आणि आपला उत्पन्न व रक्षण व पोषण करणारा जो परमेश्वर याला सोडून स्वछंदाने चालतात. असी अवज्ञा करणारे पृथ्वीवरील सर्व लोक आहेत. ते देवासमोर

दोषी आणि नरकाच्या मार्गांत पडले आहेत. या पापां मुळें ते सर्व निरुपयोगी व निरुपायी झाले आहेत, आणि आपल्या उद्धारासाठीं त्यांच्या हातून कांहीं पुण्य होत नाहीं आणि आपल्या पापांचें कांहीं प्रायश्चित्त त्यांस करितां येत नाहीं. तेव्हां देवानें अवतार धरून लोकां मध्यें वस्ती केली. त्या अवताराला येशू ख्रीस्त असें नाम दिलें आहे, आणि आपण देवाचा अवतार आणि सर्व मनुष्यांस तारावयास समर्थ आहे हें लोकांस कळवायासाठीं त्यानें बहुत चमत्कारिक कामें केलीं. त्यानें शब्देंकरूनच आंधळ्यांस दृष्टि व मुक्यांस वाचा व पांगळ्यांस गमन व बहिऱ्यांस श्रवण असें दिलें, आणि सर्व प्रकारचे रोग व दुःख निवारण केलें. तो पायांनी समुद्रावर चालला. त्यानें वारा आणि वादळ बंद केलें. एका समयीं त्यानें पांच भाकऱ्यांनी पांच हजार भुकेलीं माणसें तृप्त केलीं, आणि कित्येक जे मेले त्यांस जिवंत केलें. सर्व आयुष्यांत पवित्र राहिल्यावर शेवटीं त्यानें लोकांच्या पापांसाठीं प्रायश्चित्त करण्याकरितां दुष्ट माणसांच्या स्वाधीन होऊन दुःख भोगून आपला प्राण दिल्हा. त्यांच्या हातून मरण पावल्यावर त्याचें शरीर तीन दिवसपर्यंत कबरेंमध्यें राहिलें, मग जिवंत होऊन निघाला आणि चाळीस दिवस मनुष्यांमध्यें वस्ती करून तो आपल्या शिष्यांदेखत आकाशांत

जेला. तो सर्व सृष्टीवर अधिकार करितो; सर्व लोकांचें तारण करावयास तो शक्तिमान् आहे, आणि त्याने तारणाचा उपाय अवघ्या लोकांस सांगावयास आह्मास पाठविलें आहे. जो कोणी आपलें सर्व पाप कबूल करून येशू खीस्तावर विश्वास ठेवील आणि त्याच्या आज्ञेत राहील तो तारण पावेल. जो विश्वास धरणार नाहीं तो आपल्या पापांचा योग्य दंड भोगील.

आणि प्रेषितांनी उपदेश करितांना अणखी सांगितलें कीं, जो कोणी या तारणाऱ्यावर विश्वास ठेवितो त्याला तारणारा प्रिय होतो, आणि त्याला पाप आवडत नाहीं. असा माणूस येशू खीस्तासारिखा पवित्र होण्यास प्रयत्न करितो आणि त्याच्या सर्व आज्ञा पाळितो. त्याच्या आज्ञा मानणें त्याला कठीण वाटत नाहीं, त्या सर्व आज्ञा पवित्र पूर्ण यथार्थ चांगल्या व सुखदायक अशा त्याला वाटतात. ह्या आज्ञा या प्रकारच्या आहेत, ह्मणजे ज्याने आकाश व पृथ्वी उत्पन्न केली असा जो परमेश्वर, त्याजवर तुह्मी संपूर्ण मनाने प्रीति करा, त्याचें भजन आणि केवळ त्याचीच सेवा करा, मूर्त्तींच्या पायां पडूं नका, त्यांचें भजन करूं नका, त्यांस नमस्कार करूं नका. भगवानासमोर मूर्त्ति अमंगळ पदार्थ आहे आणि तो मूर्त्तिपूजेस कंटाळतो. जें कांहीं उत्पन्न आहे त्याची पूजा किंवा भजन करूं नका, कारण

कीं जो भगवान तो आत्मा आहे, त्यासारिखा कांहीं नाहीं, ह्मणून त्याचें भजन मनानें व सत्यतेने केलें पाहिजे.

भणखी प्रेषितानी उपदेश करून सांगितलें कीं, परमे श्वराचें नाम व्यर्थ घेऊं नको, आपल्या आईबापांची मर्यादा कर, मनुष्यांचा जीव घेऊं नको, जारकर्म किंवा कांहीं मळीण काम करूं नको, चोरी करूं नको, लबाडी बोलूं नको, आणि खोटी साक्ष देऊं नको, दुसऱ्याचें जें कांहीं असेल त्याजवर लोभ ठेवूं नको, आणि दुसऱ्याचें कांहीं वाईट करूं नको. अपकाराकरितां अपकार करूं नको परंतु आपल्या वैऱ्यांची क्षमा करून त्यांचें बरें कर, ह्या जगांतील द्रव्यावर लोभ ठेवूं नको परंतु आकाशांतील सुखावर मन ठेव. दरि द्र्यांस धर्म कर, नागव्यांस नेसीव, भुकेल्यांस खायाला दे, तान्हेल्यांस पियाला दे, रोगी व दुःखित यांचा समाचार घे, आणि देवासारिखा पवित्र व पूर्ण हो. आणि हीं सर्व कामें केल्यावर तूं जाण कीं आपण निरुपयोगी चाकर आहे, जितकें करावयास योग्य तितकेंच मात्र केलें, कांहीं अधिक नाहीं.

येशू ख्रीस्त सर्व सृष्टीचा धनी असतां आपलें रक्षण न करून दुष्ट माणसांच्या स्वाधीन होऊन त्यांच्या हातून मरण पावला, हें जर कोणाला आश्चर्य वाटेल तर त्यानें येशू ख्रीस्ताविषयीं भणखी विचार करून समजावें कीं, लोकांचें

तारण करण्याकरितां येशू खीस्त मानवी देह धरून जन्मला, आणि पापी माणसांच्या तारणासाठीं जे उपाय करण्याचे आणि जें दुःख सोसण्याचें होतें, तें उपाय करावे आणि तें दुःख त्याला सोसावें लागलें. मनुष्यांच्या तारणासाठीं केवढें दुःख सोसण्याचें होतें हें सर्व पूर्वीं त्याला माहीत होतें. त्याला कांहीं अकस्मात् कधीं झालें नाहीं, तो स्वतां दुष्ट माणसांच्या स्वाधीन झाला आणि त्यांच्या हातून मरण पावून त्याने सर्व लोकांच्या पापांचें प्रायश्चित्त केलें. आपल्या मरणाविषयीं अगोदर त्याने लोकांस सांगितलें कीं, मी आपला जीव फिरून घ्यावा ह्मणून देतों, कोणी मजपासून तो घेत नाहीं परंतु मी आपणच तो देतों, मला तो सोडण्याचा अधिकार आणि फिरून घेण्याचा अधिकार आहे.

यहूदीलोकानी येशू खीस्ताला अव्हेरिलें आणि त्यांच्या अधिकाऱ्यांनी त्याला धरून जिवें मारिलें. या मोठ्या पापामुळें देवाचा राग त्या लोकांवर फार झाला. येशू खीस्ताच्या येण्यापूर्वीं सुमारें दीड हजार वर्षें मोशाने यहूदी लोकांस सांगितलें कीं, तुह्मामध्यें तारणारा जन्मेल आणि त्याचें जो कोणी ऐकणार नाहीं त्याचा नाश होईल. यहूदी लोकानी त्यास अव्हेरिलें, आणि या पापामुळें त्यांवर केवढी शिक्षा येणार आहे हें येशू खीस्ताने समजून आपल्या शिष्यांस सूचना केली, ह्मणून ते पळून नाश पावले नाहींत.

येशू खीस्त आकाशांत गेल्यावर सुमारें चाळीस वर्षांनी रोमी बादशाहाने यहूदीलोकांशीं लढाई करावयास मोठी फौज पाठविली, आणि बहुत लोक वल्हांडण नामें एक मोठा सण मानावयास यरूशालेमामध्यें मिळाले असतां फौजेने पोहों चून नगरास वेढा घातला. असें आपल्या राजधानीमध्यें एवढे लोक बंद केले असतां त्यांस कांहीं खायाला मिळत नव्हतें, आणि बहुत उपासाने मेले. कांहीं वेळानंतर फौजाच्या सर्दाराने लढाईकरून यरूशालेम आपल्या हातीं घेतलें, आणि सर्व शहर व देऊळ यांचा नाश केला. उपास व लढाई यांकडून सुमारें अकरा लाख मनुष्यें मरण पावलीं, आणि जीं राहिलीं त्यांतील कित्येकांस सर्दाराने धरूनकरून आपल्या देशांत नेलें, कित्येकांस गुलामपणामध्यें विकलें, आणि कित्येक भयाने निराळ्या निराळ्या मुलखा मध्यें पळाले.

यानंतर यहूदीलोकांस कांहीं अधिकार राहिला नाहीं, आणि आजपर्यंत कांहीं अधिकार त्यांस मिळाला नाहीं. त्या लोकांतील कित्येक वेळोंवेळीं खिस्तीधर्मांत आले आहेत, परंतु बहुतकरून ते निराळ्या निराळ्या देशांत राहून आपल्या वाडवडिलांच्या रीतिप्रमाणे चालतात. त्या लोकांतील कोणी मुंबईत व या मुलखांतील बहुत दुसऱ्या ठिकाणीं राह तात; त्यांस इस्राएल व इस्री व यहूदीलोक अशीं नामें

दिल्हीं आहेत. येशू ख्रीस्ताच्या येण्यापूर्वी जें शास्त्र त्यांच्या वाडवडिलांस दिल्हें होतें तें शास्त्र मात्र ते मानितात, आणि तारणाऱ्याविषयीं ते कल्पितात कीं आजून तो आला नाहीं परंतु येईल, आणि मोठा राजा होऊन सर्व आमचे लोक एकवट करून फार वैभवानें त्यांजवर अधिकार करील. असें समजून इस्राएललोक शास्त्राचा अर्थ चुकतात, कां कीं तारणाऱ्याविषयीं ज्या सर्व भविष्य गोष्टी शास्त्रांत लिहून ठेविल्या आहेत त्या गोष्टी येशू ख्रीस्ताचा जन्म व कार्य व मरण व पुनरुठणें यांमध्यें पूर्ण झाल्या. अणखी भविष्यगोष्टींमध्यें सांगितलें आहे कीं, इस्राएलाचा अधिकार गेल्याअगोदर तारणारा येईल. तसा येशू ख्रीस्त आला, आणि यरूशालेमाचा नाश झाल्यापासून त्या लोकांस कांहीं अधिकार राहिला नाहीं. परंतु इस्राएल लोक सर्वदां अविश्वासी राहणार नाहींत; भविष्य गोष्टींमध्यें सांगितलें आहे कीं, ज्याला त्यांच्या वाडवडिलांनी जिवें मारिलें, ह्मणजे येशू ख्रीस्त, त्याजवर सर्व इस्राएल लोक विश्वास ठेवतील आणि येणेकरून देवाची कृपा फिरून त्यांस प्राप्त होईल.

येशू ख्रीस्त आकाशांत गतेवेळेस यहूदीलोकांशिवाय सर्व अन्य देशांतील लोक मूर्त्तिपूजा करीत होते. तथापि त्यानें आपल्या शिष्यांस सांगितलें कीं, तुह्मी संपूर्ण जगा

सर्व जाऊन सर्व लोकांस शिष्य करा. ही आज्ञा त्यांनी मानिली आणि ख्रिस्तीधर्म वाढून वाढून कांहीं वर्षांनी सर्व अवळच्या मुलखामध्यें पसरिला. हें पाहून तो धर्म नाहींसा करण्याकरितां मूर्त्तिपूजक इत्यादिकांनी फार प्रयत्न केले. रोमीबादशाहांनी आपल्या सुभेदार अमलदार इत्यादिकांस वारंवार आज्ञा केली कीं, ख्रिस्तीधर्म कोणाला सांगूं देऊं नका, आणि त्याप्रमाणे कोणाला चालूं देऊं नका. त्या धर्मांत जे आलेले आहेत त्यांनी तो सोडावा आणि आपल्या वाडवडिलांचा धर्म फिरून आचरावा, आणि जर कोणी न ऐकतील तर त्यांचे हाल करा. अशा नियमांवरून ख्रिस्तीलोकांचे हाल फार झाले. त्यांतील कित्येक ठार मारिले गेले; कित्येक गुलामपणास विकत दिल्हे गेले, आणि कित्येकांचीं शेतें माल इत्यादिक जप्त केले गेले. असें बळात्काराकडून ख्रिस्तीलोकांस बहुत दुःख झालें, परंतु तो धर्म देवाने लाविला आणि त्यानेच चालविला, म्हणून तो वाढत गेला. ख्रीस्ताच्या मरणानंतर सुमारें तीनशें वर्षांनी ख्रिस्तीधर्म केवढा वाढला आणि त्या लोकांचें सदाचरण कसें आहे, हें पाहून कनस्तांतीन नामक एक बादशाहा याने नियम केला कीं, धर्मामुळें ख्रिस्तीलोकांचे हाल कोणी करूं नये. तेव्हां पासून ख्रिस्तीलोकांचा बंदोबस्त झाला, आणि कांहीं

वर्षांनी बादशाहाने आपण विश्वास धरून बाप्तिस्मा घेतला. इतक्यांत ख्रिस्तीधर्म विलायतांतील मुलखांमध्यें पसरला आणि अन्य धर्म फारकरून नाहींसे झाले. आणी खंडाच्या पश्चिमेंतील मुलूख ह्मणजे आरबस्तान, इराण इत्यादिकांत तो धर्म वाढला. या भरतखंडांतहि कोणी उपदेशकानी येशू ख्रीस्ताची गोष्ट सांगितली, आणि तेव्हांपासून कित्येक ठिकाणीं तो धर्म चालत आला आहे. काही कोटाच्या पलिकडे ह्मणजे मलबारी मुलखांत हजारोंहजार काळे ख्रिस्तीलोक राहतात.

बादशाहाची रोमी नामें राजधानी यामध्यें जो उपाध्या होता तो सर्व दुसऱ्या उपाध्यांपेक्षां आपणास कांहीं मोठा मानूं लागला, आणि कांहीं वर्षांनंतर सर्वांनी त्याला थोर मानावें असा नेम बादशाहाने केला. त्या शहराच्या उपाध्याला पापा असें अधिकारीनाम झालें. यानंतर त्याच्या ठिकाणीं जे आले त्यांनी अभिमान धरून निराळे निराळे उपाय करून आपली शक्ति व परवी वाढविली, आणि सर्व पश्चिमेकडील ख्रिस्तीलोकांवर ते अधिकार करूं लागले. पुढें तो पापा अधिक उन्मत्त होऊन देवाचें भजन करण्याच्या रीती शास्त्रामध्यें सांगितल्या नाहींत, तशा रीती नेमून मानाव्या ह्मणून त्याने लोकांस आज्ञा केली. आणि त्या रीती शास्त्रामध्यें सांगितल्या नाहींत,

हें लोकांस न समजावें ह्मणून त्याने दुसरा नेम केला, ह्मणजे त्याने आज्ञा दिल्याशिवाय कोणी शास्त्र वाचूं नये आणि आपल्याजवळ ठेवूं नये. त्या वेळेपासून खिस्तीधर्म पुष्कळ देशांत फार बिघडला गेला, आणि लोक अज्ञानी होऊन येशू ख्रीस्त व त्याचे शिष्य व कोणी साधू यांच्या मूर्त्ति लावून त्यांची पूजा करूं लागले. यानं तर ही चाल त्या मुलखांत फार वाढली आणि कांहीं आकारीभक्ति करूं नका, अशी आज्ञा देवाने केली आहे हें लोकांस समजत नव्हतें. ह्या रीती पापाने नेमल्या त्यांशिवाय जर कोणी उपदेशकानी कांहीं रीती लोकांस शिकविल्या असतां, किंवा उपाध्यांशिवाय जर कोणी माणूस शास्त्रांतील शोध करूं लागले तर पापाने अमलदारांच्या योगाने त्यांस शिक्षा लाविली. याप्रमाणे पापाने बहुत वर्षे खिस्तीलोकांवर अधिकार केला. मग सुमारें तीनशें वर्षांमागें विलायतेच्या पश्चिकडील देशांत कोणी मोठे उपदेशक, जसे शास्त्रामध्यें सांगितली तशी देवाचें भजन करण्याची रीत लोकांस शिकवूं लागले, आणि सर्व लोकानी शास्त्र वाचून समजावें, असें ते त्यांस सांगूं लागले. तेव्हां पापाने त्या उपदेशकांस आज्ञा केली कीं, असें सांगूं नका, परंतु त्यांनी मानिलें नाहीं, मग त्यांचा व पापाचा वाद विवाद झाला. शेवटीं पापाचा अधिकार व रीती त्या

सांगूं नका. तेव्हां प्रेषितानी उत्तर दिल्हें कीं, आह्मास देवाची आज्ञा अवश्य मानावी लागती. मग अधिकाऱ्यानी प्रेषितांतील एकाला जिवें मारिलें व दुसऱ्यांस फटके मारून त्यांचे हाल फार केले. तथापि ते येशू ख्रीस्ताची गोष्ट सांगत गेले आणि त्यांच्या मंडळींत बहुत लोक मिळाले. मग जशी येशू ख्रीस्ताने आज्ञा त्यांस पूर्वीं केली तसें प्रेषित निराळ्या निराळ्या देशांत शुभवर्त्तमान सांगाव यास जाऊं लागले. अगोदर बहुत यहूदीलोक निराळ्या निराळ्या देशांत जाऊन वस्ती करीत होते, आणि प्रेषितानी प्रथम त्यांची भेट करून त्यांस शुभवर्त्तमान सांगितलें; मग अन्य धर्माच्या लोकांजवळ जाऊन त्यांसहि सांगितलें. जसे चमत्कार येशू ख्रीस्ताने पूर्वीं केले तसे प्रेषितांच्या हातून घडले. असे घडलेले चमत्कार पाहून बहुत लोकानी त्यांचा उपदेश ऐकिल्यावर विश्वास धरून बाप्तिस्मा घेतला. अशा सर्व लोकांस ख्रिस्ती असें नाम झालें.

त्या प्रेषितानी लोकांस उपदेश करून असें सांगितलें कीं, सर्व मनुष्यें पापेंकरून देवापासून भ्रष्ट झालीं आहेत, आणि आपला उत्पन्न व रक्षण व पोषण करणारा जो परमेश्वर याला सोडून स्वछंदाने चालतात. अशी अवज्ञा करणारे पृथ्वीवरील सर्व लोक आहेत. ते देवासमोर

दोषी आणि नरकाच्या मार्गीं पडले आहेत. या पापां
मुळें ते सर्व निरुपयोगी व निरुपायी झाले आहेत, आणि
आपल्या उद्धारासाठीं त्यांच्या हातून कांहीं पुण्य होत
नाहीं आणि आपल्या पापांचें कांहीं प्रायश्चित्त त्यांच
करितां येत नाहीं. तेव्हां देवानें अवतार धरून लोकां
मध्यें वस्ती केली. त्या अवताराला येशू ख्रीस्त असें नाम
दिलें आहे, आणि आपण देवाचा अवतार आणि सर्व
मनुष्यांस तारावयास समर्थ आहे हें लोकांस कळवायासाठीं
त्यानें बहुत चमत्कारिक कामें केलीं. त्यानें प्रत्येकरूनच
आंधळ्यांस दृष्टि व मुक्यांस वाचा व पांगळ्यांस गमन व
बहिऱ्यांस श्रवण असें दिलें, आणि सर्व प्रकारचे रोग व
दुःख निवारण केलें. तो पायानी समुद्रावर चालला.
त्यानें वारा आणि वादळ बंद केलें. एका समयीं त्यानें
पांच भाकऱ्यानी पांच हजार भुकेलीं माणसें तृप्त केलीं,
आणि कित्येक जे मेले त्यांस जिवंत केलें. सर्व आयुष्यांत
पवित्र राहिल्यावर शेवटीं त्यानें लोकांच्या पापांसाठीं प्राय
श्चित्त करण्याकरितां दुष्ट माणसांच्या स्वाधीन होऊन दुःख
भोगून आपला प्राण दिल्हा. त्यांच्या हातून मरण पाव
ल्यावर त्याचें शरीर तीन दिवसपर्यंत कबरेंमध्यें राहिलें,
मग जिवंत होऊन निघाला आणि चाळीस दिवस मनु
ष्यांमध्यें वस्ती करून तो आपल्या शिष्यांदेखत आकाशांत

गेला. तो सर्व सृष्टीवर अधिकार करितो; सर्व लोकांचें तारण करावयास तो शक्तिमान् आहे, आणि त्यानें तारणाचा उपाय अवघ्या लोकांस सांगावयास आह्मास पाठविलें आहे. जो कोणी आपलें सर्व पाप कबूल करून येशू ख्रीस्तावर विश्वास ठेवील आणि त्याच्या आज्ञेंत राहील तो तारण पावेल. जो विश्वास धरणार नाहीं तो आपल्या पापांचा योग्य दंड सोसील.

आणि प्रेषितानी उपदेश करितांना असलें सांगितलें कीं, जो कोणी या तारणाच्यावर विश्वास ठेवितो त्याला तारणारा प्रिय होतो, आणि त्याला पाप आवडत नाहीं. असा माणूस येशू ख्रीस्तासारिखा पवित्र होण्यास प्रयत्न करितो आणि त्याच्या सर्व आज्ञा पाळितो. त्याच्या आज्ञा मानणें त्याला कठीण वाटत नाहीं, त्या सर्व आज्ञा पवित्र पूर्ण यथार्थ चांगल्या व सुखदायक अशा त्याला वाटतात. त्या आज्ञा या प्रकारच्या आहेत, ह्मणजे ज्यानें आकाश व पृथ्वी उत्पन्न केली असा जो परमेश्वर, त्याजवर तुह्मी संपूर्ण मनानें प्रीति करा, त्याचें भजन आणि केवळ त्याचीच सेवा करा, मूर्त्तींच्या पायां पडूं नका, त्यांचें भजन करूं नका, त्यांस नमस्कार करूं नका. भगवानासमोर मूर्त्ति अमंगळ पदार्थ आहे आणि तो मूर्त्तिपूजेस कंटाळतो. जें कांहीं उत्पन्न आहे त्याची पूजा किंवा भजन करूं नका, कारण

कीं जो भगवान तो आत्मा आहे, त्यासारिखा कांहीं नाहीं, ह्मणून त्याचें भजन मनानें व सत्यतेनें केलें पाहिजे.

आणखी प्रेषितानी उपदेश करून सांगितलें कीं, परमेश्वराचें नाम व्यर्थ घेऊं नको, आपल्या आईबापांची मर्यादा कर, मनुष्यांचा जीव घेऊं नको, जारकर्म किंवा कांहीं मळीण काम करूं नको, चोरी करूं नको, लबाडी बोलूं नको, आणि खोटी साक्ष देऊं नको, दुसऱ्याचें जें कांहीं असेल त्याजवर लोभ ठेवूं नको, आणि दुसऱ्याचें कांहीं वाईट करूं नको. अपकाराकरितां अपकार करूं नको परंतु आपल्या वैऱ्यांची क्षमा करून त्यांचें बरें कर, ह्या जगांतील द्रव्यावर लोभ ठेवूं नको परंतु आकाशांतील सुखावर मन ठेव. दरिद्र्यांस धर्म कर, नागव्यांस नेसीव, भुकेल्यांस खायाला दे, तान्हेल्यांस पियाला दे, रोगी व दुःखित यांचा समाचार घे, आणि देवासारिखा पवित्र व पूर्ण हो. आणि हीं सर्व कामें केल्यावर तूं जाण कीं आपण निरुपयोगी चाकर आहे, जितकें करावयास योग्य तितकेंच मात्र केलें, कांहीं अधिक नाहीं.

येशू ख्रीस्त सर्व सृष्टीचा धनी असतां आपलें रक्षण न करून दुष्ट माणसांच्या स्वाधीन होऊन त्यांच्या हातून मरण पावला, हें जर कोणाला आश्चर्य वाटेल तर त्यानें येशू ख्रीस्ताविषयीं आणखी विचार करून समजावें कीं, लोकांचें

तारण करण्याकरितां येशू खीस्त मानवी देह धरून अवतरला, आणि पापी माणसांच्या तारणासाठीं जे उपाय करण्याचे आणि जें दुःख सोसण्याचें होतें, ते उपाय करावे आणि तें दुःख त्याला सोसावें लागलें. मनुष्यांच्या तारणासाठीं केवढें दुःख सोसण्याचें होतें हें सर्व पूर्वीं त्याला माहीत होतें. त्याला कांहीं अकस्मात् कधीं झालें नाहीं, तो स्वतां दुष्ट माणसांच्या स्वाधीन झाला आणि त्यांच्या हातून मरण पावून त्याने सर्व लोकांच्या पापांचें प्रायश्चित्त केलें. आपल्या मरणाविषयीं अगोदर त्याने लोकांस सांगितलें कीं, मी आपला जीव फिरून घ्यावा ह्मणून देतों, कोणी मजपासून तो घेत नाहीं परंतु मी आपणच तो देतों, मला तो सोडण्याचा अधिकार आणि फिरून घेण्याचा अधिकार आहे.

यहूदीलोकानी येशू खीस्ताला अव्हेरिलें आणि त्यांच्या अधिकाऱ्यानी त्याला धरून जिवें मारिलें. या मोठ्या पापामुळें देवाचा राग त्या लोकांवर फार झाला. येशू खीस्ताच्या येण्यापूर्वीं सुमारें दीड हजार वर्षें मोशाने यहूदी लोकांस सांगितलें कीं, तुह्मामध्यें तारणारा उभा होईल आणि त्याचें जो कोणी ऐकणार नाहीं त्याचा नाश होईल. यहूदी लोकानी त्यास अव्हेरिलें, आणि या पापामुळें त्यांवर केवढी शिक्षा येणार आहे हें येशू खीस्ताने समजून आपल्या शिष्यांस सूचना केली, ह्मणून ते पळून नाश पावले नाहींत.

येशू खीस्त आकाशांत गेल्यावर सुमारें चाळीस वर्षांनी रोमी बादशाहानें यहूदीलोकांशीं लढाई करावयास मोठी फौज पाठविली, आणि बहुत लोक वल्हांडण नामें एक मोठा सण मानावयास यरूशालेमामध्यें मिळाले असतां फौजेनें घेरो घालून नगरास वेढा घातला. असें आपल्या राजधानीमध्यें एवढे लोक बंद केले असतां त्यांस कांहीं खायाला मिळत नव्हतें, आणि बहुत उपासानें मेले. कांहीं वेळानंतर फौजाच्या सर्दारानें लढाईकरून यरूशालेम आपल्या हातीं घेतलें, आणि सर्व शहर व देऊळ यांचा नाश केला. उपास व लढाई यांकडून सुमारें अकरा लाख मनुष्यें मरण पावलीं, आणि जीं राहिलीं त्यांतील कित्येकांस सर्दारानें जुलूमकरून आपल्या देशांत नेलें, कित्येकांस गुलामपणामध्यें विकलें, आणि कित्येक भयानें निराळ्या निराळ्या मुलखा मध्यें पळाले.

यानंतर यहूदीलोकांस कांहीं अधिकार राहिला नाहीं, आणि आजपर्यंत कांहीं अधिकार त्यांस मिळाला नाहीं. त्या लोकांतील कित्येक वेळोंवेळीं खिस्तीधर्मांत आले आहेत, परंतु बहुतकरून ते निराळ्या निराळ्या देशांत राहून आपल्या वाडवडिलांच्या रीतिप्रमाणे चालतात. त्या लोकांतील कोणी मुंबईत व या मुलखांतील बहुत दुसऱ्या ठिकाणीं राह तात; त्यांस इस्राएल व इब्री व यहूदीलोक अशीं नामें

दिल्हीं आहेत. येशू ख्रीस्ताच्या येण्यापूर्वी जें शास्त्र त्यांच्या वाडवडिलांस दिल्हें होतें तें शास्त्र मात्र ते मानितात, आणि तारणाऱ्याविषयीं ते कल्पितात कीं आजून तो आला नाहीं परंतु येईल, आणि मोठा राजा होऊन सर्व आमचे लोक एकवट करून फार वैभवानें त्यांजवर अधिकार करील. असें समजून इस्राएललोक शास्त्राचा अर्थ चुकतात, कां कीं तारणाऱ्याविषयीं ज्या सर्व भविष्य गोष्टी शास्त्रांत लिहून ठेविल्या आहेत त्या गोष्टी येशू ख्रीस्ताचा जन्म व कार्यें व मरण व पुनरुठणें यांमध्यें पूर्ण झाल्या. अणखी भविष्यगोष्टींमध्यें सांगितलें आहे कीं, इस्राएलाचा अधिकार गेल्याअगोदर तारणारा येईल. तसा येशू ख्रीस्त आला, आणि यरुशालेमाचा नाश झाल्यापासून त्या लोकांस कांहीं अधिकार राहिला नाहीं. परंतु इस्राएल लोक सर्वदां अविश्वासी राहणार नाहींत; भविष्य गोष्टींमध्यें सांगितलें आहे कीं, ज्याला त्यांच्या वाडवडिलांनी जिवें मारिलें, म्हणजे येशू ख्रीस्त, त्याजवर सर्व इस्राएल लोक विश्वास ठेवतील आणि येणेकरून देवाची कृपा फिरून त्यांस प्राप्त होईल.

येशू ख्रीस्त आकाशांत गातेवेळेस यहूदीलोकांशिवाय सर्व अन्य देशांतील लोक मूर्त्तिपूजा करीत होते. तथापि त्यानें आपल्या शिष्यांस सांगितलें कीं, तुह्मी संपूर्ण जगा

मध्यें जाऊन सर्व लोकांस शिष्य करा. ही आज्ञा त्यांनी मानिली आणि ख्रिस्तीधर्म वाढून वाढून कांहीं वर्षांनी सर्व मवळच्या मुलखामध्यें पसरिला. हें पाहून तो धर्म नाहींसा करण्याकरितां मूर्तिपूजक इत्यादिकांनी फार प्रयत्न केले. रोमीबादशाहांनी आपल्या सुभेदार अमलदार इत्यादिकांस वारंवार आज्ञा केली कीं, ख्रिस्तीधर्म कोणाला थांबूं देऊं नका, आणि त्याप्रमाणे कोणाला चालूं देऊं नका. त्या धर्मांत जे आलेले आहेत त्यांनी तो सोडावा आणि आपल्या वाडवडिलांचा धर्म फिरून आचरावा, आणि जर कोणी न ऐकतील तर त्यांचे हाल करा. अशा नियमांवरून ख्रिस्तीलोकांचे हाल फार झाले. त्यांतील कित्येक ठार मारिले गेले; कित्येक गुलामपणास विकत दिल्हे गेले, आणि कित्येकांचीं शेतें माल इत्यादिक जप्त केले गेले. असें बळात्काराकडून ख्रिस्ती लोकांस बहुत दुःख झालें, परंतु तो धर्म देवाने लाविला आणि त्यानेच चालविला, म्हणून तो वाढत गेला. ख्रीस्ताच्या मरणानंतर सुमारें तीनशें वर्षांनी ख्रिस्तीधर्म केवढा वाढला आणि त्या लोकांचें सदाचरण कसें आहे, हें पाहून कनस्तांतैन नामक एक बादशाहा याने नियम केला कीं, धर्मामुळें ख्रिस्तीलोकांचे हाल कोणी करूं नये. तेव्हांपासून ख्रिस्तीलोकांचा बंदोबस्त झाला, आणि कांहीं

कोणी बादशाहाने आपण विचार धरून कायिदा केला. इतक्यांत खिस्तीधर्म विलायतांतील मुलखांमध्यें पसरिला आणि अन्य धर्म फारकरून नाहींसे झाले. आशी खंडाच्या पश्चिमेंतील मुलूख ह्मणजे आरबस्थान, इराण इत्यादिकांत तो धर्म वाढला. या भरतखंडांतहि कोणी उपदेशकानी येशू खीस्ताची गोष्ट सांगितली, आणि तेव्हांपासून कित्येक ठिकाणीं तो धर्म चालत आला आहे. काली कोटाच्या पलिकडे ह्मणजे मलबारी मुलखांत हजारोहजार काळे खिस्तीलोक राहतात.

बादशाहाची रोमी नामें राजधानी यामध्यें जो उपाध्या होता तो सर्व दुसऱ्या उपाध्यांपेक्षां आपणास कांहीं मोठा मानूं लागला, आणि कांहीं वर्षांनंतर सर्वांनी त्याला थोर मानावें असा नेम बादशाहाने केला. त्या शहराच्या उपाध्याला पापा असें अधिकारीनाम झालें. यानंतर त्याच्या ठिकाणीं जे आले त्यांनी अभिमान धरून निराळे निराळे उपाय करून आपली शक्ति व पदवी वाढविली, आणि सर्व पश्चिमेकडील खिस्तीलोकांवर ते अधिकार करूं लागले. पुढें तो पापा अधिक उन्मत्त होऊन देवाचें भजन करण्याच्या रीती शास्त्रामध्यें सांगितल्या नाहींत, तशा रीती नेमून मानाव्या ह्मणून त्याने लोकांस आज्ञा केली. आणि त्या रीती शास्त्रामध्यें सांगितल्या नाहींत,

हें लोकांस न समजावें ह्मणून त्याने दुसरा नेम केला, ह्मणजे त्याने आज्ञा दिल्याशिवाय कोणी शास्त्र वाचूं नये आणि आपल्याजवळ ठेवूं नये. त्या वेळेपासून ख्रिस्तीधर्म पुष्कळ देशांत फार बिघडला गेला, आणि लोक अज्ञानी होऊन येशू ख्रीस्त व त्याचे शिष्य व कोणी साधू यांच्या मूर्ति स्थापून त्यांची पूजा करूं लागले. यानं तर ही चाल त्या मुलखांत फार वाढली आणि कांहीं आकारीभक्ति करूं नका, अशी आज्ञा देवाने केली आहे हें लोकांस समजत नव्हतें. ह्या रीती पापाने नेमल्या त्यांशिवाय जर कोणी उपदेशकानी कांहीं रीती लोकांस शिकविल्या असतां, किंवा उपाध्यांशिवाय जर कोणी माणूस शास्त्रांतील शोध करूं लागले तर पापाने अमलदारांच्या योगाने त्यांस शिक्षा लाविली. याप्रमाणे पापाने बहुत वर्षं ख्रिस्तीलोकांवर अधिकार केला. मग सुमारें तीनशें वर्षांमागें विलायतेच्या पलिकडील देशांत कोणी मोठे उपदेशक, जशी शास्त्रामध्यें सांगितली तशी देवाचें भजन करण्याची रीत लोकांस शिकवूं लागले, आणि सर्व लोकानी शास्त्र वाचून समजावें, असें ते त्यांस सांगूं लागले. तेव्हां पापाने त्या उपदेशकांस आज्ञा केली कीं, असें सांगूं नका, परंतु त्यानी मानिलें नाहीं. मग त्यांचा व पापाचा वाद विवाद झाला. शेवटीं पापाचा अधिकार व रीती त्या

उपदेशकांनी टाकिल्या आणि केवळ शास्त्राप्रमाणे आह्मी चालूं, असा निश्चय करून त्यांनी आपलें मत प्रगट केलें. तेव्हां थोड्या वर्षांनी त्या उपदेशकांच्या योगानें बहुतकरून त्या मुलखांतील लोकांनी तसेंच केलें. ज्या लोकांनी पापाचा अधिकार व त्याच्या सर्व रीती सोडल्या त्यांस प्रोतेस्तांत असें नाम झालें. आणि जे लोक पापाचा अधिकार व रीती अजून मानितात त्यांस पोपिस्त अथवा पापिस्त असें म्हटलें आहे. त्या पोपिस्तांमध्यें पोर्टुगाली किंवा फिरंगीलोक मोजिले आहेत.

येशू ख्रीस्ताच्या मरणानंतर सुमारें साहाशें वर्षें आरब स्थानामध्यें मक्का नामें एका गांवीं महंमद नामें एक माणूस जन्मला होता. त्याच्या बाळपणांत त्याचीं आईबापें मेलीं. यानंतर तो आपल्या आजाच्या घरीं राहिला. थोडे वर्षांनी त्याचा आजाहि मेला, मग त्याच्या काकानें त्याला घेऊन शिकविलें. महंमद कामाविषयीं हुशार झाल्यावर एक द्रव्यवान् विधवेचा कारभारी झाला, आणि कांहीं वर्षांनी तिजवीं लग्नकरून त्यानें बहुत द्रव्य मिळविलें. त्या वेळेस आरबीलोक बहुधा मूर्त्तिपूजक होते. सुमारें चाळीस वर्षांचा झाल्यावर महंमदानें कांहीं नवा धर्म स्थापावा असा बेत केला. मग त्यानें जें शास्त्र देवानें पूर्वीं इस्रायललोकांस दिल्हें, आणि येशू ख्रीस्ताच्या

ख्रिस्त्यानी जें लिहिलें, त्यांतून कांहीं गोष्टी काढल्या, आणि त्या कांहीं प्रकारें निराळ्या करून व आपण कांहीं नव्या कल्पित गोष्टी योजून त्यांशीं संबंधकरून अशा युक्तीने एक नवें शास्त्र त्याने केलें. मग तो लोकांस सांगूं लागला कीं, परमेश्वराच्या दुताच्या योगाने ह्या गोष्टी म्या लिहिल्या; आणि ह्या गोष्टी लोकांस कळवाव्या अशी आज्ञा देवापासून मला झाली. मग ह्या गोष्टी खऱ्या आहेत यांच्या प्रमाणासाठीं त्याने कांहीं साक्षात्कार दाखवावे किंवा चमत्कार करावे असें महंमदाजवळून लोकानी मागितलें, परंतु त्याने असें कांहीं प्रमाण कधीं दाखविलें नाहीं.

महंमद आपलीं मतें आपल्या गांवांतल्या लोकांस सांगूं लागला असतां प्रथम त्यानी त्याची निंदा केली, आणि जेव्हां तो सांगत गेला तेव्हां त्याला मारण्याचा मनसोबा त्यानी केला. हें समजून तो मदैना नामें गांवास पळाला. इतक्यांत त्याच्या मतांत त्याचे चाकर व कोणी दुसरे संबंधी लोक आले होते. मदैनामध्यें कांहीं वेळ राहिल्यावर महंमद कांहीं फौज मिळवून बळात्कार करून आपल्या मतांत लोकांस आणूं लागला, आणि त्या वेळापासून त्याचा धर्म वाढत गेला. त्या धर्मांत जीं सर्व माणसें आलीं त्यांस मुसलमान असें नाम झालें. मदैनास पळाल्यानंतर सुमारें दाहा वर्षांनी महंमद मेला. त्याचें

पळणें मुसलमान लोक हिजरा असें म्हणतात. हाच त्यांचा शक आहे आणि त्यापासून ते वर्ष मोजितात.

आपल्या मतांत लोकांनी यावें असे उपाय महंमदानें केले, त्याच्यामागें जे मुसलमान आले तसें त्यांनी केलें. अशा युक्तीनें कांहीं वर्षांनी आरबस्थान व त्याचे जवळील मुलूख यांमध्यें बहुतकरून महंमदाचें मत चाललें. सुमारें आठशें वर्षांमागें मुसलमान लोक हिंदुस्थानांत आले आणि लढाईकरून कांहीं मुलूख घेतले; दिल्ली त्यांची राजधानी झाली. यानंतर त्यांचा अधिकार फार वाढला आणि त्यांनी आपल्या धर्मांत जबरदस्ती करून ठिकाणीठिकाणीं हिंदुलोकांस आणिलें. सांप्रत मुसलमानांचा अधिकार फार कमी झाला आहे.

सर्व पृथ्वीच्या लोकांस शिष्य करा, अशी आज्ञा येशू ख्रीस्तानें केली, आणि सुमारें दोनशें वर्षांपर्यंत ख्रिस्तीमत फार वाढलें. मग ख्रिस्तीलोक देवाचें भजन विसरून अज्ञानी झाले आणि त्याच्या आज्ञा ते विसरले. नंतर पापाचा अधिकार व रीती यांपासून जे मोकळे झाले ते शास्त्र वाचितांना ती आज्ञा समजून ख्रिस्तीमत अन्यलोकांस कळविण्याची चिंता धरूं लागले, आणि ह्या लोकांस ख्रिस्ती धर्म आजून कळत नव्हता त्यांस तो सांगावयास बहुत उपदेशक गेले. सांप्रत बहुतकरून सर्व मुलखांत ते उपदेशक

आहेत. ते लोकांस उपदेश करितात आणि खिस्ती शास्त्र त्या मुलखांतील भाषणांत उतरून व छापून लोकांस देतात. अणखी बहुत धर्मपुस्तकें छापून ते सर्वांस वांटितात आणि सर्वांनी शास्त्र इत्यादिक समजावें म्हणून ठिकाणोठिकाणीं शाळा घालून लोकांस वाचावयास शिकवितात. या भरतखंडांत असे उपदेशक बहुत आले आहेत, आणि कित्येक ठिकाणीं खिस्तीधर्मांत फार लोक येत आहेत, मद्रास तिनाविली त्रावनकोर तांजोर व रामेश्वराजवळील कांहीं प्रांत यांमध्यें विशेष लोकानी असें केलें आहे. थोडे दिवसांमागें तीनशें वीस गांवचे लोक आपल्या वाडवडिलांचा धर्म व रीति सोडून खिस्तीमतांत आले, आणि तेहेंसी कोण्ही कोणी विचार करून तसेंच करीत आहेत. सांप्रत वर्त्तमान आहे कीं तसेंच बंगाल देशांत लोक असें करीत आहेत, आणि तेथें कित्येक ठिकाणीं मूर्त्तिपूजा अगदीं नाहींशी झाली आहे.

शास्त्रांत अशा भविष्य गोष्टी सांगितल्या आहेत कीं, खिस्तीधर्म सगळ्या जगामध्यें चालेल आणि मूर्त्तिपूजा व सर्व अन्य धर्म नाहींसे होतील. या भविष्य गोष्टी पूर्ण होतील असा सर्व खिस्तीलोकांस विश्वास आहे. परमेश्वर जो सर्व सृष्टीचा उत्पन्न करणारा व रक्षण करणारा त्याचें भजन मात्र प्रथम सर्वांनी केलें. नंतर मूर्त्तिपूजा व निराळ्या

निराळ्या प्रकारचे अन्य धर्म उत्पन्न झाले. हीं सर्व खबाड कल्पित मतें सोडून अवघ्या पृथ्वींतील लोक खऱ्या देवाकडे फिरतील आणि त्याची भक्ति करितील. तेव्हां सर्व मनुष्यें एकमेकांशीं प्रीतीने वर्त्ततील आणि कांहीं लढाया किंवा बलात्कार कोणत्याहि ठिकाणीं होणार नाहींत. सारे लोक असें बहुत वेळ राहिल्यावर येशू ख्रीस्त जो आतां आकाशलोकांत प्रत्यक्ष आहे, तो जगामध्यें मोठ्या वैभवाने येईल, आणि जगाच्या प्रारंभापासून त्या दिवसापर्यंत जेवढीं माणसें पृथ्वीवर राहून मेलीं, त्यांस तो जिवंत करील. मग जे सजीव झाले आणि जे त्या समयीं पृथ्वीवर राहत असतील, त्या सर्वांस येशू ख्रीस्त आपल्यासमोर बोलावून त्यांच्या सर्व आयुष्यांतील कामांचा हिशेब घेईल. मग तारणाचा उपाय, ह्मणजे पापांचा पश्चात्ताप करणें, येशू ख्रीस्तावर विश्वास ठेवणें, व देवाच्या सुभक्तीस लागणें, असें ज्यांनी केलें त्यांस तो एकीकडे ठेवील. मग ज्यांनी आपलें सर्व आयुष्य पापामध्यें घालविलें त्यांस तो सांगेल, अहो शापग्रस्त तुह्मी मजपासून दूर नरकांत निरंतर दुःख भोगावयास जा. तेव्हां जे देवाचे सुभक्त त्यांस घेऊन आकाशलोकांत तो जाईल, आणि ते त्याच्याबरोबर राहून सर्व काळ कल्याण पावतील.

आतां असा निश्चय समजा कीं येशू ख्रीस्ताशिवाय

दुसरा तारणारा कोणी नाहीं. जीं सर्व माणसें आपलें पाप सोडून येशू ख्रीस्तावर विश्वास ठेवून त्याच्या रीति प्रमाणे चालतात तीं देवाची कृपा पावतील, परंतु त्याला जीं अव्हेरितात तीं कोणत्याहि दुसऱ्या उपायानी तारण पावणार नाहींत, असें देवाने स्वचीत सांगितलें आहे. मरणानंतर दुसरा जन्म होईल असें कल्पूं नका. या आयुष्यांत तारणाचा उपाय जे करितात ते मेल्यावर आ काशलोकांत जाऊन तेथें सर्वकाळ राहतील. आणि असा उपाय जे करीत नाहींत ते मेल्यावर नरकांत जाऊन तेथें सर्वकाळ राहतील, कांकीं अनेक जन्म कोणाला कधींहि होत नाहींत.

प्रत्येक माणसाच्या परीक्षेसाठीं हें आयुष्य देवाने नेम लेलें आहे, म्हणून जोंपर्यंत आपणास आयुष्य आहे तोंप र्यंत आपलें सार्थक शोधा. कांहीं उशीर करूं नये; पावसाळ्यामध्यें जर कोणी माणूस आळसाने आपलें शेत पेरीत नाहीं तर त्याच्यासाठीं पाऊस खोळंबणार नाहीं, आणि माघारें येणार नाहीं. तसें या आयुष्यांत जो पाप सोडून देवाची कृपा मिळवीत नाहीं त्याला कांहीं उपाय राहत नाहीं. त्याच्यासाठीं मरण उशीर करणार नाहीं आणि मेल्यावर आकाशलोकासाठीं सिद्ध होण्याचा मुहूर्त मिळणार नाहीं. उद्यांचा दिवस कसा उगवेल हें तुम्हाला

ठाऊक नाहीं, म्हणून त्यांचा विचार घेऊं नये. सांप्रत पापाचा दंड चुकायाचा आणि आकाशलोकाचें सुख मिळावयाचा उपाय आहे. तो उपाय मागें सांगितला आहे; येशू ख्रीस्त जो जगाचा तारणारा मनुष्यांच्या तारणासाठीं प्रायश्चित्त केलें, येणेकरून सुखाचा मार्ग तुह्मापुढें उघड केला आहे. तुह्मी आपल्या पापांचें दुःख नरकामध्यें न सोसावें ह्मणून त्यानें आपल्या अंगीं दुःखें सोसिलीं. एवढी दया व प्रीति त्यानें तुम्हावर केली म्हणून त्याजवर तुह्मी प्रीति करावी व विश्वास ठेवावा हें फार योग्य आहे. मनुष्यांवर एवढे उपकार केल्यावर तो सर्वांस असें ह्मणतो कीं, अहो सर्व पृथ्वीचे लोकांहो, तुम्ही मजकडे पाहा आणि तारले जा. जो कोणी मजकडे येतो त्याला मी दूर करणार नाहीं. ज्याची इच्छा असली तर त्यानें मजकडे येऊन तारण घ्यावें. अहो जे तुम्ही पापाच्या ओझ्यानें भारावलेले व थकलेले आहां, ते तुह्मी मजकडे या आणि मी तुम्हास विसांवा देईन. ज्याला ऐकावयाचे कान आहेत तो ऐको. अहो वाचणारे किंवा ऐकणारे आपल्या अंतःकरणांत आपल्या पापांचा संताप उत्पन्न होईपर्यंत आपल्या पापांचें चिंतन अहोरात्र करीत जा, आणि तुमच्या मनांत येशू ख्रीस्तावर प्रीति होईपर्यंत त्याच्या प्रीतीचें ध्यान करीत जा. आपणाला तारणारा पाहिजे

आणि येशू ख्रीस्ताशिवाय कोणी तारणारा नाहीं असें मनांत समजून त्याच्या नावानें परमेश्वराला शरण जा. आणि आपलें पाप कबूल करून आपलें अंतःकरण पवित्र करण्याकरितां त्याच्याजवळून पवित्र आत्म्याची प्रेरणा मागत जा. देवाचा एक मोठा भक्त जो दावीद त्याची प्रार्थना अशी होती कीं, हे परमेश्वरा, तूं मजमध्यें निर्मळ अंतःकरण उत्पन्न कर, आणि मजमध्यें यथायोग्य आत्मा निर्माण कर. याप्रमाणे तुह्मी फार आग्रहकरून देवापाशीं विनंती करीत जा.

## देवाची प्रार्थना

हे दयाळू जगदोद्धारा परमेश्वरा, तूं सर्व सृष्टीचा उत्पन्न करणारा आहेस. त्वां मला जन्मास घातलें आणि पहिल्यापासून त्वां माझें पोषण व संरक्षण केलें आहे. हे दयाळू देवा, तूं माझा धनी आहेस आणि तुझे उपकार मजवर फार झाले, ह्मणून म्या संपूर्ण मनानें तुजवर प्रीति करावी व तुझ्या सर्व आज्ञा मानाव्या हें योग्य आहे. परंतु हे कृपाळू बापा, मी तुला विसरलों व तुझ्या आज्ञा मोडल्या. असें तुझ्यासमोर मी पापी व निरुपायी झालों आहें ह्मणून काय करूं? आपल्या हातून कांहीं पुण्य होत नाहीं व कांहीं प्रायश्चित्त होत नाहीं. हे कृपाळू भगवान, मजवर दया कर, आणि येशू ख्रीस्त ज्यानें पापी लोकां

वर प्रीतिकरून अवतार घेतला आणि त्यांच्या पापांसाठीं प्रायश्चित्त केलें त्याच्या नावानें मी तुझा आश्रय करितों. मी आपलीं पापें कबूल करितों, माझ्या पापांची क्षमा कर. मी अज्ञानी आहें, मला ज्ञान दे. मी पाप करून नरकाच्या मार्गांत पडलों आहें, तुझा मार्ग मला समजेव आणि त्यामध्यें चालण्याची बुद्धि व शक्ति मजवर दया करून दे. पुढें मी तुझें भय धरावें आणि तुजवर प्रीतिकरून तुझ्या आज्ञांप्रमाणें चालावें ह्मणून मला बुद्धि दे. आतांपासून मी आपल्या तारणाविषयीं योग्य काळजी धरावी, आणि जसा त्वां उपाय कळविला तसा जोंपर्यंत मी ह्या आयुष्यांत आहें तोंपर्यंत करीत जावा, आणि मेल्यावर सर्वकाळ कल्याण आ काशलोकांत पावावें. ही माझी प्रार्थना मी येशू ख्रीस्ताच्या नावानें व त्याच्या पुण्यामुळें तुझ्यापाशीं करितों, आमेन.

